


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# उद्योगाचें घर भाग्यलक्ष्मीचें माहेर ...





आपलें शेतकी, सागरी किंवा औद्योगिक जीवन
सुखी करण्यासाठीं दीपावलीच्या मंगलप्रसंगीं
आपण लक्ष्मीचें पूजन करून नूतन
वर्षाच्या भरभराटीसाठीं पायाभरणी करतो.
या पायाभरणीची पूर्तता म्हणजे किर्लोस्कर निर्मित
शेतकीसाठीं ५ हॉर्स पॉवर डिझेल एंजिन,
सागरी जीवनांत उपयुक्त असलेलें मरीन एंजिन,
तसेंच औद्योगिक क्रांतीसाठीं पोषक असें
किर्लोस्कर - एम्. ए. एन्. एंजिन वापरण्यानेंच होईल.
किर्लोस्कर एंजिनें म्हणजेच साक्षात् लक्ष्मी.









## किर्लोस्कर डिझेल एंजिन्स

किर्लोस्कर ऑईल एंजिन्स् लिमिटेड, खडकी, पुणें-३



TOM & BAY/KOEL/M-11/62


अनुक्रमणिका





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत





दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



"बाबा,
तुम्ही मला
१०,०००/- रुपये
देऊं शकाल का ?"

आणखी थोड्याच वर्षांत
तुमच्याहि मुलाकडून

हाच प्रश्न विचारला जाण्याची शक्यता आहे.
आणि तुमच्या उत्तरावरच त्याचें भवितव्य
अवलंबून राहणार !

त्याला स्वतःचा दवाखाना थाटून
आयुष्याला चांगली सुरवात करतां येईल का ?

बचत योजनापूर्वक केली पाहिजे.
खर्च करण्यापूर्वीच तुमच्या मिळकतींतून
ठराविक रकम शिल्लक टाकली नाहींत तर
कदाचित् सर्व पैसे खर्च होतील.

**दी
बँक ऑफ इंडिया
लि.**

टी. डी. कंसारा, जनरल मॅनेजर

B/C/130 MAR


दीपावलीनिमित्त अभिष्टचिंतन






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



अनुक्रमणिका

वार्षिक साहित्य कला संगम : वर्ष १८वें, नोव्हेंबर १९६२




संपादक :
दीनानाथ दलाल

# श्रेयनामावलि

*बहुरंगी कलाकृति :* ■ सुनीत ■ श्रावण गीत ■ चैत्र संगीत ■ गीतगोविंद ■ गीत रामायण ■ विरह गीत ■ भावगीत ■

*बिंगचित्रमाला :* नवी इसाप नीतिकथा : कथा : शां. शं. रेगे

*व्यंग चित्रमाला :* वरं झालें देवा : काव्य : शां. शं. रेगे

*साहित्य :* आचार्य अत्रे ■ पु. ल. देशपांडे ■ म. म. दत्तो वामन पोतदार ■ अरविंद गोखले ■ न. वि. गाडगीळ ■ मं. वि. राजाध्यक्ष ■ शामराव ओक ■ वसंत सबनीस ■ वामन चोरघडे ■ जयवंत दळवी ■ विजय तेंडुलकर ■ शिरिष पै ■ कुसुमाग्रज ■ वा. भ. बोरकर ■ वि. स. खांडेकर ■ मंगेश पाडगांवकर ■ राजा बढे ■ इंदिरा ■ डॉ. सरोजिनी वाबर ■ डॉ. दमयंति सरपटवार ■ पु. शि. रेगे ■ जी. ए. कुलकर्णी ■ श्रीराम कामत ■ गोपालकृष्ण भोबे ■ चित्रकार एम्. आर. आचरेकर ■ रा. ज. देशमुख ■ निर्मला देशपांडे ■ मधुकर केचे ■ पुरुषोत्तम धाक्रस ■ अ. दि. माडगूळकर ■ सौ. अंजलि ठकार ■ माधव मंत्री ■ मनोहर तल्हार ■ उदयशंकर ■



टे. नं. ७७७६५

दलाल आर्ट स्टुडिओ प्रकाशन

'दीपावली'त प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचीहि अधिकृत मतें असतात असें नाहीं प्रकाशित चित्रांचे व लेखांच्या भाषांतरांचे सर्वाधिकार स्वाधीन. या अंकाची किंमत रु. ३

● प्रकाशन स्थळ : दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रीज मुंबई ४
● ऑफसेट प्रिन्टिंग : न्यूइरा प्रेस, वरळी मुंबई ● मुद्रण स्थळ : मौज प्रिन्टिंग ब्यूरो, खटाववाडी, मुंबई ४, आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रिज, मुंबई ४ ● ब्लॉक्स् : बॉम्बे प्रोसेस स्टुडिओ, प्रभात प्रोसेस स्टुडिओ मुंबई

पुढील 'दीपावली'चा अंक १ डिसेंबरला प्रसिद्ध होईल.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका



## ही सद्भावना.......

दीपावलीचें हें अठरावें वर्ष. गेलीं सतरा वर्षे या वार्षिकाच्या योजनेंतील कार्यमग्नतेचे चार महिने आणि त्यानंतरचे कौतुकाचे दोन महिने, असे एकंदर एकूण दोन महिने एका विशिष्ट धुंदींत गेले. अठरा वर्षांपूर्वीचे वाचक आणि अठराव्या वर्षांत पदार्पण करणारे आजचे नवे वाचक—यांच्या अभिरुचींत जमीन अस्मानाचा फरक पडला. पूर्वींचीं ध्येयवाक्यें बदललीं, निष्ठा बदलल्या, युगप्रवाह ऊर्ध्वगामी होऊं पहात आहे.

स्थितप्रज्ञ लोक ज्याला बेवारशी अंधाधुंदीचा काळ म्हणतात अशा या काळांत मराठी साहित्यांतील अभिरुचीचा ओघ कोणत्या दिशेला वळणार याचा निर्णय देणें कठीण आहे. भारतीय ऋषिमुनींनीं रात्रंदिवस आवाहन करून, सर्वस्वाचें हवन करून, प्रसन्न झालेल्या तेजानवळ साहित्याचें दान मागितलें. आणि तें दान असंख्य पिढ्यांच्या पदरांत टाकून 'सत्प्रवृत्तीनें ओथंबलेलें जीवन जगायला शिकवा' असा संदेश दिला. त्या संदेशाचा ध्वनि हळूहळू विरून पावत आहे. आणि कोलाहलांत नवा ध्वनि कोणता आहे हें कळत नाहीं......!

आम्हीं काय केलें हें सांगून या धांवत्या काळांत वाचकांचा अधिक वेळ घ्यायची आमची इच्छा नाहीं; पण दीपावलीच्या कर्तृत्वावर चोखंदळ वाचकाचा पूर्ण विश्वास आहे. आणि या विश्वासाला पात्र होण्याइतपत—किंबहुना अधिकच—समाधान संपूर्ण अंक पाहून वाचकाला लाभेल यांत शंका नाहीं. आमच्या अनेक योजना सफळ करण्याचें सारें श्रेय आमच्यावर निर्व्याज प्रेम करणाऱ्या आमच्या मित्रांचें. 'वरातीच्या' गर्दींत असलेले पु. ल. देशपांडे, शिक्षणक्षेत्राच्या व्यापांत असलेले मं. वि. राजाध्यक्ष, आपल्या ग्रंथसंभाराची व्यवस्था लावण्यांत ज्यांना दिवस पुरत नाहीं असे शां. शं. रेगे आणि आपलें अफाट काम करूनहि वेळांत वेळ काढून दीपावलीची आस्थेनें चौकशी करणारे अच्युत बर्वे या मित्रांचें सहकार्य अतिशय मोलाचें आहे. संपादन कार्यांत चित्रकार गोपालकृष्ण भोबे हे तर ठायींठायीं दिसतील.

दीपावलीची नित्य काळजी वाहणारे श्री. पु. भा. भावे, वसंत सबनीस, रा. ज. देशमुख, यांचे आभार मानणें म्हणजे औपचारिकपणा ठरेल, पण या मंगलप्रसंगीं तेंहि कर्तव्य आहे. जाहिरात विभागाची समृद्धता आमचे परमस्नेही गणेशराव तांबे (टॉम ॲन्ड बे) यांच्या अविश्रांत श्रमाचें फळ आहे. श्री. श्री. स. दाभोळकर या दिवसांत अक्षरशः चोवीस तास राबत असतात.

या वर्षीची रंगीत चित्रांची छपाई न्यू इरा प्रिंटिंग प्रेसमध्यें झाली. श्री. कांगा यांनीं या बाबतींत मोलाचें सहकार्य दिलें. मौज प्रिंटिंग ब्यूरोचे श्री. विष्णुपंत भागवत व मौजेचे सर्व कामगार बंधू यांनीं छपाईचें काम उत्तम केलेलें आहे. त्यांचे मनापासून आभार. जगदीश्वर प्रेसचे भालचंद्रपंत, बॉम्बे प्रेसचे मोहनराव कामत, प्रभात प्रोसेसचे विष्णुपंत कडव, आणि वितरण क्षेत्रांतले श्री. बाबुराव वागवे यांचें दीपावलीवरचें प्रेम अबाधित आहे. निर्मिति क्षेत्रांतले श्री. श्रीकृष्ण ठाकूर व श्री. परब आणि इतर सहकाऱ्यांचें सहकार्य आहेच.

याशिवाय दीपावलीसंबंधींच्या आपुलकीनें आणि आदरानें नित्य साहाय्य देणाऱ्या स्नेह्यांचा ऋणनिर्देश करतांना अंतःकरण भरून येतें. या सर्व मित्रांना, वाचकांना आणि जाहिरातदारांना नवें वर्ष आनंदाचें, समृद्धीचें व सुखाचें जावो असें इच्छितों!!

—दीनानाथ दलाल


# MAHARASHTRA PRAKASHAN

OFFERS

*Diwali Greetings*

*to*

*Our Patrons &*

*Readers*

**MANGESH R. WAGLE, M.A.,**
**(Editor)**

**SHRIKRISHNA S. DABHOLKAR,**
**(Publisher).**

We are pleased to announce that the Pharma-Scopia Special Number will be released in December 1962.

Pharma-Scopia will contain Educative Scintific Notes on current Pharmaceutical Topics and relative Commercial Development Subjects.





अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत





दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




TOM & BAY / GM / M-1/62

खाणी व खनिज द्रव्यें म्हटले म्हणजे गोगटे माईन्स हे नांव डोळ्यासमोर उभे राहते. खाण धंद्यावरोवरच रेडी- जि. रत्नागिरी येथील खाणीतून काढलेल्या कच्च्या लोखंडाच्या जमिनीवरील व जलवाहतुकींत त्यांनी अत्यंत अल्प काळांत नेत्रदीपक कामगिरी केली आहे.

गोगटे माईन्सचा स्वयंप्रकाशित तारा स्वतःला व इतरांनाही त्यांच्या भविष्यकाळांतील प्रगतीसाठीं प्रकाश देण्यास सदैव सिद्ध आहे.

**खाणी, खनिज द्रव्यें व जलवाहतुक**

**गोगटे माईन्स,** टिळकवाडी, बेळगांव.




अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

*भैय्या दचकला. त्यानें अगदीं वर पाहिलें. चंद्रप्रकाशांत पडलेली अंधुक सावली तिसऱ्या मजल्यावरून आली होती. तेवढ्या अंधारांतहि त्या स्त्रीचे डोळे चमकल्याचा भास झाला. महालक्ष्मीच्या चकचकीत मुखवट्यावर कवड्यांसारखे सताड डोळे असतात तसे डोळे....*

गणपतीच्या चित्राची गुंडाळी घेऊन भय्या परतला तेव्हां दिवेलागणी झाली होती. त्या परक्या शहरांत दोनतीनदां वाट चुकल्यानें त्याचे पाय दुखूं लागले होते. एका उपाहारगृहांत घेतलेला चहा पोट ढवळीत होता. व्याह्यांच्याकडे झालेल्या प्रकारानें डोकं गरगरत होतं. घरीं परतण्याचं भय वाटत होतं. घर टाळून कुठें जायचं तें कळत नव्हतं. होटेलमध्यें, पार्कवर, चौकांतल्या फुटपाथशीं, सिनेमागृहासमोर वेळ काढून कंटाळा आला. व्याह्यांच्या दाराशीं सारी रात्र बसून काढावं असं वाटत होतं. पण तिथें कुणीं थांबून दिलं नसतं. कुणी त्याच्याकडे लक्ष देण्याच्या मनःस्थितींत नव्हतं. स्वतःला ढळलींत अखेर भय्या घरीं परतला.

घर कसलं—कार्यालय मिळालं नाहीं म्हणून एका गरीब इसमानें मारवाड्याच्या हिशेबानें दोन दिवसांसाठी दिलेल्या दोन खोल्या, एक पडवी व थोडंसं अंगण. अंगणांत मांडव घातला होता. दिवे लागले होते. बैठक घातली होती. पडवींत बायकांचा किलकिलाट चालला होता. दोनचार पुरुषमंडळी फराळ करीत होती. पडवींतून अंगणांत उड्या घ्यायचा मुलांचा खेळ चालू होता. अंगणाच्या एका बाजूला आसन मांडून नानासाहेब भटजीबुवांशीं विवाहविधीवर न संपणारी चर्चा करीत होते.

ट्यूबलाईटच्या झगझगाट व मुलांचा गलका बघून भय्या पुरा मरगळून गेला. लगीनघाई ! नागळाचं पोतं. मोठाल्या कढया नि झारे घेऊन आलेले उघडे आचारी, लुगड्यांच्या घड्या मोजणाऱ्या बायका. सतरांदा चहा पिणारे पुरुष, अनोळखी नातेवाईक व असंख्य मुलं. भय्याला विचित्र झालं. सासरेबुवा गोरज मुहूर्तपद्धतीवर टीका करीत होते. सासूबाई फराळाचं सामान डब्यांत भरून ठेवीत होत्या. ब्रायंच्या लुगड्यांत चिट्ठ्या घालीत बायको फतकालं घालून बसली होती. दोन्ही मेव्हणे आचाऱ्यांना चुली घालून देत होते...आणि केसकरांच्याकडे असं कांहीं नव्हतं. भय्याच्या मुलीचं केसकरांच्या मुलाशीं लग्न व्हायचं होतं. परवां उजेडतांचं ! पण केसकरांच्याकडे अजून फराळाचं करायचं होतं. मोठ्या वाड्यापुढें प्रशस्त अंगण असून अजून मांडव घातला नव्हता. चहाफराळ, ट्यूब लाईटस, गलका घाई कांहीं नव्हतं. खालच्या मानेनें माणसं सावल्यासारखीं वावरत होतीं. सुन्न झालीं होतीं.




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

मांडवांतच बाजूच्या जुनाट बाकांवर भय्या बसला. कुणी त्याच्याकडे लक्षहि दिलं नाहीं. नानासाहेबांनी त्याच्याकडे एक दृष्टिक्षेप टाकला व ते उपाध्येबुवांचं म्हणणं ऐकूं लागले. बायकोनें दोन्ही भावांना बोलावलं व मंडईत धाडलं. मैत्रिणींच्या घोळक्यांत चित्रा बाहेरून आली व किलकिलाट करीत सगळ्याजणी आंत गेल्या. हुंदडणारीं मुलं भय्याच्यापुढें खेळत बसलीं. ह्या सगळ्या सोहळ्यांत भय्यां कुणीच नव्हता. केवळ मुलीचा बाप होता. भीतीनें हतबल झालेल्या भय्याच्या मनांत हळूहळू तिटकारा भरूं लागला. आयुष्यांत सगळीकडून आपला कोंडमारा होतो आहे असं वाटूं लागलं. चाळीशी उलटली नाहीं तोंच उपवर मुलीचा बाप म्हणून लाचारी पत्करावी लागत आहे. होती नव्हती ती शिल्लक, वर इन्शुअरन्स कंपनीचं व ऑफीसचं कर्ज एकत्र करून मुलीचं लग्न करावं लागत आहे. मेव्हण्यांना, सासऱ्याला, प्रत्यक्ष पत्नीला त्याचं सुतक नाहीं. भरमसाट खर्च चालला आहे. थोडक्यांत लग्न उरकायचा पहिला बेत बारगळत आतां प्रत्येक विधी, प्रत्येकाचे मानापमान सुरू आहेत. बायकोच्या लग्नाच्या वेळीं अश्रू ढाळणारे लोक आतां चित्राच्या लग्नाच्या वेळीं हंसत आहेत. मुलीला माझ्या गळ्यांत वीस वर्षांपूर्वी अडकवून आतां माझ्या लेकीला दूर ओढीत आहेत. सगळा कट, सगळा मूर्खपणा. भय्याला वाटलं, मोठ्यानें ओरडून हा तमाशा थांबवावा. पण हें सगळं थांबायचीच वेळ आली होती. लग्न पार पडतं कीं नाहीं हेंच कळत नव्हतं. आलेला राग एकदम थिजला व भय्या काळजीनें परत हुड-हुडूं लागला. आपल्या बायकोला सगळं सांगावं असं त्याला वाटलं व तो तिला मोठमोठ्यानें हांका मारूं लागला.

हातांतलं काम टाकून कपाळाला आंठ्या घालीत मैना आली व नवऱ्याला म्हणाली,

"हे काय—चार चौघांत अशी हांक काय मारतां! हें लग्नघर आहे. चार माणसं जमलीं आहेत. हसतील तुम्हांला. तुमच्या मुलीचं लग्न आहे—"

आज दुपारीं भर पंक्तीत भैय्यानें तिला हांक मारली तेव्हां तिनें असंच त्याला बजावलं होतं. पण तेव्हां त्यानें असा इरसाल विनोद केला होता कीं सासरेबुवा तर हसलेच, पण मैना लाजून आंत पळाली ती पंगत उठेपर्यंत बाहेर आली नाहीं.

पण आतां विनोद सुचत नव्हता. पोटांत दव-ळत होतं. 'आपल्या मुलीचं लग्न होत नाहीं—' असं बायकोला ओरडून सांगावं असं त्याला वाटलं. वाटलं तिच्या खांद्यावर डोकं ठेवावं व म्हणावं, 'केवढं अरिष्ट ओढवलंय. केसकरांच्या सगळ्या अटी पुऱ्या केल्या—पण दैवच अखेर आड आलं. आतां कसं व्हायचं!'...पण तो तिरसटपणें म्हणाला, "चहा दे मला—"

"केसकरांच्याकडे चहाफराळ झाला नाहीं वाटतं?" मैना एका मुलीला चहा आणायला पिटाळीत म्हणाली, "अन् व्याहीभोजनाला कधीं जायचं आपण? त्यांचं बोलावणं आलं नाहीं तें! मी उद्यां सकाळीं भेटायला येईन म्हणून सांगितलंत ना—"

ती आपल्याच नादांत होती. पाहतां पाहतां प्रौढ झाली होती. उद्यांच्या व्याहीभोजनाचे बेत करीत होती. सकाळीं उठतांच विहीणीला भेटायला जायचं योजीत होती. नणं चंदेरी नेसून...

उद्यां. कसलासा नवस. कुणी बुवा आहेत त्यांच्या घराण्याचे-ते येणार आहेत. त्यांना कुणालाच वेळ नाहीं. रात्रीच बघूं म्हणाले..."

"आदल्या रात्रीं व्याहीभोजन? मग इतर सगळे विधी कधीं व्हायचे?—नि परवां सात सोळाचा मुहूर्त..."

भैय्याच्या भोवतालचं कोंडाळं दूर सरलं न मांडवाच्या दुसऱ्या बाजूला जाऊन बैठक घालून बसलं. धुराचं वलय दूर जावंत आजूबाजूला स्वच्छ व्हावं तसं भैय्याला झालं. आपल्याला अचानक सबब सुचली ह्याचं त्याला आश्चर्य वाटलं. स्वतःच्या समयसूचकतेचं, हुषारीचं कौतुक वाटलं. पुन्हां एक कप कडक चहा प्यावासा वाटला. मैनाला हांक मारली, चित्राला चिडवावं, लग्नांत शिवलेला नवा कोट घालावा ...आजचं मरण तर उद्यांवर टळलं. उद्यां! उद्यां काय होणार? उद्याचं मरण?-केसकरांचा तो थेरडा भाऊ उद्यापर्यंत मेला नाही म्हणजे



अ र विं द   गो ख ले

"व्याहीभोजन नाहीं उद्यां—" भय्या फाडकन् बोलला व एकदम गप्प झाला. आपल्या बोलण्यानें सगळे चमकले हें त्याला उमजलं व त्यानें डोळे मिटून घेतले. पुन्हां डोळे उघडले तेव्हां नानासाहेब, सासूबाई, आतेभाऊ व बायको भोवती जमल्याचं त्याला दिसलं. जणूं तो अपघातांत सांपडला होता व सगळे कोंडाळं करून त्याला वारा घालीत होते.

सगळ्यांच्या मुद्रेवरची काळजी पाहतांच भैय्या वरमला. सगळं सांगितलं तर बायको ढसढसा रडेल असं त्याला वाटलं. नानासाहेब भविष्य पाहत बसतील, सासूबाईना फेफरं येईल, चित्रा...त्याची एकुलती एक लाडकी लेक. आंतल्या खोलींतून चित्रा 'इश्श्य।' म्हणून म्हणाली व तिच्या मैत्रिणी मोठ्यांद' हंसल्या. भैय्या वात्सल्यानें व दुःखानें भारून गेला. एकाएकी त्याला कांहीं तरी सुचलं व तो म्हणाला,

"केसरकरांच्याकडे कांहीं तरी देवाचं आहे मिळवली. एकदां डोक्यावर अक्षता पडल्या नि मग त्याचं प्रेत उचलावं लागलं तरी हरकत नाहीं...कीं एव्हांना त्यानें राम म्हटलं असेल? सकाळीं त्याला हार्ट अटॅक् आला नि आंतापर्यंत त्याची नाडी हाताला लागत नव्हती. खपला असेल कां तो? काय झालं असेल? काय होणार? चित्राच्या, आपल्या नशिबांत काय आहे?...

मैत्रिणींचा आरड्याचा आवाज वाढला व थांबला. एकदम सगळी निस्तब्धता झाली. आणि मग झारदार आवाजांतून तानांच्या लडी काढीत चित्रा गाऊं लागली. अंगाला हळद लागलेली, कांहीं तासांतच बोहल्यावर उभी राहणारी, संसाराचीं स्वप्नं पाहणारी अल्लड चित्रा निर्भरपणें भावगीत म्हणत होती. आणि त्या हसऱ्या सुरानी भय्याच्या अंगावर भीतीचा कांटा उठत होता.

दुपारचा सूर्य डोक्यावर भाजत होता आणि केसकरांच्या वाड्यांतल्या पुढच्या अंगणांत







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

भय्या उभा होता. दैवानें त्याचा दंड पकडून त्याला उन्हांत उभं केलं होतं. जुनाट वाड्यांतल्या तिसऱ्या मजल्यावरच्या माळ्यावर म्हाताऱ्या केसकराच्या नाकाला सूत लागलं होतं आणि त्या घरांत मुलगी देणाऱ्या भय्याला उष्ट्या पत्रावळीसारखं बाहेर टाकलं होतं. दाराची केळ ओरबाडणाऱ्या गुराला हाकलावं तसं त्याला जणूं वाड्यापुढून ढकललं जात होतं. आणि दाराला केळ लागावी, घरांत देवक बसावं, म्हणून भैय्याच्या जीवाचा आकांत होत होता.

केसकरांच्या घराण्याला उर्जितावस्था आणणाऱ्या नवऱ्या मुलाच्या सावत्र काकाला अचानक हृदयविकाराचा झटका आला. वय झालं होतं व अटॅक् कांहीं पहिलाच नव्हता. दत्तूकाका प्रकृतीला जपून असत. खेड्यांतल्या आपल्या घराबाहेर पडत नसत. पण पुतण्याचं लग्न निघालं नि त्यांना राहवलं नाही. निपुत्रिक दत्तुकाकांनीं पुतण्याच्या शिक्षणाचा खर्च केलेला होता. आणि लग्नाचा खर्च तेच करणार होते. बायको नको म्हणत होती. पण नवरा निघाल्याबरोबर सावलीसारखी दोन तपं साथ केलेली ती स्त्री निघाली. काका काकू आल्यावर लग्नघर भरलं. दोन दिवस दत्तुकाका खुषींत होते. खातपीत होते, बडबडत होते. आपल्या अतिलठ्ठ, अबोल पत्नीची चेष्टा करीत केसकरांचा पेशवाई वाडा गजबजून सोडीत होते. तिसऱ्या मजल्याच्या पत्र्यावर उभट जिना घालून वर एक पोटमाळा बांधला होता. तो पाहायला ते चढले व छातींत कळ येऊन तिथेंच कोसळले. माळ्यावरच त्यांचं अंथरुण घातलं गेलं. शेक, औषधं, इंजेक्शन, हृदयाचा आलेख–सगळे उपचार एकदम सुरू झाले. तीन मजले वर येऊन व अरुंद, उभट जिना चढून स्पेशालिस्ट डॉक्टर वर आला व मान हलवीत खालीं उतरला.

एखादी घार घिरट्या घालीत रेंगाळावी तसा मृत्यु केसकरांच्या माळ्याभोवतीं घोटाळूं लागला. पाहतां क्षणींच घराची कळा बदलली. आचाऱ्या पाणक्यांच्या, वाजंत्री बँडवाल्यांच्या खेपा एकदम थांबल्या. मांडवासाठीं येऊन पडलेले वासे उभे झाले नाहींत. तांदूळ डाळी निवडणं थबकलं. फराळाचं रांधणं बंद होऊन आलेले पाहुणे भातपिठलं खाऊन चोरट्यासारखे बसूं लागले. तस्त, उकळलेल्या इंजेक्शनच्या सुया, शेकायच्या पिशव्या, नवीं नवीं औषधं, ऑक्सीजन सिलींडर–एक एक वस्तू घाईनें, गंभीरपणें तिसऱ्या मजल्याची घाटचाल करूं लागली. लग्न दोन दिवसावर आलं अन् एकाएकी भलतंच संकट उद्‌भवलं. मुहूर्त पुढें ढकलावा व निमंत्रितांना कळवावं असा निर्णय घेत जो तो दत्तूकाकांचा जीव वाचवण्याची पराकाष्ठा करीत होता.

मुहूर्त पुढें ढकलायचा निर्णय ऐकून भैय्याला ब्रह्मांड आठवलं. जन्मठेपेची शिक्षा ऐकल्यावर कैद्याला असं होतं असेलसं वाटलं. त्याचं काळीज गयावया करूं लागलं. लग्न लांबणीवर टाकणं शक्य आहे! किती दुरून वऱ्हाड घेऊन तो आला होता. बेसुमार खर्च झाला होता. एकदां मुहूर्त हुकला कीं पुन्हां योग साधणं किती कठीण! कदाचित् अजिबातच...पाय लटलटत होते, डोकं गरगरत होतं आणि भय्या केसकरांच्या अंगणांत वेड्यासारखा उभा होता.

कालची रात्र त्याला जागरण झालं होतं! जेवण फार झालं— सोडा पिऊन येतो—' म्हणून थाप मारून तो घराबाहेर पडला होता. बरोबर यायला निघालेल्या मेहुण्याला गुंगारा देऊन भय्या एकटाच पार्कवर जाऊन बसला. उद्यां काय होणार याचा विचार करीत आणि तो विचार मनाआड करीत. केसकरांनीं म्हाताऱ्याला इस्पितळांत टाकावं व सरळ लग्नसमारंभ सुरू करावा असं त्याला सारखं वाटत होतं. ही काय वेळ आहे वडील माणसाचा पुळका यायची? त्यानें म्हणे पुतण्याला शिकवलं, त्याच्या बायकोने म्हणे नवऱ्या मुलाला लहानपणीं त्याची आई आजारी झाली तेव्हां वाढवलं.— इस्पितळांत शुश्रुषा नीट होईल नि इकडे लग्न लागेल मग...पण केसकरांना कांहीं पोच नव्हता. दत्तूकाकाचा आजार त्यांना जास्त होता. त्यापुढे दारावर येऊन ठेपलेलं लग्नसुद्धां ...भैयाला वाटलं, म्हातारा मेला तर! आतां तरी जिवंत आहे का?...ती पार्कमधून पळतच केसकरांच्या दारापुढें जाऊन उभा राहिला. सगळं शांत, उदास होतं. भैय्याच्या घरीं रमीचा डाव पडला होता. दिवे जाळले जात होते. बायकांचीं कामं चालू होतीं. अन् इथें चिटपांखरूं दिसत नव्हतं. भय्या वेड्यासारखा अंधेऱ्या रस्त्यावर चुळबुळत उभा होता.

एकदम वाड्यापुढच्या मोकळ्या जागेवर सावली उमटली. भैय्या दचकला. त्यानें वर पाहिलं. आणखी वर पाहिलं. चंद्रप्रकाशांत पडलेली अंधुक सावली तिसऱ्या मजल्यावरून आली होती. तिसऱ्या मजल्याच्या पुढें आलेल्या पत्र्यावर जिना काढला होता आणि त्यावर एक स्त्री उभी होती.. वृद्ध, लठ्ठ बाई. तेवढ्या अंधारांतहि या स्त्रीचे डोळे चमकल्याचा भय्याला भास झाला. महालक्ष्मीच्या चकचकीत मुखवट्यावर कवड्यासारखे सताड डोळे असतात तसे डोळे. ती बाई जणूं भय्याकडे पहात होती विचारीत होती,

—कोण काय हवंय?

—कांहीं नाहीं. मी नवऱ्यामुलीचा बाप. परत जातो.

भय्याला वाटलं, असं सांगावं व दूर सरावं. आपलंच नशीब फुटकं इथें एक मनुष्य मरणाच्या दाराशीं पडला असतांना स्वतःच्या लेकीच्या लग्नाचा विचार करणं हाच मूर्खपणा! पण तो कांहीं बोलला नाहीं. दूर मात्र सरला व घराकडे निघाला.

त्यानें जाण्यापूर्वी वळून पाहिलं तों ती बाई



## पंतप्रधान

कुसुमाग्रज

इंद्राघरचें पिउनि रसायन प्रधान अमुचे आले
अलकेंतिल चिर यौवन येथे रूप काश्मिरी ल्यालें.
चरण धरेवर शिर मेघावर कसरत कौतुकशाली
नक्षत्रांशीं वरती चर्चा पद ठेचाळत खाली.
मुलांत काका जगांत स्नेही गुरुजी भारत देशीं
छडी परजती कधी प्रजेवर मग्न कधीं उपदेशीं.
उडया घालती सभासागरीं—पोलिसखातें तंग—
नाच जंगली जनांत करती मुक्त खेळती रंग.
गर्तीत रमती, देशोदेशीं फिरतें नित्य विमान
निर्यातीच्या गटांत यांचा केवळ पहिला मान.
सूत कातती पुकारती पण अणूयुगाची द्वाही
जनशाही स्थिर करण्यासाठी वरती नायकशाही.
थोडे पंडित थोडे इंग्रज थोडी मोगल शान
कवि मीमांसक समाजवादी गांधींचा अभिमान.
दवा पहाडी—कस्तुरि केशर प्रवंग सोमल कांही
स्फटिकाचा घट—असें विलक्षण मिश्रण झालें नाही.
ताइत कुठला गळ्यांत आहे कुणास ना हें कळलें
मतें घेउनी त्यांच्या मागे धावति पण मतवाले.
विशाल नयनीं परंतु केव्हा पहा वेदना साचे
शब्दावाचुनि त्यांत उकलतें मानस मानवतेचें.
अतर्क्यतेंतहि एकच निश्चित—आज वादळी रात
गहन तमीं हा एकच जळतो नंदादीप जगांत.




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




"कारभारनी वाइच ग्वाड कर" आनंदित शेतकऱ्याची आरोळी होते तेव्हांच शेतकऱ्याची दिवाळी सुरू होते. आपली शेतकरी मंडळी विशेष प्रसंगीं गोडधोड खात नाहींत. 'वाइच कांदा', 'वाइच चटणी', 'वाइच तिखाट' एवढेंच खाण्याबाबत त्यांच्या मागण्या असतात. 'तोंड ग्वाड करायला—' ही खास प्रसंगाची निशाणी.

शहरांतील नागरीकाप्रमाणें खेड्यांतील शेतकऱ्याचें तोंडही साखरेमुळें गोड होतें. आतां त्यांना गूळपाणी चालत नाहीं 'चापाणी'च लागते. शेतकऱ्यांच्या आयुष्यांत साखरेनें एक विशिष्ट स्थान मिळविलें आहे,

# शेतकऱ्याची दिवाळी

## अधिक साखर खा

त्यामुळें झोपडींतही साखर ही विशेष प्रकारची प्रेरकशक्ति असल्यामुळें ती उत्साहवर्धक आणि आरोग्यदायक ठरली आहे. म्हणूनच अधिक साखर खा आणि जीवनानंदांत विशेष भर टाका.

वालचंदनगरचा साखर कारखाना 'लइ मोटा' आहे हें आतां पुण्याच्या पंचक्रोशीतील शेतकऱ्यांना ठाऊक झालें आहे. वालचंदनगरची साखर अतिशुद्ध स्वच्छ आणि स्फटिकासारखी चमकदार असते, कारण ती खास उंसासाठीं मशागत केलेल्या गोड, रसाळ उंसापासून तयार होते.






वालचंदनगर इंडस्ट्रीज लिमिटेड, वालचंदनगर, पुणें जिल्हा

/N/EMS-1/62 (M)

TOM & BAY









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


अनुक्रमणिका



## पाच वात्रटिका

मंगेश पाडगांवकर

### कौशल्य

भलतीच टेनिसपटू एक होती बाई
चेंडू घेऊन जादूचे ती खेळायला जाई
पुरुष सगळे शर्थ करत
पण अखेर डाव हरत
अजून ती बाई : कधींच हरली नाहीं

### भीति

एक होती बाटली
तिला भीति वाटली
तेव्हां तिनें हळूच
घालून घेतलें बूच.

### तांबट

एक होता तांबट
त्याचें हत्यार होतें अंमळ लांबट
तरी घेत नसे आराम
सारखा करीत राही काम
ठोक् ठोक् ठोक् करी मधें थांबत थांबत
असा होता तांबट ज्याचें हत्यार
अंमळ लांबट.

### खादाड

एक होता खादाड
तो खाई खूप मटण
तेव्हां त्याचें पोट फुगून
नको तिथलें तुटे बटण

### सात्त्विक

एक होता सात्त्विक
तो भांग प्यायला
आणि म्हणाला 'प्यायला.'

आंत परतत होती. जणूं मृत्यूला माघारी फिरवून ती नवऱ्याच्या शुश्रुषेला पदर बांधीत होती. ती दिसेनाशी झाली व भय्यानें ओळखलं—दत्तूकाकाची बायको. जावयाच्या श्रीमंत काकाची दुसरेपणाची, वांझ, वात भरलेली बायको. जावयाला लहानपणीं सांभाळणारी, त्याचं शिक्षण करणारी. चित्राची खरी सासूच म्हणायची. हिच्या शब्दामुळें केसकरांनीं हुंड्याची अट रद्द केली. करणीसुद्धां हिला नकळत करायची होती. ह्या स्त्रीमुळें भैय्याचे दोन पांच हजार रुपये वांचले होते. कदाचित् तिची पसंती आली तेव्हांच लग्नाचं नक्की झालं असावं. भैय्याला तेव्हां त्या बाईबद्दल कुतूहल वाटलं. आदर वाटला. तिला भेटावंसं वाटलं. पण ती कधीं दिसली नाहीं. आज तिची फक्त सावली दिसली. ती सुद्धां तिच्या आयुष्यांत अंधेर पसरत असतांना! भैय्या अधिकच उन्मळून गेला. चालतांना समोरच्या माणसावर धडपडला.

"सॉरी हं—फुटली कां?" त्या इसमाच्या हातांतली बाटली पाहून तो म्हणाला. एकदम कांहीं शंका येऊन तो पुढें म्हणाला, "केसकरांच्याकडे कां?"

"हो—"

"बरी आहे तब्येत दत्तूकाकांची?"

"आजची रात्र धकायला हवी. आतां शांत झोप लागली आहे—" आपल्या नादांत बडबडत तो इसम वाड्यांत शिरला.

म्हातारा मेला नव्हता तर! आपल्याला हसूं आलं हें भैय्याला जाणवलं. तो एकदम खुलला. दत्तूकाका शांत झोपले आहेत. आजची रात्र अशीच धकेल! उद्यांचा दिवस गेला कीं परवां...भय्या ढांगा टाकीत घरीं परतला. दारांतूनच बायकोला हांक मारायची त्याची इच्छा होती. पण मांडवांतला एक दिवा ठेवून बाकी सगळे मालविलेले होते. बायका दमून आडव्या झाल्या होत्या. मुलं लोळत होतीं. रमीचा डाव आटोपत आला होता. भैय्याला दार उघडीत नानासाहेब म्हणाले,

"कुठें रात्रीचे हिंडतां? आजारी पडाल. उद्याचा दिवस काढायचाहे. कामं बरींच राहिलीं आहेत. परवां एकदां लग्न लागून जेवणावळ बसली कीं..."

उद्यांचा दिवस दत्तूकाकांना काढायचा आहे. केवढं संकट आलं आहे काय कल्पना तुम्हांला—भय्या सासऱ्याच्या नजरेला नजर न देतां निमूटपणें आंत गेला. पाणी पिऊन मांडवांतच एक तक्क्या उशाला घेऊन आडवा झाला.

तक्क्यावर डोकं ठेवलं, डोक्यावर तक्क्या दाबून ठेवला—पण भैय्याला झोप येईना. मनावरचा ताण जरा सैल झालेला होता—पण उगाचच भलतींच दृश्यं बंद डोळ्यापुढें येत ...मिटे डोळे करून टक लावून पाहणारी त्या बाईची सावली दिसे. केसकरांच्या घरीं रडारड चालल्याचं ऐकू येई. ती कमी होण्यासाठीं सातआठ भटजी उच्च स्वरांत मंगलाष्टकं म्हणूं लागत. 'ताराबलं चंद्रबलं तदेव लक्ष्मीबलं' ची जलद सुरू होई व जीव भांड्यांत पडे. तोंच कोपऱ्यांत बसून रडणाऱ्या चित्राचा चेहेरा समोर येई. पानसुपारीची गडबड, पंगतींतले वास... प्रेतयात्रेची तयारी, स्मशानाला अग्नि—सकाळ झाली तरी भय्या ह्या त्रासांत घोळून निघत होता.

सगळी सकाळ घाई गर्दींत गेली. अगदीं फुरसत मिळाली नाहीं. बोलावणी, मंडई, पाहुणे, खरेदी—हें सगळं फुकट जाणार, फजिती होणार अशी धास्ती वाटत होती व भय्या निर्जिवपणें सारं करीत होता. लेकीचा विरह होणार म्हणून आधींच उदास झालाय—कार्यं केलीं आहेत कुठं?' 'हौसच नाहीं, मंगलकार्यांत देखील सुतकी वागणं—एकेकाचीं मतं तो ऐकत होता व घराबाहेर पडायची संधि शोधत होता. हीं मतं, हा उत्साह, ही तयारी सगळी फुकट जाईल, इथें कांहीं करण्यापेक्षां केसकरांच्याकडे काय चाललं आहे हें पाहा—असं म्हणणं तो सादरचं टाळीत होता. लग्नांत घेतला होणार हें भय दाखवून घरच्यांना...

पोट ठीक नाहीं ह्या सबबीवर नुसतं ताक पिऊन तो सकाळ संपतांच सटकला व केसकरांच्या उंबरठ्यांत आला. म्हातारा जिवंत होता! उंबरठ्याआडच होता. उंबरठ्यावर उद्यां धान्यमापच लवंडणार होत! हंसरा चेहेरा करीत तो बाहेरच्या अंगणांत घुटमळला. जोत्यावर कुणी पाहुणे मंडळी बसली होती—त्यांच्याकडे पाहून हंसू लागला.

कुणी त्याला अगत्य दाखवलं नाहीं. कुणी ओळखीचंहि दिसेना. केसकर, त्यांचा चुलत भाऊ, लग्न जमवणारा मध्यस्थ, नवरा मुलगा—सगळे दत्तूकाकांच्या भोवती असणार. खरं म्हणजे भैय्यानेंहि वर जायला हवं. दत्तूकाकांची वास्तपुस्त करायला हवी. समाचाराला...पण काल त्याला 'वर जाऊं नका' म्हणूनच सगळं सांगितलं. अंगणांतल्या बाकड्यांवरच बसवलं—बाकड्याशीं घुटमळत भय्या उन्हांत उभा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

होता तेवढ्यांत आंतून डॉक्टरच आले. अन् बरोबर दत्तूकाकांची पत्नी होती.

दाराशीं पोचल्यावर बाई डॉक्टरांशीं बोलल्या व गंभीरपणें परतल्या. भैय्यानें दत्तूकाकांच्या कुटुंबाला प्रथमच पाहिलं. काल दुरून दिसलेली सावली व आज ही पुढ्यांत उभी. ती सावलीच जास्त स्पष्ट नि तेजस्वी भासली; ही आकृति अस्ताव्यस्त आवतारांतली; नजरेंत न ठरणारी वाटली.

थिजलेल्या मेणासारखा चेहेरा करुन पचपचीत आवाजांत भैय्या उद्‌गारला,

"बरे आहेत नं काका ?

"कोण आपण ?" ती थबकत, समोर पाहात म्हणाली.

"मी—मी नवऱ्या मुलीचा बाप. उद्यां लग्न आहे ना!"

उद्यांच लग्न ?" ती आता भय्याकडे बघूं लागली. जणूं कांहीं तरी नवी बातमी ऐकली अशा नजरेनें पाहूं लागली. तीहि नजर लोपली. भय्याकडे ती रोखून विचित्रपणें पाहूं लागली.

भय्याला उगाचच अपराध्यासारखं झालं. जरा अजीजीनें—जरा आधीरतेनें तो म्हणाला,

"सात सोळाचा मुहूर्त आहे. ह्या वेळेपर्यंत उद्यां जेवणावळहि संपेल. काल आम्ही गांवाहून आल्याबरोबर इथें भेटायला आलों तेव्हां आजाराचं कळलं. आतां बरं आहे ना! पडेल आराम. एकदां अक्षता पडल्या कीं..."

त्या स्त्रीची नजर आणिक टोकदार झाली व भय्या एकदम गप्प झाला. आपण काय बोललों तें त्याला आठवेना. पण आपण जणूं ऊर बडवला, भीक मागितली...

आंतून केसकर व मध्यस्थ घाईनें आले. त्या स्त्रीला धरुन आंत नेऊं लागले. "काकू—तूं इथपर्यंत कशाला आलीस ? डॉक्टर काय वेगळं सांगणार आहेत ? औषध दिलंय ना अतां—त्यानं बरं वाटेल. तूं वर चल पाहूं. झोप जरा. कालपासून तुला झोप नाहीं. पोटात अन्न नाहीं. तूं पड जरा. आम्ही बसतो काकांजवळ..." दोघेहि म्हणत होते व काकूंना दंडाला धरून बळेंच नेत होते.

भय्याकडे बघणारी नजर कष्टानें दूर करीत ती स्त्री निघाली. तिच्या बघण्यांत राग नव्हता. जाण्यांत जीव नव्हता...माझ्या पतीमुळें, माझ्यामुळें तुमच्या मुलीचं लग्न रद्द होत आहे. तुमची लेक पांढऱ्यापायाची असं काल भावोजी म्हणाले. खरं म्हणजे आम्हीच ह्या मंगल कार्यांत विघ्न घातलं. माझ्या कुंकवापायीं एका अश्राप मुलीचं मंगळसूत्र बांधायचं राहिलं. माझ्या सुनेचं ! आई आजारी पडल्यावर लहानग्या बाळूला मी माझ्याकडे नेलं, लळा लागला, वाढवलं—त्याच्या बायकोचं. मी अपराधी !...

भैय्याला वाटलं, पुढें व्हावं व त्या स्त्रीसमोर उभं राहावं. मार्ग काढा, कांहींतरी सांगा केसकरांना, डोक्यावर अक्षता पडूं द्या, माझ्या मुलीसाठीं ...त्याला वाटलं ती स्त्री ऐकेल. तो जरा पुढेंहि झाला. पण दोघांच्या डोळ्यांचा संवाद इतरांना समजला नाहीं. भय्याला टाळून तिला आंत नेलं. सगळा शुकशुकाट झाला.

अंगणांत उन्ह चांगलंच चटके देत होतं. बांकहि तापलं होतं. बाकाच्या हातावर एक हात ठेवून दुसऱ्या हातानें मानेवरचा घाम पुसीत भय्या उपाशी उभा होता. त्याच्याकडे कुणाचं लक्ष नव्हतं. कुटल्याहि क्षणीं 'आपल्याला इथून हाकलतील असं त्याला भय वाटत होतं. इथून जाणं शहाणपणाचं होतं. 'लग्न टरलं' म्हणून पहिल्या बैठकींत ठामपणें म्हणालेले केसकर काल 'लग्न पुढें ढकललं' म्हणून बोलून पाठ फिरवून गेले होते. दत्तूकाकांच्या जीवावर सगळा समारंभ व सगळा संसार थाटायचा अन् त्यांनाच जर...विनवण्या करणंहि अमानुष होतं. तरी माया वेडी म्हणून भैय्या लाचारपणें दाराशीं उभा होता.

आधीच येऊन पडलेलं नारळाचं पोतं उचलीत दोन गडी वाड्याबाहेर निघाले अन् भय्याचं आतडं तुटलं, माळ्यावरून पऱ्यावर कुणीतरी आलं, थर्मामिटर बघून परतलं. स्वैपाकघरांतून कांहींतरी घेऊन कुणीतरी घाईनें वर गेलं. दोन स्त्रिया सोप्यावर आल्या व भैय्याकडे पाहत परत आंत गेल्या. कुणी मूल मोठ्यांदा रडूं लागलं नि गप्प झालेला तो वाडा चपापला. कुणीतरी त्याला दबेच गप्प केलं. शांत झालं अन् त्यानें अधिकच भेसूर वाटूं लागलं. ती शांतता, माणसांची हलक्या आवाजांतलीं बोलणीं, चोरट्या हालचाली, ओढलेले चेहेरे...आणि त्यांतच नवरा मुलगा खांद्यावर धोतराचा सोगा टाकीत बाहेर डोकावला.

"बाळासाहेब—" उन्हाचे चटके बसत होते तरी भय्यानें नव्या आशेनें हांक मारली.

बाळासाहेबांचं लक्ष गेलं. त्यांची उतरलेली मुद्रा अधिकच पडली. जडपणें ते भैय्याकडे आले व नखं कुरतडत वरांत बघूं लागले.

"बाळासाहेब, दत्तूकाकांचं कसं आहे ?"

"ह्या हार्ट पेशंटचं कांहीं सांगतां येत नाहीं. आतां ठीक आहे तर दुसऱ्या क्षणाला..."

"पण अशा स्थितींत समारंभ पोस्टपोन् कशाला करायचा ? होऊन जाईल सगळं. फक्त सोळा सतरा तास आहेत. बँडबिंड जाऊं दे, मोठी पानसुपारी नको—पण साधा विधी. आवश्यक तें धार्मिक..."

"तुम्ही बाबांच्या जवळ काल बोललांत ना सगळं ?—"

"हो. पण त्यांना मी पटवूं शकलों नाहीं."

"मग मी काय अधिक करणार ?"


शुद्ध ताजे लोणी
निर्मळ ताजे तूप
खानदेशी कसदार चक्का
मलईसह दूध
ह्या साठीं गेलीं ३० वर्षे सर्वमान्य
सामंत ब्रदर्स
दादर स्टेशन समोर; मुंबई, २८ (प. रेल्वे.)

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

Happy Diwali Greetings

# MAHARASHTRA INDUSTRIAL CO.;

Loyal Services to Pharmaceutical and Industrial Companies —

Packaging Wooden Boxes, Crates,

Building Material in teak etc.

*"We stand to serve for betterment of everything.*

*Address* :

**19, Airview Building,
Pandit Nehru Road,
Vakola, Bombay – 55.**

**Mangesh R. Wagle,** M. A.
*Managing Partner*





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

"तुम्ही कदाचित्–कदाचित् काकूंना सांगून."

"काय बोलतां हें !" प्रथमच भावी सासऱ्याच्या दृष्टीला दृष्टि देत बाळासाहेब जरा चपापून–जरा चिडून म्हणाले, "काय–म्हणतां काय!—काकूवर केवढा प्रसंग आलाय. काकांच्यावर केवढं प्रेम आहे त्यांचं. एक दिवसभर देखील ती दूर झाली नाही त्यांच्यापासून...काकांना व्यापारांत टोकर बसली. काका राख फासून घराबाहेर गेले,—काकांनी बाई ठेवली —पण सगळ्या प्रसंगांत काकूंनीं क्षण-भरहि...छे छे–मला मुलासारखं मानलं त्यांनीं अन् मी स्वार्थीपणानें त्यांना सांगू की..."

बाळासाहेबांचा आवाज घोगरा होत गेला व हुंदका येऊन ते गप्प झाले. माळ्यावर कांहीं हालचाल झाली व तिकडे पाहत ते घाईनं गेले. भय्या खेटरं मारल्यासारखा, खेटरासारखा उन्हांत उभा राहिला. एकदां माळ्यावरच्या जिन्या-कडे पाहत, एकदां दिंडीदरवाज्याकडे पाहत...

उन्हानें व काळजीनें अखेर त्याला घेरी येणारसं वाटलं. धीर करून तो हालला व सोप्यावर जाऊन बसला. जरा तरतरी आली. अन् मग तो रागानें भरून गेला. काय–चाललं आहे काय नाटक हें ! दत्तूकाका मेला नाहीं ना ! हृदयाचा झटका कांहीं पहिलाच नाहीं ना ?—नवऱ्या मुलाचा सावत्र काकाच आहे ना !—सगळं स्वच्छ असून कशाला घोळ चालविला आहे ? काकाचा पैसा लुबाडायला काय ? अरे, मी स्वतःला विकतो नि देतो पैसे तुम्हांला. बुडवायला निघालांत तर मला पुरतं बुडवा—पण माझ्या लेकीला का पांढऱ्या पायाची ठरवतां ! तिच्यावर कां प्रहार ? आम्ही काय पाप केलंय ! काकाला हॉस्पिटलमध्यें टाकतां येत नाहीं ? औषधावर एक दिवस जगवतां येत नाहीं ?—काय तमाशा करतां नि प्रेमाचं प्रस्थ माजवतां ? आम्ही काय वाटेवरचे चोर आहोत ? तुमची आमची सोयरीक होणार नि—वाहवा रे, काय सोयरे, काय व्याही...भय्या रागानें थरथरूं लागला. स्वतःशींच पुटपुटूं लागला.

सूर्य कलला होता व सावल्या पसरत होत्या. सगळी दुपार भय्यानें अंगणांत उभ्यानें काढली होती. कातडी भाजली होती. काळीज पोळलं होतं. आतां सोप्यावर बसूनहि मन निवत नव्हतं.

असाच थोडा वेळ गेला व खुद्द केसरकरच आंतून आले. धीर गंभीरपणें, एक एक पाऊल टाकीत भय्याच्या रोखानें. भय्या तरारून उठला. दत्तूकाका गेले ?

"काकांना झोप लागली आहे. मी जरा ेळ पडतो. तुम्ही जा. किती वेळ थांबाल ?"

"मग उद्याचं..."

"कसलं उद्याचं ? अजून संकट टळलं नाहीं. नि असं घाईत लग्न उरकणं आम्हांला पसंत नाहीं. सगळं स्थिरस्थावर झालं की भेटा मग. आतां जा. आधींच आम्ही काळजींत आहोंत नि त्यांत तुमची भुणभुण..."

भैय्याला जा म्हणत केसरकर स्वतः आंत गेले व पलंगावर पडून राहिले. दाराखिड-क्यांत प्रकटलेलीं घरांतलीं माणसं अदृश्य झालीं व भय्या एकटाच सोप्यावर उरला.

आतां परत जाणं भाग होतं. चार तास वाट पाहून, विनवण्या करून उपयोग झाला नाहीं. काका अजून श्वासोश्वास करीत होते व समा-रंभाची शक्यता वाटत होती. पण केसकरांचा निश्चय कायम होता. घरी जाऊन लग्नाची तयारी गुंडाळायला त्यांनीं भय्याला सांगितलं होतं.

कसं शक्य आहे ? घरीं काय सांगायचं ? कालपासून कौशल्यानें लपविलेली गोष्ट कशी फोडायची ? आतां बायको केसकरणीला भेटा-यला येईल. घरीं तोरण लागलं असेल. देवकाची तयारी झाली असेल. आणिक पाहुणे आले असतील...लग्न रद्द ! लग्न होत नाहीं !... लगबगीनें लामणदिवा घेऊन जाणारी मुलगी भय्याला सारखी दिसूं लागली. 'ताराबलं तदेव' चे स्वर कानावर आदळले—छे, मांडव कोस-ळला होता. होमांतून राख उधळत होती. मैना रडत होती. चित्रा बेपत्ता झाली होती. डोक्याला पंचा गुंडळून नानासाहेब व मेहुणे बसले होते. भय्या घेरी येऊन सोप्याच्या खांबाला टेकला.

अर्ध्या एक तासानें भानावर येऊन भय्यानें बघितलं तों दोन्ही मेहुणे दिंडीदरवाजांत उभे होते. लखनवी झब्बे घालून. एकाच्या गळ्यांत लॉकेट, दुसऱ्याच्या हातांत चांदीची वाटी. भय्याला ब्रह्मांड आठवलं. लटलटते पाय सावरीत तो दाराशीं धावला व दोघांना बाहेर ओढूं लागला.

"कुठें होतात दिवसभर—मैनाताई येणार आहे इतक्यांत...बरं नाहीं तुम्हांला ?–हुंड्यावर अडवलंय ?...काम झालं...?..."

दोघांच्या खांद्यांचा आधार घेत भय्या रस्त्यावर आला. त्याची लांब, दाट सावली केसकरांच्या दिंडीदरवाजावर पडली. त्याला वाटलं, आपली सावली अशीच तीन मजले चढून पत्र्यावर पसरावी. उभट अरुंद जिन्यावर पडावी. त्यानें सहज वर पाहिलं. मावळतीच्या झगमगत्या उन्हांत पत्रा चमकत होता. जिना अंगावर आल्यासारखा वाटत होता, पायरीवर ती स्त्री बसली होती. ती तिथें होती. भय्याला खुणावत होती. वर बोलावीत होती!

भय्या चपापला. थबकला. डोळे फाडून बघूं लागला. खरोखरच ती स्त्री त्याला बोलावीत होती. डोळ्यांनीं, हातांनीं ! भय्याच्या मनांत अनेक कल्पना आल्या. खिडकींतून मघाशी ऐकणाऱ्या बायकांत हीही होती ?...हिनें आपला आकांत ऐकला ? शक्य आहे–ह्या स्त्रीलाच समजूतदारपणा आहे. तीच सगळं ओळखेल व मुहूर्त साधायला सांगेल. तिच्या शब्दावर केसकरांचं घर नि हें लग्न मोडलेलं आहे. ती म्हणाली कीं...

आवेगानें भय्यानें दोन्ही मेहुण्यांना दूर ढकललं व तो मुसंडी मारुन दिंडीतून आंत गेला. मेहुणे मागें राहिले. अंगण ओलांडलं. सोप्या-वरून तो वेगानें मजले पार करूं लागला. बाळासाहेबांच्या अंगावरून, केसकरांना दूर सारून, मुलांबायकांना ओलांडून पत्र्यावर आला. सगळे चकीत होऊन पाहूं लागले. झोपलेल्या दत्तुकाकांना हा उठवतो की काय ! तो त्यांना अपाय करील, त्यांना साकडं घालील...काळ-जीनें जो तो भय्याच्या मागोमाग धावूं लागला.

जिन्याच्या शेवटच्या पायरीवर ती बसली होती. आपलं गलेह्लठ शरीर कसंबसं टेकवून. बटबटीत डोळ्यांनीं कुठें तरी पाहत. भय्या तिच्या पुढ्यांत धाप टाकीत आला. जरा हंसला जरा लाचार झाला.

ती स्त्री बराच वेळ बोलेना. भय्या डोळ्यांत प्राण आणून उभा राहिला. त्याच्यामागें काळजीनें

स्वादिष्ट मिठाईके लिये !
शर्मा स्वीट मार्ट
दत्त मंदीरके पास, मार्केट रोड, पूना २.

अनुक्रमणिका




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

त्राग्यानें घरांतलीं माणसं जिन्यांत गोळा झालीं.

बाईनीं अखेरे बळ आणलं व खणखणीतपणें म्हटलं,

"...लग्न मोडूं नका. लांबणीवर टाकूं नका. माझ्या सुनेला दुखवूं नका. मी मुहूर्त पाहिलाय. मी मुलगी पसंत केलीय. लग्न उरकून घ्या. मी नसले, हे नसले तरी बिघडत नाहीं. मी इथें बसून आहे. हे आंत झोपले आहेत. आम्ही इथून आशीर्वाद देऊं. आमची शपथ आहे. ह्यांची शपथ आहे...इथें कुणी येऊं नका... मांडव घाला, देवक ठेवा..."

ती गप्प झाली व डोळे मिटून बसली. दत्तूकाका आंत होते व त्यांची अर्धांगी वाट अडवून बसली होती. तिची आज्ञा झाली होती. दत्तूकाकांची शुश्रुषा, काळजी–कशाकडेच न बघतां मुहूर्त साधायचा होता. अन् अवधी थोडा होता.

भैय्या आनंदाने चिंब झाला...लक्ष्मन दिवा घेऊन कुणी लगबगीनें चालूं लागलं. 'ताराबलं चंद्रबलं तदेव'ची घाई सुरुं झाली. वाजवा रे वाजवा...अत्तरदाणी, गुलाबदाणी...जिलबीचा पाक व उदबत्तीचा सुवास...होम, सप्तपदी, कन्यादान...भय्या तसाच वळाला. जिन्यांत दिङ्मूढ होऊन उभ्या असलेल्यांचं कोंडाळं फोडून पळत खालीं आला. अंगणांत उभ्याअसलेल्या मेहुण्यांचे हात ओढीत घरीं धावूं लागला.

मग अनेक भुईचक्रं एकदम पेटावींत व गरगर फिरत राहावींत तसं लगीनघाईला उधाण आलं. केसकरांच्याकडे व भय्याकडे. दिवसभर मनाला पडलेला ताण गेला व भय्या अवखळपणें वागूं लागला. बायकोला हाका मारूं लागला. चित्राची चेष्टा करूं लागला. आलेल्या संकटाची हकीगत त्यानें रंगवून घरीं सांगितली नि सगळ्यांना गंमत वाटली. सासऱ्यानें तेवढ्यांत भय्यालाच बोल लावला. 'अहो–मला सांगायचं —मी केलं असतं ठीक...' सासरेबुवा म्हणाले व भय्या खुळ्यासारखा हंसला.

तीन चार तासांत नवे कपडे घालून, तरतरीत मनानें भय्या व मैना व्याहीभोजनासाठीं केसकरांच्या वाड्यांत शिरलीं. अंगणांत गडी लावून मांडव घातला जात होता. दुपारीं शुकशुकाट होता, सुतकी वातावरण पसरलं होतं व आतां वाडा गजबजला होता. केसकरांनीं काकूंच्या शब्दाखातर सगळा मांड मांडला होता. तिसरा मजला बंद करून सगळे खालीं कामाला लागले. मागील दारीं पन्नास माणसांचा स्वैपाक शिजूं लागला. चांदीच्या ताटांत भैय्या जेऊं लागला तेव्हां सोप्यावर वाजंत्री वाजूं लागली.

दोन्ही घरों रात्र जागून काम करण्यांत गेली. पानसुपारीची तयारी, अहेराची तयारी; देवक बसवणं, रुखवत तेलफळ, जेवणावळींची व्यवस्था—कुणाला उसंत नव्हती. जादा रक्कम देऊन जरुरीचा माल आणला जात होता. पण सगळं हंसत खेळत होत होतं. भैय्या तर खुलला होताच, पण केसकरहि हिरीरीनें, आनंदानें प्रत्येक गोष्टींत रस घेत होते. भैय्याला दुखवल्याचं त्यांना बोचलं होतं. अन् बाळासाहेबांनीं तर सीमांतपूजनाच्या वेळीं सासऱ्याची चक्क क्षमा मागितली.

बाळासाहेब सजवलेल्या मोटारींतून वधूघरीं आले. बोहल्यावर उभे राहिले. करवली लामणदिवा सावरीत आली. भय्यानें तें पाहिलं आपण स्वप्नांत तर नाहीं? कालची दुपार दैवानें चटके दिले. अन् आज? लेक उजवली. आपल्याला जांवई आला. मुहूर्त अक्षरशः हातावर आला. भय्याचे डोळे भरून आले. तो आपल्या खोलींत जाऊन बसला. बाहेर 'ताराबलं चंद्रबलं तदेव, लक्ष्मी बलं'ची द्रुतलय सुरू झाली...

बॅंड एकदम गर्जूं लागला, माळा घातल्या गेल्या व भैय्या थरथरला. डोळ्यांतून पाणी ओघळलं व नकळत त्यानें हात जोडले. देवाने अब्रू राखली. त्याला एकदम दत्तूकाकांची आठवण झाली. म्हातारा जगला म्हणून मुहूर्तवेळ जमली. त्या साध्वीनें स्वतःवरचा प्रसंग गिळून परवानगी दिली म्हणून—

भैय्याला एकदम वाटलं, नमस्कार करायचा तर त्या स्त्रीला करावा. तिनेंच लाज राखली. मोठेपणा, देवपणा दाखवला. काल तिचा निरोप घेतल्यापासून भैय्याला तिची आठवणही आली नाही. निरोप कसला—तिनें परवानगी दिली तेव्हां तिचे आभारही मानले नाहींत. सीमंतपूजनाच्या वेळीं ती जिना उतरुन खालींही आली नाही केसकरांच्या घराला तोरण लागलं व सगळे लग्नाच्या तयारीला लागले तेव्हां तिनें कुणाला काकांच्या शुश्रूषेला येऊन दिलं नाही. तस्त औषधं—कांहीं नाही, पक्वान्नं, पानसुपारी यांतच सगळ्यांना गुंतवलं. स्वतः माळ्याच्या दारांत बसली. आजाऱ्याची छाया नको म्हणून वरघोडा निघण्यापूर्वी बाळूला पायां पडायलाहि परवानगी दिली नाही. सगळं नंतर! आधी धडपणें माळ पडूं दे. मुहूर्त साधूं दे!—मग पायां पडणं, आशीर्वाद घेणं सुनमुख बघणं! लग्नाला ती आली नाही नि सगळ्यांना धाडून नवऱ्याला सोबत करीत बसून राहिली. केवढी समजुतदार! मानलेल्या मुलावर माया करणारी, हळद लावलेल्या सुनेचं सुख सांभाळणारी...

भैय्या एकाएकी निघाला. बोहल्यापासून गर्दी हटली होती. होमाचा धूर वाढत होता. पानसुपारी वाटली जात होती. नानासाहेबांनीं त्याला बोलावलं पण तो तसाच पुढें गेला. दारशीं पडलेली सायकल घेऊन केसकरांच्या वाड्याकडे निघाला. सगळ्यांच्या आधीं, नव्या जोडप्यानें पायां पडायला येण्यापूर्वी, त्या स्त्रीचे आभार मानायला धावला.

दिंडीशीं सायकल टाकून भैय्या अंगणांत गेला. घरांत शुकशुकाट होता व अंगणांत कोवळीं उन्हं पसरलीं होतीं. सगळे लग्नाला गेले होते. सोप्यावर गडी तंबाखू चघळीत होता. त्याला टाळून भैय्या वर धावला. तिसऱ्या मजल्याच्या पत्त्यावर आला. उभट अरुंद जिन्याच्या शेवटच्या पायरीवर, माळ्याच्या दाराच्या चौकटींत ती स्त्री बसली होती. तिच्या पुढ्यांत प्रसन्न मनानें व उतराई मुद्रेनें उभा राहिला.

"लागलं लग्न?"

"हो—आत्तांच! मी मुद्दाम आलों. तुमचे आभार मानायला. तुम्हाला नमस्कार करायला. तुम्हाला—नि काकांना! काका ठीक आहेत ना? झोप लागली आहे?"

ती स्त्री जणूं झोपेंतून जागी झाली. काल संध्याकाळपासून ती जिन्यांत बसली होती न झोपतां, कुणाशीं न बोलतां. आतां तिला भान आलं, तिचं अवाढव्य शरीर दाराच्या चौकटींत गदगदलं. एकदम ती रोड, क्षीण भासूं लागली. वेड्यासारखी दिसूं लगली. तिचा चेहेरा ढवळून निघाला. कसंबसं ती म्हणाली.

"झोपले आहेत. काल तुम्ही वर आलास —त्याच्या आधींच! त्याच्या आधींच ते गेले ...ते गेले नि मग मी तुम्हांला वर बोलावलं... गेल्यावरहि त्यांनीं हें घर सावरलं...विधवा होऊनहि मी वांझ बाईसारखी वागलें नाहीं... माझ्या बाळूचं लग्न लागलं...मला सून आली; अन् मला—"

कपाळावरचा मळवट पुसायचा तिनें यत्न केला, पण त्या आधींच तिची शुद्ध गेली. नवरा मेल्यावर चौदापंधरा तास तिनें शोक दाबून ठेवला होता—तो दाही दिशांत भरूं लागला. कोंडून ठेवलेला मृत्यु केळी बांधलेल्या केसकरांच्या वाड्यावर सावट धरूं लागला. गृहप्रवेशाआधीच घराला सुतक आलं. आणि त्या घराण्यावर अधिकार चालविणारी ती स्त्री मूर्च्छा येऊन माळ्यावरच्या पतीच्या कुजूं लागलेल्या प्रेतापुढें पडली. • • •

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

नाण्यानाण्यांतील फरक व नाण्यांतील फरक यांतील सूक्ष्म भाव व्यक्ती व्यक्तींत दिसून येत नसले तरी नामरूपांत दोन्हीहि भेद स्पष्ट दिसून येतात. एक ईश्वर निर्मित व एक समाज आपल्या हुकमी अधिकारांत करत असतो. जन्मलेल्या व्यक्तीचें नांव त्याचे आई बाप ठेवत असले तरी तें कार्य ते समाजाचे प्रतिनीधि म्हणून करतात. तात्पर्य समाजांत समानतेचा भाव स्पष्ट करण्यासाठी व्यक्तींचे विभिन्नत्व सामाजिक संकेत सामाजिक मूल्ये या मार्गांनी समाज सतत दाखवित असतो. व ह्या दृष्टीनें विचार करतां एखाद्या व्यक्तीनें कांही पोशाख केला कांहीं शीरस्त्राण घातलें तरी तें सर्व त्याला समाजाच्या सांस्कृतिक व सभ्यतेच्या मर्यादेंत राहून करावें लागतें. व्यक्ति कितीहि एकांगी असली, एकट्ली असली तरी तिचें मन अगर स्वभाव ही निरपेक्ष वस्तू नाहीं. (ॲब्सोल्यूट कॅटेगरी). म्हणून जे समाजाला सोडून समाजाला अनाकलनीय, अलग अगर अकल्पित असें कांहीं असूं शकत नाहीं.

माझ्या डोळ्यांपुढें गेल्या ६३—६४ वर्षांच्या आठवणींचा काफिला चाललेला मला दिसत आहे. या चालींच्या प्रमुख ठिकाणीं जें दिसत आहे तें असें कीं, डोक्यावर कांहीं तरी कुंचलें आहे. तें एकरंगी नाहीं व त्याचा बहुरंगपणा ज्या डोक्यावर तें घातलें आहे, त्याच्या भावी इतिहासाची कुंडलीच तो आहे. संस्कृत साहित्यकार असें मानतात कीं नाटकांतील सूत्रधार जें बोलतो त्यांत पुढें येणाऱ्या नाटकांतील घटनांचें सूक्ष्मपणें दिग्दर्शन केलें जातें. तसेच हें बहुरंगी कुंचलें घालून माझ्या जीवनांतील सूत्रधार माता पितरांनीं ते रंगी बेरंगी टोपडें घालून नकळत भविष्याचा संकेत दिला असावा त्यानंतरच्या आठवणींत असें दिसून येतें कीं कुंचलें जाऊन कानटोपी आली आहे. डोक्याच्या संरक्षणाबरोबर कोणीतरी कांहीं—तरी कानामध्यें सांगून मुलाला फसवूं नये म्हणून कानटोपीद्वारा काळजी घेतलेली दिसून येत आहे. भावी आयुष्यांत न बोललेलें ऐकू येण्याची कला मला वाटतें याच बंदोबस्ता-मुळेंच प्राप्त झाली असावी. मानसिक शास्त्राचे तज्ञ असें सांगतात की जें असेल, दिलें असेल, त्यापेक्षां नसेल, दिलें नसेल याकडे मनाची प्रवृत्ति अधिक असते. जें ऐकूं येत असेल त्यांत कौतुक मानण्यापेक्षां जें ऐकूं येत नसेल त्याकडे प्रवृत्ति वाढत जाते. पुस्तकांत जें विवरलें नसेल जें सांगितलें नसेल, व्याख्यांनांत जें



# हळद लावुनी आलें ऊन



बा. भ. बोरकर

हळद लावुनी आलें ऊन
कुंकुमाक्षता फुलांमधून
झाडांमधुनी झडे चौघडा,
　　घुमतें पाणी लागुन धून
नाचुन मिटली श्रावणधार
शीतळ पाऱ्यापरिस दुपार
निळींतुनी हिरव्यांत भुरळ्लीं
　　पिवळीं सोनपिसोळीं चार
उभार साळी भरून दूध
हवेंत सजणी कापुर ऊद
शेरवडाच्या ढवळ्या पानीं
　　उधळे ऋतुचें लक्ष बिरूद
लावण्याचा लागुन बाण
तृप्तीलाही फुटे तहान
मला खोवुं दे तुझ्या कुंतलीं
　　एकच यांतिल पान लहान

प्रतिपादिलें नसेल तें ठासून सांगण्याची महा-राष्ट्राची प्रवृत्ति मला वाटते महाराष्ट्राच्या मुलांना कानबंद करणाऱ्या टोप्यामुळें निर्माण झाली असावी. मूल चालूं लागले म्हणजे शरीरा-बरोबर त्याच्या मनालाहि गति प्राप्त होते. मनहि इकडे तिकडे बागडूं लागतें शरीराप्रमाणें तेंही ठेचाळत असावें व त्याला वाटणाऱ्या अडचणी व दुःखें आपापल्या परीनें तें अभि-व्यक्त करीत असतें. अप्रबुद्ध मन अफाट विश्वाशीं मुकाबला करीत असतें. शक्तिपेक्षां जास्त ओझें त्याच्या मनावर असतें व म्हणून मला वाटतें की माळव्यांत रहात असल्यानें मुरमुरेवाले भैय्ये अगर भडमुंजे हे जशी हलकी टोपी घालीत तशी मी घालीत असें. डाकेच्या मलमलचा तागा अंगठीच्या भोकां-तून काढला जात असे असें, म्हणतात. मी घालत असलेली टोपी लहानपणींच्या मुठींत मावली जात असे क्षणभर एका खास अर्थानें माझें डोकें माझ्या मुठींत असे. माळव्यांतील प्रदेश रजपुती बाण्याचा आणि त्या बाण्याचें प्रदर्शन तेथील सरदार मंडळी आपल्या लहान लहान मुलांना चुनीदार विजारी घालून व डोक्याला फेटे बांधून करत आणि त्यांच्या सहवासांत नित्य येणाऱ्या माझ्या वडिलांनीं अनेक वेळां मला सजवलेलें आठवतें. लटपट णारे पाय तंग विजारीनें स्थिर होत नाहींत अगर थंड डोक्यावर रजपुती फेटा बांधल्यानें राणा प्रतापसिंगाचा आवेश येत नाहीं. तथापि स्मृति ग्रंथांत असें आढळून येत आहे कीं ते शिरस्त्राण परिधारण केल्यानंतर मी ऐटीनें वागत असें व कौतुक केलें जात असे असें आढळून येत आहे. •

शिक्षणासाठीं महाराष्ट्राच्या विद्यानगरींत म्हणजे पुण्यांत वयाचे ५ वे अगर ६ वे वर्षी दाखल झालों फेटा वडिलाकडेच ठेवला गेला, व भय्याची टोपी घालून नूतन मराठीच्या प्राथमिक शाळेंत जेव्हां दाखल झालों त्या वेळीं निराळ्या सृष्टींत आल्याचें वाटूं लागलें. कांहीं नवीन अगर कांहीं अनपेक्षित दिसल्यास त्याची टिंगल करावयाची ही पुणेरी वृत्ति ताबडतोब अनुभवास आली व वडिलांकडे असतांना घरीं व बाहेर हिंदी बोलत असल्यानें भाषेचीहि थोडी अडचण पडूं लागली. आणि पुण्यांतील


हायस्कूल तसेंच कॉलेजांतील
विद्यार्थ्यांत वापरण्यांत येत असलेलें
'चरक' चें प्रख्यात टॉनिक

नवजीवन

रुपेरी गोळ्या (औ. नं. ९५)

• अभ्यास किंवा परीक्षेची चिंता
• दुबळी स्मरणशक्ति
• रात्रींचें जागरण
• अनियमित जीवन
• अव्यवस्थित खाणेंपिणें

अशा जाणत्या अजाणत्या कारणामुळें आलेल्या शारीरिक तसेंच मानसिक दुर्बलतेंत ज्ञानतंतूंना पुष्टी देऊन खोटी चिंता दूर करण्यास सहाय्यभूत होतात. सर्व औषधविक्रेत्यांकडे मिळतात.




चरक फार्मास्युटीकल्स
मुंबई—७

व्ही. पी. नें पाठवूं






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

मुलांशीं दोन हात करावयाचे तर त्यांच्याच शस्त्रास्त्राचा उपयोग करुन हे निश्चित केलें. हातांत टोपी घेऊन मारामारी करणें अगर ती तोंडावर फेकणें या लढाईच्या योजनेंत माझ्या भव्याटोपीला स्थान नव्हतें व एक दोन दिवसांचे आंत हट्ट घेऊन नारायणदास छबील-दास यांच्या दुकानांत गेलों, व थोडासा रेशमी कशीदा काढलेली टोपी घेऊन आलों. टोपीमुळें डोक्यांत कांहीं नवीन विचार आले असे म्हणतां जरी आलें नाहीं तरी डोक्याचा उपयोग शमीच्या वृक्षासारखा केला व टोपीचे प्रहरी अस्त्र डोक्यावर ठेवत असे. २–४ दिवसांचे आंत टोपीचें विवरण इतकें झालें की वरची वेलबुट्टींतील फुलें प्रभाहीन झालीं व विद्वानांची चर्चा अधिक झाली म्हणजे जसा विचारांचा चोथा वर येतो त्याप्रमाणें टोपीच्या फेकण्यामुळें आंतील तरट उघड माथ्याने बाहेर आले व दिसूं लागलें. क्षणभर असें वाटलें कीं मानवी जीवन हें असेंच आहे. मुळांतील विद्रूप व अप्रशस्त याला कांहीं सामाजिक उपयुक्ततेचा व किंचित सौंदर्याचा मुलामा चढवून मनुष्य वागत असतो. यानंतर जें आठवत आहे तें असें कीं घरामध्यें मुंजीचा समारंभ चालू आहे. मातृहीन कौतुकाचा विषय झालों आहे. तुकाराम न्हाव्यापुढें बसून डोक्यावरील केस निर्मूल करण्याच्या क्रियेचा विषय झालों आहे. रात्रीं मांडी कापून त्यांत कांहीं करणार आहेत अशी दाखविलेली भीति मनांत प्रवेश केल्यानें तुकारामापुढें बसतांना दोन्ही मांडीवर हात ठेवून बसलों होतों. प्रतिबंधक उपाय हे अधिक प्रभावी हें तत्त्व जणूं कांहीं मी अंमलांत आणत होतों संध्याकाळच्या भिक्षावळीच्या गडबडींत डोक्यावर येणारी टोपी सजलेली दिसून आली त्या वेळच्या नाटकांतील नट जशी भरजरी टोपी घालत सर्कशींतील मॅनेजर जशी भरजरी टोपी घालत त्याप्रमाणें ती टोपी होती. तिचें नाविन्य मला आकर्षक वाटलें पण त्यांतील जरीचें काम विशेष आवडलें नाहीं.

१९०५ ते १० सालपर्यंत सालोसाल दिवाळी अगर दसऱ्याला नवी टोपी मिळत असे आणि हळूहळू दुकानांत नेऊन ही का ती हवी आहे एवढी विचारणा होई. जें पुढें असेल त्यांतून निवड करावयाची निवडीचे क्षेत्र एकाच दुकाना-पर्यंत मर्यादित असे. पुण्यांतील बालाजीच्या जवळ ते दुकान होते व आज जसे 'अशोक हॉटेल' मध्यें दिल्लीस उतरणें हें प्रतिष्ठेचें लक्षण मानलें जातें त्याप्रमाणे नारायणदास छबीलदासची टोपी म्हटली म्हणजे ती राजमुगुटा इतकी प्रतिष्ठापूर्ण मानली जात असे. पुढें अनेक दुकानें झालीं. टोपी घालणारे वाढले, टोपीचे विक्रेते वाढले. माझ्या लहानपणीं मॅट्रिकच्या वर्गांत सुद्धां फेटा घालून येणारे विद्यार्थी दिसून येत नव्हते. घरीं नूतन मराठी विद्यालयाच्या मॅट्रीकच्या पहिल्या बॅचमध्ये पास झालेल्या विद्यार्थ्यांचा फोटो होता व त्यांत सर्वांत थोरले चुलत भाऊ फेटा बांधलेले दिसत होते. किंबहुना सर्व विद्यार्थी फेटेवाले होते. त्यानंतर १५ वर्षांच्या काळांत ते सर्व बदलले होते व आतां तर फेटा गेला. पगडी गेली आणि इंग्रजी टोपी आढळून येत असली तरी ती घालण्यापेक्षां हातांत धरणें प्रतिष्ठेचें मानलें जात आहे. १९१० सालची वेळ असावी आणि आम्ही उभयतांनीं आजी जवळ हट्ट घेतला कीं आम्हाला इटालियन टोप्या हव्यात. ती गोल टोपी त्यावेळी प्रतिष्ठेचें चिन्ह मानलें जाई; व असें सांगितलें जाई कीं एक पिढी टिकते. तिला नवे जुने करतां येतें व यदाकदाचित् डोक्याला वृद्धि आली तर तिलाहि वाढवितां येतें. साधी छबीलदासी टोपी आठ आण्यांत मिळे. व या इटालियन टोपीला साधारण दीड-दोन रुपये पडत ही टोपी घेतली तर ४ वर्षें टिकवूं व पैसेहि वाचतील हा आर्थिक दृष्टिकोन मुत्सद्देगिरीनें मी तिच्यापुढें ठेवला. भावी आयुष्यांत मोठमोठ्या खर्चांच्या योजना अंतीं स्वस्त ठरतात ही सांगण्याच्या कलेची बाराखडी अगर धुळाक्षरें याच प्रसंगानें मी गिरविली. आमची आजी म्हणजे जनतेसारखी भोळी होती व तिनें माझा दृष्टिकोन स्वीकारला व असें म्हणाली कीं चार वर्षें टोपी घेणार नाहीं हरवली तर बोडखा शाळेंत घालवीन व मीहि तिला हल्लींच्या बनेल मंत्र्यांप्रमाणें आश्वासन दिलें कीं मी चार वर्षें तरी टोपी मागणार नाहीं. मला संमति मिळाली त्यांत दोन्ही जेष्ठ बंधुना मिळाली. निदान त्यांनी तसा अर्थ केला व आम्ही त्या टोप्या घेऊन आलों व १९१० पासून १९२१ च्या सुरुवातीपर्यंत एकादश वर्षें त्या टोपीला मी शिरोभागीं भूषवीत गेलों. तिचा गोल आकार मोहक होता. पुनः पुन्हां साफ केल्यानें तिच्यामध्यें 'नवताम् उपयति' असें होत होतें. ह्या ११ वर्षांत २ वेळां १–१ रुपया देऊन तिला उलटे सुलटे केलें होतें व ती अंतरबाह्य एकच आहे ही तिच्यांतील सुसंगति अनुभवली होती. तशी टोपी घालणाऱ्या

(पान १९४ पाहा)


८८ वर्षांची सेवा

मुंबईसारख्या कलाकौशल्यांतील चढाओढीच्या बाजार पेठेंत सोन्याचांदीचे अलंकार निर्माण करणाऱ्या पेढ्यांत हरिवल्लभदास सराफच्या पेढीने आपलें पहिल्या रांगेतील प्रथम स्थान आपल्या अलंकार कलेंतील प्राविण्यानें व दागीन्यांत ठरलेल्या कसाचें सोने वापरण्याच्या सचोटीनें गेलीं ८८ वर्षे कायम राखलें आहे आणि त्यामुळेंच केवळ मुंबईतीलच गिऱ्हाईक नव्हे तर महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांतून मुंबईस येणारी पुष्कळशी प्रवासी मंडळी त्यांना लागणारे सोन्यामोत्यांचे अलंकार हरिवल्लभदास सराफच्या पेढीवर खरेदी करत असतात.

दिवाळी व नवसंवत्सराच्या शुभदिनीं आम्हीं आमच्या कडून आतांपर्यंत सोन्यामोत्यांचे अलंकार बनवून घेतलेल्या असंख्य ग्राहकांचें शुभचिंतन करत आहोत. आम्ही त्यांना दिलेल्या दागीन्याबरोबरच आमच्या शुभेच्छाही त्यांना वर्षोवर्षी देत आहोंत.

हरिवल्लभदास सराफ
परळ ट्राम नाका, मुंबई १२
फोन ६२१४०

*तसं तिला चालतांना पाहिलं कीं मलाच काय पण कुणालाहि कबूतराचीच आठवण झाली असती. कुळकर्ण्यांनी तिला खस्सदिशीं धरून, ओढली आणि तसं धरून तो तिला घेऊन आंत निघून गेला....*



विजय तेंडुलकर



माझ्या काकांची 'श्री जनसेवा ट्रान्सपोर्ट कंपनी' होती. म्हणजे थोडक्यांत त्यांच्या दोन ट्रक्स होत्या; आणि मालाच्या वहातुकीचीं कंत्राटं घेऊन ते त्यावर चांगला पैसा कमवीत. मला हें शेवटचं माहीत, कारण एकादी ट्रक 'ब्रिरेक डौन' झाली किंवा तिला कुठं 'आक्सिडेण' झाला कीं ती वर्दी घेऊन वांकडया तरीहीं निर्विकार तोंडानं आलेल्या काळ्याकभिन्न ड्रायव्हरला किंवा 'किन्नर'ला काका प्रथम सुमारें पन्नास शेलक्या शिव्या घालीत. (मीहि त्यांतल्या दहापांच पाठ केल्या होत्या; आणि त्यांतली एक धाकट्या मामीला देण्याबद्दल बाबांच्या हातचा मारही खाल्ला होता.) तुझ्या अमक्यानं कधीं तमकं केलं होतं का पद्धतीचे निरुत्तर करणारे कांहीं प्रश्न विचारीत. नंतर 'मरा सालेओ' असा तोंडभर आशीर्वाद देऊन किल्ली लावून आलमारी उघडून कांहीं नोटा बाहेर काढीत आणि 'वार्ता विघ्नाची' घेऊन आलेल्या त्या मेणचट मळकट आणि चुरगळल्या दीनवाण्या प्राण्याच्या अंगावर त्या फेकीत. आतांपर्यंत मेल्यागत पहाणारे त्याचे लालकिरमिजी डोळे तात्काळ चमकून उठत. 'देवाजीनें करुणा केली' पद्धतीची मुद्रा करून तो झटपट आणि आश्चर्य वाटावं इतक्या चतुराईनं त्या नोटा होत्या—नव्हत्या करी आणि पुन्हा मुद्रा वांकडी आणि कोरी करून मूळच्या अजागळ लीनपणें उभा राही. काका मग त्याला आणखी कांहीं शिव्या घालीत पण त्यांतला जोष ओसरलेला असे. पुष्कळशी पुनरावृत्ति घडे. शिव्या खाणारा तो माणूसही नाइलाजानं एकादी तार आणणारी जांभई मारी. 'साला रात-भर जागरान कऱ्या' असं कांहींतरी म्हणे. स्वतः सकट कुणालाही जांभई येणं ही काकांच्या दृष्टीनं कोणत्याही चालू विषयाची रीतसर सांगता असे. मग ते तो थांबवीत. इतकंच नव्हे तर तो विसरून जात. पण काकांच्या त्या अलमारींत पुष्कळ नोटा असतात हें मला तेव्हांपासून माहीत होतं. नोटा कधीं संपल्या नाहींत आणि कमरेच्या किल्ल्यांचा जुडगा काकांनीं कुणावर कधीं पातला नाहीं. जागेपणीं ते तो कमरेला आणि झोंपतेवेळीं उशाला घेत. डाराडूर घोरत असतांना देखील, अलमारीच्या आसपास कुठं खुट्ट झाल्यास ताडदिशीं उठून बसून 'कोण ?' म्हणून विचारीत. बाबा म्हणत, "एकटा जीव सदाशिव; एवढें कमवतो आहे त्याचं कर-णाराय काय ? त्या मानानं आमचं बरं." बाबांचं बरं म्हणजे बाबा पोष्टहपिसांत डेप्युटी पोष्टमास्तर होते आणि त्यांना मी एकच एक मुलगा होतों.

काकूचं नक्की काय झालं तें मला तेव्हां माहीत नव्हतं. पण ती केव्हां तरी होती, याच्या खुणा मिळत. आईच्या तोंडीं 'माउली'



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

'त्रिचारो' असे उल्लेख येत. काका कधींकधीं भिंतीवरच्या एका कळकट फोटोवर जोरजोरानं धोतराचा सोगा मारून त्याची कांच शक्य तितकी स्वच्छ पुसत. आंत दिसे तिकडे थोडें टक लावून पहात रहात. आणि पोट हादरवणारा एक लांबलचक उसासा टाकून 'जाऊं दे तिच्यायला' म्हणून कामाला लागत. त्या फोटोंत मीहि पहाण्याचा प्रयत्न केला तेव्हां एक अगदींच किरकोळ बाई मला दिसली. एका मोठ्या नक्षीदार खुर्चीवर एकीकडे ती एकटीच पदर अंगभर लपेटून जन्मठेपेची शिक्षा झालेल्या कैद्यासारखी बसली होती. म्हणजे डोळ्यांत तीच, अक्षिडेण किंवा विरेक डौन झाल्याचं सांगत काकांकडे हमेशा येणाऱ्या ड्रायव्हर मंडळीसारखी चुकीची बिनशर्त कबुली; थोडी भीति, पुष्कळ संकोच. आणि त्याआंत कुठं तरी सुप्त आनंदाची अगदीं पुसट पण निश्चित चमक. काकूनं माझा मोठाच अपेक्षाभंग केला. आमचे काका कसे प्रचंड; दुपारीं झोंपले कीं चित्रांच्या पुस्तकांतल्या बकासुरासारखे वाटत. फार उंच नव्हे असा अस्ताव्यस्त, अगडबंब देह, अंगभर जागा मिळेल तिथें दाट केंस, वरखालीं हादरणारं मोठं पोट, आणि झोपेंत घशावाटें निघणारा घोरण्याचा हिंस्र आवाज! काका असे तर काकू कशी असेल याविषयीं माझी कांहीं कल्पना मी निश्चित केली होती. फोटोंतली काकू पाहून वाटलं कीं हॅत्तेरे! ही कसली काकू! काकांना ही मुळींच शोभली नसेल. त्यापेक्षां काका ट्रकशेजारींच शोभून दिसतात असं माझं स्वच्छ मत बनलं. ट्रक आणि काका जणुं एकमेकांसाठींच निर्माण झाल्यासारखीं वाटत; विशेषतः काका तिच्या पुढल्या नाकावर एक पाय रोंवून एकाग्रपणें दांत आणि दाढा कोरीत कधींतरी उभे असत, तेव्हां.

काकांच्या ट्रक्स दोनच होत्या पण त्यांचे ड्रायव्हर अनंत झाले. नेहमीं ते बदलत, किंबर त्या मानानें जास्त टिकत. काकांच्या ड्रायव्हरांचे जवळ जवळ सगळे चेहरे आणि कांहीं नांवं मात्र आतां आठवतात. त्यांतलीं कांहीं तींच तींच होतीं. उदाहरणार्थ मम्मद. निदान तीन मम्मद काकांकडे ड्रायव्हर म्हणून राहून गेले. मम्मद, ढोल्या मम्मद आणि दाढी मम्मद अशा पाठभेदांनीं ते काकांच्या संग्रहीं नोंदवले गेले. झालंच तर एक हुन्या होता. दोन शिवाजी होते. एक बाजीराव आणि एक मारुति होता. निदान तीन शिंदे, दोन पवार आणि तितकेच घोरपडे काकांचं सारथ्य करून गेले. 'गब्रू' या कांहींशा विनोदी वाटणाऱ्या नांवाचा एक गंभीर म्हातारा ड्रायव्हरही काकांच्या पदरीं कांहीं दिवस अत्यंत गंभीरपणें होता. त्याचें केंस एकूण तीन रंगांचे होते आणि तो नेहमींच थोडाफार 'तयार' असे. हे सगळे ड्रायव्हर येत कुठून आणि नंतर जात कुठें तें एक काकांना माहीत आणि एक त्या देवाला (असलं तर) माहीत. पण माझ्या आठवणीप्रमाणें, एक ड्रायव्हर कधीं दोनदां आला नाहीं.

यांतला कुळकर्णी नांवाचा ड्रायव्हर हा काकांच्या पदरीं सर्वांत अधिक काळ टिकलेला डायव्हर म्हणून गौरवानं उल्लखतां येईल. कुळकर्णी केव्हां तरी ब्राह्मण असावा. त्याचे डोळे पिंगट घारे होते. केंस घुशीच्या केंसांसारखे सदा उभे असत. (तोही ते कधीं बसवण्याचा प्रयत्न करीत नसे. उलट लाडानें उभे करीत असे.) त्यानें चांगल्या पाचुंदाभर मिशा ठेवलेल्या होत्या. यांचें कधीं कधीं तो आंकडे वळवी; आणि नेहमींच त्यांवर ताव मारी. त्याच्या कानालाहि केंस होते. तोंडांत तंबाखूचा तोबरा आणि हनुवटीला दाढीचे खुंट हा तर सगळ्या डायव्हर मंडळीचा ट्रेडमार्कच असावा. कुळकर्णीच्या दोन हातांवर दोन सबंध बाया गोंदलेल्या होत्या आणि सांगायला (अजूनही) संकोच वाटतो कीं त्या 'तशा'च होत्या. कुळकर्ण्याच्या हाताच्या जळक्या तांबूस निबर कातडीवर तर त्या फारच 'तशा' वाटत. मूठ वळून, तिथले स्नायु खुबीदारपणें हलवून तो मला लाजवून पळवून लावी. या प्रकारचं त्याला बरंच कांहीं अवगत होतं आणि एखाद्या लहान पोरानं या बोटावरची थुंकी त्या बोटावर करण्याचा खेळ ज्या हौसेनं वारंवार करावा त्या हौसेनं तो त्याचे हे सारे खेळ सवड आणि मी मिळालों कीं करून दाखवी. कुळकर्णी काकांच्या मर्जीला बराच उतरलेला असावा. तो विरेक डौन आणि आक्षिडेण एकंदरीनं कमी करीत असावा असा याचा अर्थ तेव्हां मी लावला होता. कारण मर्जीला उतरण्यासाठीं काकांच्या आणखी कुठल्याच अटी असल्याचं मला ठाऊक नव्हतं. इतर ड्रायव्हरांना एकेरीच नांव; तर काकांची मर्जी बसल्या नंतर कुळकर्णांना 'गज्या' ऊर्फ गजनान हें उपनांव प्राप्त झालं. म्हणजे कुळकर्णींचं हें मूळ नांव होतं काय कुणास ठाऊक नधून मधून काका या गजाननाला नेहमींच्या 'भडव्या' 'साल्या' ऐवजीं 'गणपतराव' 'गणेशजी' 'गॅगफॅठ' अशा प्रेमळ आणि कौटुंबिक नांवानीं संबोधतांना दिसत. त्याला स्वतःजवळचा 'पेशल' सातारी जर्दा आणि एखाद्या वेळीं दोनचार फुटकळ रुपयेही देत; त्यावरून गजानन ऊर्फ कुळकर्णी—वरचा त्यांचा वाढता लोभ निश्चितपणें सिद्ध होई. हळू हळू कुळकर्णी त्यांचा विश्वासू उजवा हात बनला. (विश्वासू उजवा हात फक्त थोर माणसांना असतो असा तेव्हांचा माझा एक ठाम समज.) त्याला रहाण्यासाठीं काकांनीं त्यांच्या एका रिकाम्या प्लॉटवर जागाही दिली. हा रिकामा प्लॉट आमच्या नव्या घराच्या मागेंच होता. कुळकर्ण्यानं तिथं दोन गड्यांच्या मदतीनं एक खोपट ( पान १८८ पहा )



Best Perfumed Chewing Tobacco for Betel

Toofan Tobacco

Kesaria Patti no. 36

(Regd. no. 176758)

Salgooram Kashinath Perfumers Banaras

Stockists :

Shantilal Kantilal & Co.
Null Bazar, Bombay-3.

H. M. Yasin Tambakuwala
Null Bazar, Bombay-3.




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



ही दिवाळी व नूतन वर्ष
आमच्या ग्राहकांस व हितचिंतकांस
सुखसमृद्धीचें जावो.

## मेसर्स हुकुमचंद ईश्वरदास

( स्थापना १८७८ )

११७, गुरुवार ( वेताळ ) पेठ, पुणें २.



## गुजरात मेटल फॅक्टरी

( स्थापना १९०४ )

२१ नागेश पेठ, पुणें २




TOM & BAY




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट
अनुक्रमणिका

*साहित्य प्रेमी आणि साहित्यिक विदुषी अनेक आहेत; पण शेंगवलींच्या सौ. धनलक्ष्मीदेवीं सारख्या मन-धनानें साहित्य विकासासाठीं झटणाऱ्या विदुषी विरळा. शेंगवलीला त्यांनी 'विश्वसाहित्य परिषद' भरविली होती. त्या परिषदेचें हे सरस सुरस वर्णन...*



# आगळी एक 'सौंस्कृतिक परिषद्'

**मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष**

शेंगवली येथें विश्वसाहित्य-परिषद् कां भरावी हा प्रश्न निरर्थक आहे. विश्वाची कसली ना कसली चिंता वाहाणाऱ्या परिषदा दिल्ली, पॅरिस, टोकियो, मॉस्को, अशा ठिकाणींच भराव्या हें कोणी सांगितलें ? या गाजवलेल्या ठिकाणांइतकाच शेंगवलीहि या विश्वाचा एक भाग आहे. विश्वाच्या वैचारिक आणि आध्यात्मिक व्यापाराची तीहि एक पेठ आहे; मग ती इवलीशी कां असेना ! मुख्यतः याच विचारानें प्रेरित होऊन श्री. सौ. धनलक्ष्मीदेवी द्वादशापत्ये यांनीं विश्वसाहित्यपरिषद् शेंगवलीला भरविण्याचा बूट काढला. आणि त्यांचा प्रेमळ दरारा असा कीं, त्यांनीं बूट काढल्यावर कांहीं खुसपट काढण्याची त्या तालुक्यांत तरी कोणाची हिंमत नव्हती. जरा घसरलेंच. देवीजींच्या आंतरिक माधुर्यबळाबाबत हिंमत सारखा आडदांड शब्द घुसायला नको होता. तो विसरणें. देवीजींच्या त्या तसल्या बळाचा प्रथम प्रभाव पडला तो शेंगवलीचे माजी इनामदार श्रीमंत धर्माजीराव दानपट्टे यांच्यावर परिषदेच्या खर्चाची बरीचशी जिम्मेदारी यांनीं उचलली. शिवाय खाशा पाहुण्यांच्या वस्तीसाठीं त्यांनीं आपल्या वाड्यांतलीं दोन दालनें देऊं केलीं. आणि वर जाजम, टेबल खुर्ची, कोच पुरवायचें कबूल केलें. या दातृत्वाचा श्रीमत स्वागताध्यक्ष होण्याशीं तसा कांहीं सौदेवाईक संबंध नव्हता. तो योगायोग. "वाडवडिलांपासूनच दानाचा पट्टा मिळाला आहे." असें सद्‌गदितपणें देवीजींनीं पुन्हा म्हणून दाखविलें तें कांहीं उगाच नव्हे.

आतां खरें म्हणजे—आणि खाजगींत देवीजीहि कधीं म्हणतात कीं, श्रीमंतांचें तें कांहीं मूळचें आडनांव नव्हे. मूळचे म्हणे ते दांडपट्टे. कोठल्याशा पेशव्याच्या कितव्याशा लग्नांत फेस येईपर्यंत दांडपट्टा फिरविल्यामुळें यांचा खापरपणजा बोयाटेचा दांडपट्टे झाला आणि तोहि अकरा गांवांच्या इनामासह. पण यांचे वडिलांचे, म्हणजे श्रीमंत बजरंगरावांचे वेळीं वाईचा कोणी दशग्रंथी विद्वान्, वाड्यांत पोटभर संभावना झाली म्हणून तृतीचा ढेकर देतांना म्हणता झाला—"श्रीमंत, जेहेत्ते आपल्या कुळाचें खरें उपनाम दानपट्टे: त्याचा उद्धार करावा. दांडपट्टे हे कोण्यातरी हितशत्रूनें भ्रष्टरूप केलें आहे." शास्त्रीबुवांची पुनश्च रुपेरी संभावना जाहली हें लिहिणें नलगे.

आणि तसेंच पाहायचें तर देवीजींनीहि, धर्माजीराव कधीं कधीं म्हणतात तसें, "आपुलं नांव सौंस्कृत करून टाकलं. तो इतिहास थोडक्यांत असा. देवीजींचा विवाह होण्यापूर्वीं (त्या देवीजी नव्हत्या तेव्हां; नुसत्याच गोदुबाला भीमराव म्हसवडकर कुळकर्णी होत्या) पुण्यांत त्यांचें चार यत्ता शिक्षण झालें होतें. लग्नांत पतीनें रिवाजाप्रमाणें त्यांचें नांव बदलून धनलक्ष्मी ठेवलें. तसेंच त्यांनीं पतीचें आडनांव 'बारपुते' होतें तें बदलून 'द्वादशापत्ये' ठेवलें. तें केवळ संस्कृत आणि जोडाक्षरी भारदस्तपणासाठीं नव्हे, तर त्या शुभलक्षणी, आशीर्वादात्मक आणि कुलक्षणवाचक नांवांत पुरुषांबाबत पक्षपात आणि स्त्रियांचा अनुल्लेख हे मुळांतील दोष नाहींत म्हणून. अशी बोलवा होती कीं नांव बदलल्याशिवाय तें सार्थ करावयास उद्युक्त होणार नाहीं हा बाणेदार निर्धार त्यांनीं बोहल्यावरच व्यक्त केला. त्याचा इष्ट परिणाम झाला. आणि पुढें त्यांनीं आपलें सांसारिक कर्तव्य यथाशक्ति पार पाडलें. असो. ओघांनच आलें तेव्हां त्यांच्या यजमानाविषयीं थोडेसें...

नरसिंहरावजी द्वादशापत्ये (पूर्वाश्रमीचे बारपुते) ही मोठी असामी होती. वडिलांचा व्यवसाय कंत्राटदारीचा; तो चालू ठेवला. विद्या दुहेरी दिशेव ठेवण्यापुरती; तिचा अधिक हव्यास धरला नाहीं. व्यवसायाचीं गुह्यें मात्र

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

आत्मसात् केलीं. त्यांत कर्तव्यवशात् इतरांस कठोर शिस्त लावली. स्वगृहीं मात्र सज्जनपणें आणि मृदुतेनें भार्येचा मान राखला. तिच्या सांस्कृतिक उद्योगांचें चोज पुरविलें; तसल्या समारंभांत उचित वेष करून स्मितनमस्कारादि उपचार कसोशीनें पाळले. गेल्या वर्षी त्यांच्या पन्नासाव्या वाढदिवसानिमित्त त्यांचा (आणि अर्थात् देवीजींचाहि) सत्कार साजरा झाला. त्या सभेंत कोणा एका प्राध्यापकानें म्हटलें सुद्धां "नरसिंहरावजी आणि धनलक्ष्मीदेवीजी यांचा संसार आधुनिक आणि आदर्शवत् नाहीं असें कोण म्हणेल? फार काय, रावजी म्हणजे नवा मनूच. "स्त्री स्वातंत्र्यमर्हति" हें त्यांचें ब्रीद." असो

विश्वसाहित्य परिषदेच्या आख्यानांत देवीजींच्या नमनालाच घडाभर शब्द नासले असें कोणी म्हणेल. पण त्या परिषदेंत देवीजी नमनापुरत्या नव्हत्या. परिषद म्हणजे त्या होत्या. सगळी त्याची लीला होती ती.

—आणि परिषदेंत सर्वांना त्याची जाण होती. पंक्तींत वाढप करणाऱ्या स्थानिक शिक्षकांपासून ते परिषदेच्या अध्यक्षांपर्यंत देवीजींचा शब्द झेलण्याची प्रेमळ अहमहमिका लागून राहिली होती. समित्या, पोटसमित्या अर्थात् होत्याच; कारण संपूर्ण लोकशाहीवर (आणि मतस्वातंत्र्यावर वगैरे) देवीजींची गाढ निष्ठा होती. ती उच्चारून दाखविण्यासाठीं त्यांनीं दोनदां परदेशगमन केलें होतें. (तिसऱ्यांदा केलें तें स्वतःच्या खर्चानें). असो. या सगळ्या समित्या स्वागतमंडळानें निवडल्या त्या देवीजींच्या सल्ल्यानेंच. तेंहि बरोबरच. त्यांचें चैतन्य (आणि द्रव्य) नसतें तर रेंगवलीला असली परिषद कोठची भरावयाला? यापूर्वी तेथें एकच संमेलन भरलें होतें. आणि तें म्हणजे श्रीमंत बजरंगराव प्राथमिक विद्यामंदिराच्या माजी विद्यार्थ्यांचें. अशा कुग्रामाला आतां थोरथोर पायं लागणार होते ते देवीजींमुळें.

तेव्हां अध्यक्षांपासून ते चटणीकोशिंबिरी-पर्यंत सगळी निवड केली ती देवीजींनीच अध्यक्षांची तर त्यांनीं यादीच केली होती. भारताचे अध्यक्ष, उपाध्यक्ष, प्रधानमंत्री अशा उतरत्या भांजणीनें नकार घेतां घेतां देवीजी आचार्य आत्मप्रकाश (क्रमांक नऊ) यांजपर्यंत आल्या. हुकलेल्यांचा खेद न करतां मिळालेल्यांत त्यांनीं संतोष मानला. आणि तो मानावा असेंच आचार्यांचें माहात्म्य नव्हतें का? विश्वशांतीला वाहून घेतलेला तो महान् पुरुष वर्षातून नऊ महिने परदेशांत संचार करीत असतो; जगाच्या तमाम दुःखांवर गुणकारी असा आध्यात्मिक तोडगा त्यांच्यापाशीं असल्याचा गवगवा आहे तो काय उगाच? पुन्हा साहित्यिक. त्यांच्या अध्यक्षीय भाषणांचेच मुळीं तीन खंड प्रकाशित झाले आहेत. इतर भाषणांचे चार कीं पांच. आणखी ग्रंथ आहेतच. वेद, उपनिषदें, भगवद्गीता, बुद्ध, हिंदी संस्कृति, जुने-नवे संत या व यांसारख्या विषयांवर त्यांनीं भरपूर लिहून ठेवलें आहे. मूळ हिंदींत अथवा इंग्रजींत. त्याचीं मग अनेक देशी भाषांत भाषांतरें. असा लेखनसंभार. त्याचें वजन असें कीं साहित्यिक मानसन्मान देखील आपल्या पायांनीं चालून यावेत... तेव्हां परिषदेला तोलाचा अध्यक्ष मिळाला असाच सार्वत्रिक अभिप्राय पडला.

पण एवढी विश्वपरिषद; तेव्हां आणखी पांचदहा पाहुणे तरी शोभेलशा मापाचे हवेत. या देशांतील धंदे मिळविणें हा, कोणींसें म्हटलें त्याप्रमाणें, देवीजींच्या हातचा मळ होता. पत्रलेखनाच्या साहेबी अदबींचा जरा सैल शिडकाव करून देवीजी देशी सावजाला सहज गार करतात; अगदीं कामरूप ते सौराष्ट्र आणि हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंतचीं थोर थोर माणसें घरचें कार्य असल्यासारखीं लगबगीनें येतील असा देवीजींना विश्वास होता. आपुलकीचा 'ताजा कलम' हातानें लिहिलेलें त्यांचें छापील आमंत्रण पोंचताच अष्टदिशांनीं होकार उठले. गौहत्तीहून नकुल चंद्र बरुआ, हुबळीहून विरूपाक्ष मुद्दे त्रिहाळमठ, त्रिवेंद्रमहून ललिथाम्मा नम्बुद्रिचरण, साबरमतीहून रणछोडभाई दवादलाल, लुधिआनाहून गुर्दयालसिंग 'होष,' इलाहाबादहून खमी सुद्दिन 'कैची...' अशीं किती नांवें (आदरानें) घ्यावींत! पत्र देखतांच समस्त मंडळींनीं बिस्तरा बांधला. हो, पुण्याचे प्रा. कृ. त्रिं. स्वच्छन्दे यांचा मुद्दाम उल्लेख हवा. आपल्या द्रष्टेपणाची वूज राखणारी कोणी ( बाई माणूस ) आहे या विचारतुष्टींत त्यांनीं तारेनेंच आमंत्रण स्वीकारलें आणि पिशव्या भरल्या...

पण परदेशी चिजांवांचून विश्वपरिषद् कशी साजरी होणार? निदान त्यांचा वास तरी हवा. देवीजींनीं कंबर बांधली. त्रिखंडकीर्ति (किंवा पंचखंडकीर्ति) साहित्यकारांस अत्यादराची आमंत्रणें गेलीं. पण देवीजींची पुण्याई तोकडी पडूं लागली. आल्बर्तो मोराविआला जबर पडसें झालें होतें; आर्थर कोस्लरच्या कथेवर हॉलिवूडला (नवदलाख डॉलर्सचा) चित्रपट निघत होता. तेव्हां त्याला तेथें राहाणें प्राप्त होतें. प्रो. टॉयन्बी जपानमध्यें व्याख्यानाच्या दौऱ्यावर होता. अशा अडचणी निर्माण होऊं लागल्या. पण देवीजींनीं पिच्छा सोडला नाही. चित्रपटांसाठीं अवेळीं 'एक्स्ट्रा' पुरविणाऱ्यांप्रमाणें अडलेल्या समारंभांसाठीं परदेशी पाहुण्यांची सोय जमविणाऱ्या संस्थांशीं त्यांनीं संधान बांधलें; आणि थोड्याफार खटपटीनें

(पान १८१ पहा)


# कांहीं दर्जेदार कथासंग्रह

- द्वंद्व — विजय तेंडुलकर — किंमत ४·०० रुपये
- पु. भा. भावे यांच्या निवडक कथा — „ ६·०० रुपये
- मेघपात्रें — विजय तेंडुलकर — „ ३·७५ रुपये
- गजगा — श्री. दा. पानवलकर
- प्रतिबिंब — सौ. वसुंधरा पटवर्धन

**बा. ल. पाठक प्रकाशन, मुंबई २**

शाखा—जगदीश्वर बुक डेपो, माधवबाग, मुंबई ४






अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

*"असा मीं असामीं"त देशपांड्यांचे कांहीं आत्मानुभव तुम्हीं वाचलेत.*
*"पुन्हां मीं पुन्हां मीं"त त्यांच्या कौटुंबिक जीवनाशीं तुम्हीं समरस झालांत. आतां वाचा—*

# माझें खाद्यजीवन

## थोडें कडू, थोडें गोड, पण बरेंचसें तिखट

*"माणसाचा सारा इतिहास म्हणजे त्याच्या खाण्याचा इतिहास आहे, चराचर सृष्टि ह्याचा अर्थच मुळीं कशावर तरी चरणारी सृष्टि असा आहे. आदिमानव मिळेल त्यावर चरला. पुढें तो सुधारला आणि स्वतः चरतां चरतां दुसऱ्याला चारूं लागला. त्यानंतर फारच सुधारला तेव्हां दुसऱ्याचें चोरून स्वतः चरूं लागला. मानवाची सारी वाटचाल स्वतःच्या हातानें चरणें, चारणें–चिरणें आणि चोरणें ह्या चकारी वाराखडींतून होत होत चमचःपर्यंत आली आहे." (हें वाक्य वस्तुतः माझेंच आहे. केवळ त्याचा गंभीर विचार व्हावा म्हणून अवतरणें टाकलीं आहेत. कारण नांवामागें कैं. लागल्याशिवाय चांगल्या वाक्यांना देखील सुभाषितांचे मोल येत नाहीं.)*

एका जुनाट घरांतलें स्वैंपाकघर आहे. काळोखें! कोनाड्यांत रॉकेलची चिमणी भगभगते आहे. एके काळीं लाल असलेल्या पाटासमोर पत्रावळ मांडलेली आहे. चुलीवरच्या भाताला भांड्यांतल्या भांड्यांत गुदगुल्या होत आहेत. पोटांत भूक आहे. डोळ्यांत नीज आहे. दारांतून वाकून वडील आंत येत आहेत. ते कांहीं तरी गुणगुणताहेत. पलीकडे झोळण्याच्या पाळण्यांत धाकटा भाऊ ब्यँ--प्यँ करून रडणें आणि बोलणें ह्यांच्या सीमारेषे-



वरचे आवाज काढतो आहे. इतक्यांत निखाऱ्यावर टाकलेल्या पापडाचा वास येतो. झोप उडाल्यागत होते. पोटाची मागणी वाढते. 'झालं–हं--' म्हणून आई तो चिमटीत धरून फूऽफूऽऽ करते. वडील शेजारच्या पाटावर बसतात. इतक्यांत कढईच्या पोटांत चर्र होतें. पळींतून आंबाडीच्या भाजीच्या पोटांत शिरलेली लसूण साऱ्या घराचा ताबा घेते. झोप पळते. पोटांत रणकंदन सुरू होतें. चुलीच्या एका बाजूला भिंतीला पाठ लावून उभ्या असलेल्या भाकरी चतकोराचतकोरानें पानांत पडतात. 'आज काय शिकवलं रे मास्तरांनीं?' ओट्यावर नित्य नेमानें येऊन बसणारे शेजारचे दादा कणखर आवाजांत विचारतात. गरम भाकरीच्या तुकड्यांत दडलेला आंबाडीच्या भाजीचा खमंग घास घशांत अडकतो. माझ्या खाद्य जीवनांतल्या कडुगोड स्मृतींची आठवण करीत बसलों कीं हें दृश्य मला सदैव प्रथम दिसतें. खाण्याच्या कितीतरी आठवणी आज जिभेवर आहेत! कधीं कधीं अशा उफाळून येतात. अगदीं भलत्या ठिकाणीं येतात. एका गरीब कारकुनी घरांत वाढलों. घर कसलें पत्र्याच्या भिंतींचें एक झोपडें. खेड्यांतलें नव्हे. मुंबईजवळच्याच एका उपनगरांतलें. त्यावेळीं मुंबईला माणसें अशीं येऊन झोंबलीं नव्हतीं. रविवारीं दुपारीं इंजिनाच्या झुकझुक गाडींतून

पु. ल. देशपांडे

कधींमधीं वडील मुंबईला घेऊन जात त्यावेळीं स्टेशनांत दहाबारा माणसें असत.

पत्र्याच्या झोंपडींतलें तें स्वयंपाकघर म्हणजे मध्येंच उभा केलेला एक पत्रा! त्याच्या एका बाजूला आमचा हॉल कम् बेडरुम आणि दुसऱ्या बाजूला स्वयंपाकघर, बाहेर एक ओटी. तिथें एकच आराम खुर्ची असे. आम्ही जेवण झाल्यावर खालीं पाय सोडून बसत होतों. वडील आरामखुर्चीवर बसायचे! शेजारीं तसलेंच एक घर. तिथें 'शेजारचे दादा' रहायचे. ते नेहमीं अभ्यास विचारायचे! दादा दुष्ट आहेत हें माझेंच नव्हे तर दादांच्या मुलाचेंहि मत होतें. कारण त्यालाहि ते अभ्यास विचारायचे! पुढें शेजारच्या दादांचा मुलगा पळाला. पण शेजारच्या मामी मात्र भलत्याच चांगल्या होत्या! तिच्या हातच्या सांजोऱ्या 'खाल्ल्या' तसल्या पुन्हां नाहीं मिळाल्या. त्यांच्या घरीं हळदीचें पान घालून लोणी कढवीत त्यामुळें त्यांच्या घरीं जेवायला गेलों कीं मी तूपभात खूप खाऊन येत असे. आतां शेजारच्या मामी गेल्या—ती पत्र्याची झोपडी गेली. राहिली आहे ती त्या सांजोऱ्यांची आणि तूपभाताची आठवण! माझ्या खाद्यजीवनांतल्या ह्या पहिल्यावहिल्या स्मृति आहेत.

खाण्याच्या बाबतींत माणसें घरचें खाणें आणि बाजारचें खाणें असा एक ढोबळ पंक्तिप्रपंच करतात. खाण्यांत घरालाहि स्थान आहे आणि बाजारालाहि आहे. खाद्यसाधन हें एक प्रकारचें योगसाधन आहे. अनेक इंद्रियांवर विजय मिळवून खावें लागतें. त्यांत मुख्य आवरावें लागतें तें स्वच्छतेचें इंद्रिय! त्यानंतर


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

*पु. ल. देशपांडे हीं सहा अक्षरें–मराठी माणसाच्या ओठांत आज एखाद्या मंत्रा-सारखीं घोळत आहेत. देशपांड्यांच्या लेखांचें वाचन हें दिवाळीचा आनंद द्विगुणित करणारें एक षड्स पक्वान्न, असें समिकरण आज ठरून गेल्यासारखें आहे. दीपावलीसाठीं कांहीं तरी खास लिहिणें ही त्यांच्या मर्मबंधांतली ठेवण. जिभेला लाळेचा झरा फोडणारा हा प्रदीर्घ लेख वाचल्यानंतर रसिक वाचकांना त्याची प्रचीति येईलच....*



आरोग्यविषयक पाणचट कल्पना! आरोग्य ह्याचा अर्थ वाटेल तें–वाटेल तेव्हां–वाटेल त्या ठिकाणचें आणि वाटेल तितकें खाण्याची ताकद! खाण्याची साधना जसजशी वाढत जाते तसतशी खूर खाण्याची प्रवृत्ति कमी होते. शंभर लाडू खाणाऱ्या इसमाला खवैय्या म्हणतात हें चूक आहे. शंभर गाणीं म्हणून दाखव-णाऱ्यासा गवैय्या म्हणण्याइतकें हें चूक आहे! खाण्याच्या पहिल्या उमेदीच्या भरांत खूप खात जाण्याकडे प्रवृत्ति असणें हें ठीक आहे. पण त्या नंतर पारख यावी लागते. खरा मत्स्याहारी सरंग्याचा एकच तुकडा किंवा मालवणी परिभाषेंत 'कुडकी' सगळ्या जेवणाबरोबर पुरवतो!

भेळ–मिसळ आणि उसळ ह्या 'ळ' कारान्त चीजांनीं जिभेचा चावटपणा खूप वाढवला. इथें 'चावट'पणा हा शब्द गौरवार्थी आहे. कारण चावट हा शब्दच मुळीं 'चव' ह्या धातूंचें लडिवाळ स्वरूप आहे. चविष्ठ–चवीट्ट–चावट्ट आणि चावट! ह्या शब्दाचा चावण्याशीं कांहीं संबंध नाहीं. वेचव शब्दपंडितांनीं तो जोडला आहे. (पहा : धातुकोश–किंवा खरं म्हणजे कशाला पहातां?)

खाद्यसंस्कृतींत कांहीं उपऱ्या मंडळींचीहि भरती आहे. चकली, चिरोटा ह्यांच्याप्रमाणें शंकरपाळें नामक जो पदार्थ आहे तो ह्यांतला! ह्या पाळ्याचा शंकराशीं काय संबंध आहे देव जाणे. कारण शंकर हा देव हें असलें पुळचट खाणाऱ्यांतला वाटत नाहीं. रुंडमाला धारण करून तांडव करतां करतां मधूनच बशींतलें शंकरपाळें तो आपल्या तोंडांत टाकील हें पटत नाहीं! म्हणजे त्याला गोडाचें वावडें नसावें. कारण भांग जिथें चालते तिथें मिटाई आलीच! शंकर शेवेचा लाडू खाईल. मिसळ खाईल. कारण तसा तो शेतकरी-कामकरी पक्षाचा पुढारी आहे. सरळ तर सूत नाहींतर एकदम तिसरा डोळा उघडून जाळपोळ सुरू! हल्लीं सगळीं नांवें बदलण्याची चळवळ चालू आहे. त्या गडबडींत ह्या शंकरपाळ्याचें सुद्धां साखरपाळें करावें. म्हणजे त्यांतल्या त्यांत 'सेक्युलर'हि झालें. ह्या अगदींच बिनबुड खाद्याला त्या महादेवाचें नांव देण्याइतका त्याचा अपमान फक्त त्याचीं तीं मुळमुळीत चित्रें काढणाऱ्या चिताऱ्यानेंच केला आहे. अन्य कोणी नाहीं.

## सुकुरउंडे आणि कडबू

पुराणप्रियता आणि पुरणप्रियता हे महा-राष्ट्राचें वैशिष्ट्य आहे. आम्ही नव्याचा स्वीकार सावधपणें करतों. म्हणूनच टिकून आहों. नवें देखील चांगलें वापरून जुनें झाल्याखेरीज आम्हांला आवडत नाहीं. पण जुन्यांतलें जुनें जर कांहीं टिकून रहाणार असेल तर पुरणपोळी! ज्या घरांत वर्षांतून एकदां तरी पुरणपोळी म्हणून



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

झाली नाहीं तें घर मराठी नव्हे ! महाराष्ट्रांतल्या चारी वर्णांनीं साऱ्या जातीजमातींनीं जर एक-मतानें मान्य केलेली गोष्ट कुठली असेल तर पुरणपोळी ! हीसुद्धां जसजशी अधिक शिळी होत जाते तसतशी तिची चव वाढते. ती दुधाबरोबर खावी, तुपाबरोबर खावी किंवा कोरडी खावी. महाराष्ट्राच्या सीमा ठरवतांना पुरणपो-ळीचा निकस वापरायला पाहिजे होता. मात्र हें नाजुक हाताचें काम नव्हे. चांगल्या पुरणपोळीला चांगले तीसपस्तीस वर्षांचे तव्याचे चटके खाल्लेला हात हवा. म्हणूनच आजीनें केलेल्या पुरणाच्या पोळीची सर आईच्या हाताला येत नाहीं—पत्नीच्या तर नाहींच नाहीं. वडिल-धाऱ्यांनीं ती करावी आणि लहानांनीं खावी ! वेळगांव सीमेवर पुरणाचें कडबू होतात आणि कारवार सीमेवर सुकुरउंडे होतात. पण पुरण ही गोष्ट पापडांच्या लाट्यांसारखी नुसतीच खाण्याचा आनंद 'आया' नांवाच्या स्त्रिया आपल्याला कधींच लाभूं देत नाहींत ! 'हवें तें हवें त्यावेळीं आणि हवें तितकें खाऊं न देणारी' ती आई !



## स्पर्शाचें देऊळ

मधुकर केचे

नक्की त्या त्याच सालीं
शोधतांना माझी कूस या अफाटांतली
मी करीत होतो पायपीट;
आज अजाण रुखाची थिटी छाया—
उद्यां पंढरीची उदास वीट.

रखडतांना सारखा सारखा
वर्धेगोदेच्या पान्ह्यांत शोधत
पान्ह्याचा पुळका
धर्मजातींच्या चावकांनीं हटत होता
माणसांचा एकेक घोळका
असा वणवणत मी सारखा.

टाळ मृदंगाचें चालणारें
मंगल वाद्यांशीं भांडण
अकालीं सजलेल्या
एखाद्या तिरडीविना
(परक्याच त्याहि)
मला कुणाचेंच नव्हतें आमंत्रण.

असा जेथें जो तो
स्वतःचाच शोध विसरलेला
त्यांत माझा खुळा आग्रह
त्यांनीं मला शोधावें हा !
त्यांनी मला जवळावे हा !
लाचारीत अशा—
देत होतों; देऊं पाहात होतों
तिन्हाइतांना माझें मन.

जें जें परन्तु करावें
तें तें माझें मलाच
घडत होतें वंदन.

या विराट निळाईंत
कुठेंहि नव्हता
आपुलकीचा आतूर कण
तशाहि सावत्र रेतीवर
माझीं पावलें फिरत होतीं—
फिरत होतीं रणरण.

नक्की त्या त्याच सालीं
इमानानें शिणलेली
माझी आशा पावलोपावली
कितीदां अडखळली.

इतरांवर तरी
किती करावा अधिकार ?
इथल्या कायद्याचे
वेगळेच फुत्कार !
माती गोळा करून भिजवावी
आपणच आपल्या श्रावणानें
ओतून पुन्हां अनोळखी दिलासा
द्यावें एखाद्या देवाचें नांव
थापावी माती : देत राहावा
आपल्या स्वप्नाचा आकार—ज्याचा त्याने.

जग असं गवसण्यापार गेलं
धुंडाळणं आलं माझं मलाच
माझंपण—वांदळींत हारवलेलं
जळण्यापुरतं तरी हवं होतं
माझं मला हक्काचं इंधन
एकाहि धुळीवर उमटूं नये ना
माझं बालपण ?
एकाहि तमावर होऊं नये ना
माझी पहाट ?

अशाच त्या सालीं नक्की
मी चालत होतों माझी वाट.
माझ्या नकळत येत होता
नशिबाला भगवा रंग
मृत्यू ऐकूनच जगत होतें
माझें सजाधीन कोडगें अंग.

शिव्या भुकेच्या तृप्तवासावर
रोजच कोरलें जात होतें
[भाकरीच्या वेटोळ्याचें]
एकेक थडगें.

शापित डोळ्यांच्या फाटक्या
झोळीस आवरत नव्हतें
माझें उद्याचें घर पडकें.

नक्की त्याच सालीं
माझ्यांत तूं शिरली असावीस
ठेवीतच मला कासावीस.
तशाहि सरणांत
तूंच का भिजवल्यास माझ्या
वासना कामना ?

बांधवलेस माझ्या हातून
हें स्पर्शाचें देऊळ ?
[हे माझ्याहि आधीचें खूळ ! ?]
कलम लावलेस
कोण्या वादळाचें कोण्या नभावर
[तरीच बरं—त्याहि वेळीं
माझ्या हुंदक्यांना येत होता
कधींमधीं आवर.]

तूंच लावलीस
तुझ्या गाभाऱ्यांत माझी वात
तेवण्याची इच्छाच विझलेली
तीहि तूंच का पाजळली ?
म्हणून घडलें हें रहस्य
ज्योतिविना हास्य.

मी तेव्हां नि आतांहि आहे
वातीपुरताच.
स्वयंपुण्याईनें जगणाऱ्या शेपाखालील
मातीपुरताच.

खरंग ग—
तुझ्या स्पर्शाच्या देवळाचा
मी कुणीच नव्हे
तुझ्याशीं तूंच मिठी मारतांना
उगीचच ओततेस जीवन
या मरूहि न शकलेल्या
प्रेतांत.

मला राहूं दे अशी
विझलेली वात.

अनुक्रमणिका


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

अशी आईची जराशी कठोर (कारण सत्य म्हणून) व्याख्या आहे. ताज्या करकरीत कैऱ्यांचं लोणचं ती कधींहि देणार नाहीं—बरणींत घालून तें सहा महिने मुरल्यावर मग इच्छा गेली कीं तें पानावर यायचं! सांडगे वाळण्यापूर्वीची वाळून तळण्यावर नसते. पण कोहाळ्याचें सांडगे करतांना तें पीठ मिळायचें नाहीं. ओल्या नारळाचें खोबरें किसतांना मिळणार नाहीं तें गरम पोह्यांवर पडून निष्प्राण झाल्यावर 'खा!' गरम भाजलेले शेंगदाणें हातीं येणें कठीण ते कुटून साबुदाण्याच्या खिचडींत बेपत्ता झाले कीं गिळा! स्वयंपाकघर नांवाच्या खोलींत बायका शिरल्या कीं त्यांना तिथें चार पोरांना जमूं द्यायचें नाहीं हें एकशेचवेचाळीस कलम जारी करावेंसें कां वाटतें कोण जाणें! शिजत येणाऱ्या स्वैंपाकाचा सुगंध स्वैंपाकघराच्या उंबरठ्यावर शांतपणें बसून घेण्यांतला आनंद बायकांना कळणार नाहीं.

आणि म्हणूनच जिथें हवें तें मिळतें तिथें पुरुष जातात! चवीनें खाण्याचा स्त्रीवर्गाला पोक कमी! त्यांची मजल फार तर आइस्क्रीम पर्यंत जाते. बायका स्वयंपाकाविषयीं बोलतात पण खाण्याविषयीं बोलत नाहींत. 'बोलेल तो करेल काय प्रमाणें' करेल तो खाईल काय?' हेंच खरें! हॉटेलांत स्वैंपाकाचें खातें पुरुषांकडे असतें त्यामुळें तिथें कोणाला काय हवें तें नेमकें कळतें! कदाचित् खाणें ह्या गोष्टीची बायकांच्या बाबतींत अतिपरिचयामुळें अवज्ञा



कोटांतल्या प्रचंड हॉटेलांतलें हें 'खाणें'

होत असावी. कारण शेतकरी हुरडापार्टीला उत्सुक नसतो. मक्याचीं कणसें भाजून ती भुकेला खातो.

भुकेचें खाणें हें खाणेंच नव्हे! तिथें खाण्याला कलेचा दर्जा येत नाहीं. कलेला गरज मानवत नाहीं. फुप्फुसांना व्यायाम म्हणून कोणी गाईल तर गवय्या नव्हे आणि आरोग्याला चांगलें म्हणून खाईल तो खवैय्या नव्हे! मथुराभुवनांतली जिलबी आणि गाठ्या ह्या दुर्दैवानें पैलवानी आरोग्यांत जमा झाल्या. लग्नांतल्या जिलब्यांना तर अर्थच नाहीं. फार काय लग्नांतलें जेवण हें जेवणच नव्हे! तिथें तें भुकेचेंहि खाणें नव्हे आणि षोकाचें तर नव्हेच नव्हें! ज्या पुण्याची 'लग्न' ह्या उद्योगधंद्याबद्दल उगीचच ख्याति आहे, तिथल्या पंगतींतल्या जेवणाइतकी तर जेवण ह्या संस्कृतीची इतर कोणीहि अवहेलना केली नसेल. एक 'पत्रावळ' हा प्रकार गळ्यांत काड्या अडकवणारा. त्यांतून मद्रासच्या जागीं उसवणें हें पत्रावळीनें तुमानीकडून शिकून घेतलें असावें. चुकून एखादी भाजी आवडलीच तर ती जिथें वाढली जाते तिथेंच नेमकी पत्रावळ आ वासते! असल्या त्या पत्रावळींत—मिठांत ओवळलेलें लोणचें—कोशिंबीर ह्या नांवाखालीं केलेला टॉमेटो आणि शेंगदाण्याचा सत्यानाश त्यांत घुसणारें जळकट खोबऱ्याचे तुकडे टाकलेलें पंचामृत—त्याच्या बाजूला मठ्याच्या द्रोणाला टेकण ह्याहून अन्य कार्य न साधणारा तो वांग्याची भाजी नामक चिखल—ह्या सर्व पदार्थांना पानशेतच्या लोंढ्यासारखा वाहून नेणारा अळवाच्या फतफत्याचा लोंढा—गारगोट्या भाताची उदबत्त्या लावायच्या सोंगटीएवढी मूद तिच्यावर डाळीपासून फटकून निघालेलें वरण आणि त्या मुदीची गोळी पोटांत जाईपर्यंत तिथें येऊन कोसळणारा मसालेभात नांवाचा भयाण ढीग! एवढ्यानें संपलें नाहीं म्हणून नुसतेंच तळून काढलेलें भज्याचें पीठ! आणि मग 'जिलेबीचें जेवण' ह्या मथळ्याला शोभणारा मजकूर नसला तरी ठसठशीत मथळा हवी म्हणून पडणारी जी आंगठ्याएवढ्या जाड वळणाची जिलबी! एवढ्यानें संपत नाहीं—मग 'मठ्ठा मठ्ठा' असा आरडाओरडा होतो आणि —त्या लवंड्या किंवा बिन लवंड्या द्रोणांत

## 'कोल्हा आणि करकोचा'

ही-आप नीति




एका धूर्त कोल्ह्यानें मानभावीपणानें एका साध्याभोळ्या करकोच्याला इच्छाभोजनाचें निमंत्रण दिलें. नियुक्त कालीं उपस्थित झालेल्या अभ्यागतासमोर एका थाळींत पंचखाद्यांची खीर ठेवून तशाच दुसऱ्या थाळींत आपल्यासाठीं खीर वाढली. करकोचा भुकेला असूनहीं त्याला ह्या विशिष्ट पंगतीचा लाभ घेतां आला नाहीं. पण कोल्ह्यानें जिभल्या चाटींत दोन्ही थाळ्या फस्त करून दाखविल्या. कांहीं दिवसांनीं करकोच्यानें परतफेडीच्या भोजनाचें आमंत्रण बुभुक्षित कोल्ह्यास देऊन एका सुरईंत मधुमधुर आम्ररसाची सिद्धता केली. गलेलठ्ठ व खुज्या कोल्ह्यास सुरईतल्या मधुर रसाचें पान करतां येईना. करकोच्यानें रसपान करतांना ओवळलेल्या थेंबांची चव फक्त त्याला कळली तेव्हढीच. भुकेनें अतिव्याकुळ होऊन कोल्हा शेपटी खालीं घालून गपचूप परत गेला.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

डोंगरे




मुलांच्या संवर्धनासाठीं






याशिवाय

बाळंत काढा नं.१ व नं.२.

बाळकडू

कुमारी आसव नं.३

ग्राईप वॉटर

के. टी. डोंगरे आणि कंपनी प्रा. लि.

८२, मेडोझ स्ट्रीट, मुंबई-१.








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


अनुक्रमणिका

वहिदा रहमानच्या सौंदर्यरहस्यांत सहभागी व्हा...

# माझ्या नितळ कांतीचं श्रेय लक्सलाच!




वहिदा रहमानचं सौंदर्यरहस्य आपल्यालाहि अंकित करतां येईल! लक्स वापरा.... त्याच्या मलई-सारख्या मृदु फेसानं आपली कांति नवसौंदर्यानं बहरते. लक्स वापरा.... मोहमधुर सुवासाचं वलयच जणूं त्यानं आपल्याभोंवतीं निर्माण होतं. लक्स वापरा.... इंद्रधनुष्याच्या सुरम्य रंगांतील लक्स घ्या अथवा आपला आवडता शुभ्र घ्या. आपल्या सौंदर्यवर्धनासाठीं हवा लक्स टॉयलेट साबणच!

**सिनेतारकांचा शुद्ध सौम्य, सौंदर्यसाबण**

'लक्स आतां माझ्या आवडत्या पांच रंगांत मिळूं लागला!'

— वहिदा रहमान

हिंदुस्तान लीव्हरचें उत्पादन

LTS. 123-X52 MA




अनुक्रमणिका





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

झालं कीं नाहीं! सुरेंद्रनं स्वयंपाकघरांत डोकावून विचारलं.

"झालं होऽ झालं. फक्त पांचच मिनिटं थांबा. घेतलंच ताट वाढायला," लीलानं कपाळावरचा घाम पदरानं पुशीत घाबऱ्या घाबऱ्या म्हटलं.

"अर्धा तास झाला. 'वाढतें...वाढतें' म्हणून मघापासून नुसतं तोंडानं म्हणतेयस. जें काय तयार असेल तें आण वाढून. इथं कुणाला पंचपक्वान्नाचं ताट हवंय्! दोन साधे जिन्नस तुम्हाला वेळेवर करुन वाढतां येत नाहींत."

"अहो, मी पण दोन घास सुखानं तोंडांत पडावेत तुमच्या, म्हणून सकाळपासून धडपडतेंय् ना! मी काय स्वस्थ बसलेंय्? एकेक कामं उरकतां उरकत नाहींत. तुम्ही पहातांच आहांत ना!"

"होऽ होऽ पाहतोंय् ना! मघापासून काम करतेयस ना! तुला मग हा असा रोजचा उशीर कसा होतो तेंच मला कळत नाहीं."

"रोज उशीर होतो!"

"नाहींतर कांय!"

"उगीच खोटेनाटे आरोप करायची संवयच आहे तुम्हाला. आलं मनांत कीं टाकलं बोलून. दुसऱ्याच्या मनाची पर्वाच करायची नाहीं."

"बरं...बरं...आतां बोलण्यांत वेळ दवडूं नकोस. वाढ एकदांची."

"थांबा म्हटलं ना!"

"मला थांबायला वेळ नाहीं. मला आज बाहेर दोन ठिकाणीं कामं आटोपून मग ऑफिसला जायचंय्. तूं करीत बस सावकाश स्वयंपाक. मी चाललों आतां."

"मग हें सगळं केलंय् तें का मी खाऊन टाकूं? का कुणाच्या डोंबला वर नेऊन आदळूं!"

शिरीष पै

"तुला पाहिजे तें कर. तुझं तें जेवण म्हणजे मला एक कटकट होऊन बसली आहे. हजार वेळां सांगितलंय् कीं जमत नाहीं तर करूं नकोस स्वयंपाक मी बाहेर कांहींतरी खाईन."

"हो तर, बाहेर खा आणि पोट बिघडवून घ्या. बाहेर का तुम्हाला ताक-दही मिळणार आहे घरच्यासारखं? ताकाशिवाय तुमचं भागणार आहे थोडंच!"



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

*तिनं धाडकन दार लावलं आणि सुटकेचा निःश्वास सोडला.*

*प्रत्येकजण तिला हवं तसं वांकवत होता.*

*आपल्या इच्छेला जुंपत होता.*

*तिला सगळ्यांची चीड आली, स्वतःचीहि.*

*या असंख्यपणांत हरवलेलं आपलं अस्तित्व ती शोधूं लागली....*

---

लीलानं भराभरा ताटांत गरमगरम फुलक्या वाढल्या आणि वाटींत कांदेबटाट्याचा खमंग वासानें दरवळणारा रस्सा घातला. डावीकडे द्ह्यांतली काकडीची कोशिंबीर वाढली आणि हातांत ताट घेऊन ती पुढच्या खोलींत आली. सुरेंद्रनें बुशकोट अंगावर चढवला होता आणि आरशापुढें केस विंचरीत उभा होता.

"अहो बुशकोट कशाला चढवलात एवढ्यांत? त्याच्यावर रस्सा सांडला म्हणजे पंचाईत," लीला स्टुलावर ताट ठेवीत म्हणाली.

"पण मला जेवायचंच नाहीं. मी तुला मघांच सांगितलं," बोलतां-बोलतां सुरेंद्र बूटहि घालूं लागला.

"तुमच्या आवडीचा स्वयंपाक केलाय्. सकाळपासून एवढी धडपडलें त्याचं कांहींच नाहीं तुम्हाला!"

सुरेंद्रनं उत्तर दिलं नाहीं. लीलानं आणलेल्या ताटाकडे ढुंकूनहि न बघतां तो ताडताड निघून गेला. 'तूं बटाट्याचा रस्सा पुढ्यांत आणलास तरी मला त्याचा मोह पडूं शकणार नाहीं यापुढें,' असंच जणुं त्याला सुचवायचं होतं.

इतका वेळ आणलेलं भांडणाचं अवसान गळून पडलं आणि लीलाच्या डोळ्यात टचकन् पाणी उभं राहिलं. तिनं निमूटपणं ताट उचलून आंत नेलं. तेवढ्यांत गॅलरींत खेळत असलेली अरुणा धावत आली आणि 'आई, शाळेची वेळ झाली' म्हणून तिला घाई करूं लागली. "थांब ग जरा," लीलानं तिला तिरसटपणें दूर ढकललं.

"थांब ग काय! .मला उशीर होतो ना!"

एकामागून एक कामांची रांग लागली होती. क्षुद्र कामांनीं गुंडाळून टाकलेल्या आपल्या धोपटमार्गी आयुष्याचा लीलाला त्या क्षणीं मनस्वी कंटाळा आला. अलीकडे झालय् तरी काय आपल्या आयुष्याला? सुरेंद्र आणि आपण जेव्हां जेव्हां समोरासमोर येतों तेव्हां तेव्हां एकमेकांना आपण सारखे असे दुखवीत कां असतों? सदैव एकमेकांवर रागावलेले, जळफळत असलेले! खरं म्हणजे आज सुरेंद्रला जायची घाई आहे हें आपल्याला माहीत होतं. चटकन् पोहे फोडणीला टाकले असते तरी काम भागण्याजोगं होतं. पण आपल्याला वाटलं—असं दे, बिचारा दिवसभर उपाशी पोटीं काम करीत राहील. सकाळीं उठायलाहि उशीर झाला होता. तेवढ्यांत नन्नीहि रडत राहिली होती. तिला दूध पाजून शांत करीपर्यंत वेळ गेला. अरुणाला कोको द्यायलाहि उशीर झाला. तरी आपण धडपडून स्वयंपाक केला. केवळ सुरेंद्रला खूष राखण्यासाठीं. पण काय उपयोग झाला? उलट तो अधिकच संतापून गेला. नको तिथं आपण त्याला प्रसन्न करायला जातोंय कशाला? नको तिथं दया दाखवतों कशाला? मर्जी राखण्यासाठीं धडपडायचं आणि उलट भांडणालाच निमित्त करून द्यायचं. अलीकडे हें असं चाललय. कुणी कुणाला प्रसन्नच करूं शकत नाहीं ह्या घरांत.

लीलानं अरुणाचे केस विंचरायला घेतले. आतां तिला शाळेंत पोंचवून द्यायला हवं होतं. जनाबाई तिला धड रस्त्यांतून नेईल कीं नाहीं ह्याची काळजी वाटल्यानं लीला स्वतःच तिला शाळेंत नेऊन पोंचवी. अरुणाचे केस विंचरतां विंचरतां लीलाला वाटलं—सगळा नुसता गुंता होऊन बसलाय् आयुष्याचा. नुसते एकमेकांत गुंतलों आहोंत आपण. लग्न हें अनैसर्गिक आहे काय? आपण एकमेकांना आवडतों कीं नाहीं हें माहीत नसतांना दोन अगदीं भिन्न स्वभावाच्या व्यक्तींनीं एकमेकांना एकमेकांशीं उभ्या जन्मासाठीं जखडून घ्यायचं आणि मग एकमेकांतून सुटण्यासाठीं तडफडत बसायचं. नुसतं तडफडायचं. सुटका नाहींच. कुणीतरी एकानं म्हणे पडतं घेतलं पाहिजे! कुणीतरी म्हणजे कुणी? बायकोनंच ना? आपण तरी तेंच करतों. आणि म्हणूनच मनांतून अधिक वैतागतों. सुरेंद्रनं आपल्याला अगदीं गुलाम करून ठेवलंय्. तो समोर असला कीं आपलं सगळं अवसान फोल ठरूं पाहतं.

अरुणासाठीं दूधदहीभात कालवायला लीला स्वयंपाकघरांत आली. जनाबाईनं बटेंतच धुवायचे सगळे कपडे काढून ठेवले होते, आणि ती नहाणी खोलींत जाऊन बादली भरून घेत होती.

"जनाबाई ऽऽ" लीला संतापून ओरडली.

नळाचं पाणी धबाधबा सांडत होतं. जनाबाईला हांक ऐकूं गेली नसावी.

"जनाबाई ऽ, जनाबाई ऽ," लीला किंचाळून हांका मारूं लागली.

"काय वं?" जनाबाई शांतपणें पान चघळीत नहाणी खोलींतून बाहेर आली.

"कान फुटले कीं काय तुमचे? हे कपडे कशाला मध्येंच पसरून ठेवलेत?"

"अवो बाल्टी भराया लावली अन् मंग मला आठवन झाली कीं कपडं काडायचं राह्यलं म्हून..."

"तुमचीं कारणं लगेच तयार असतात. हजार वेळां सांगितलं कीं एका वेळीं एक काम पुरं करावं म्हणून. एक काम अर्धं टाकायचं आणि घरभर पळत बसायचं. किती बोला...कधीं अक्कल येईल कुणास ठाऊक!"

"जनाबाई, माझं दप्तर कुठं ठेवलंत?" अरुणा भोकांड वासून स्वयंपाकघरांत आली, "माझं दप्तर हरवून टाकलं. अगदीं गाढव आहे जनाबाई. सारखी माझं दप्तर हरवून टाकते."

जनाबाई कमरेवर हात देऊन आणि आ वासून नुसती उभी होती.

"बघत काय उभ्या राहिलां? द्या तिचं दप्तर शोधून. आणि लगेच हे कपडे भरून घ्या. नाहींतर पडतील रढळत इकडेच." लीला खेकसली.

"आपुनंच दप्तार ठिवतात कुटं ना कुटं. अन् मंग माज्यावर उगाच नाव घ्यतात." जनाबाई पुटपुटत निघून गेली.

अंगाला हेलकावे देत बावळटासारखी तिला जातांना पाहून लीलाच्या मस्तकांत तिडीक उठली, "ध्यान कुठलं! एकेक छळायला माणसं आलीं आहेत ह्या घरांत."

अरुणाला शाळेंत पोंचवून लीला परत येत होती तों रस्त्यांतच तिला काकासाहेब कायंदे भेटले.

झालं! आतां अर्धा तास रस्त्यांत खोळंबा.

"हं ऽ, काय!" कायंदे म्हणाले. 'काय' हा शब्द उच्चारल्यानंतर त्यांनीं एक मिटकी मारली. दोन शब्द उच्चारले कीं एक मिटकी







अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

मारायची त्यांना संवय होती. कदाचित् तोंडांतली कवळी पक्की बसली आहे कीं नाहीं हे जिभेनं चाचपून बघण्याच्या उद्देशानं ती ते अशी मिटक्या मारीत असावेत.

"कुठं निघालांत?" लीलानं विचारलं.

"निघालों होतों असाच. म्हटलं वाचनालयांत जावं, जरा मासिकं चाळावीं, येतांयेतां कांहीं केळीं मिळालीं तर घेऊन यावीं. उद्यां गुरुवार आहे ना आमचा."

(लीलानं एकंदरींत दहा मिटक्या मोजल्या.)

"गेली का बेबी शाळेंत?" कायंद्यांनीं विचारलं. खरं बोलणं भागच होतं. "ही बेबीला पोंचवून घरीं चाललें."

"चल तर, तुझ्याबरोबरच घरीं येतों. बरेच दिवसांत आलों नाहीं. सुरेंद्र ऑफिसला गेला असेल ना?" नकळत 'चला कीं' असे उद्गार लीलाच्या तोंडून बाहेर पडले. कायंदे लीलाबरोबर तिच्या घरचा रस्ता आक्रमूं लागले.

लीलाला ह्यावेळीं त्यांच्याशीं बोलायचा मनापासून कंटाळा आला होता पण कायंद्यांना पाहतांच तिच्या नकळत तिला सहानुभूतीचा उमाळा फुटला. ती सहानुभूति तिला आंवरतां येईना. कायंद्यांचं आयुष्य तिला माहीत होतं. म्हाताऱ्याची बायको मरुन बरींच वर्षं झालीं होतीं. मोठा मुलगा विचारींत नव्हता. धाकटा मुलगा मवाली निघाला होता. मधल्या मुलाकडे रहात होते. पण सूनबाई त्यांचा तिटकारा करीत होती. मधला मुलगा फक्त जेवायला वाढीत होता. पण वडिलांशीं भाषण करीत नव्हता. कायंदे बहुतेक वेळ घराबाहेर काढायचे. कुठें वाचनालयांत जाऊन वर्तमानपत्रं नाहींतर मासिकं चाळीत बसायचे, नाहींतर कुणाच्या तरी घरीं जाऊन आपली रडकथा ऐकवायचे. लोकांच्या सहानुभूतीवर जगण्याची त्यांना संवय जडली होती. फाटकेतुटके कपडे घातलेले, दीनवाण्या चेहऱ्याचे कायंदे कुणाला घरीं आलेले फारसे आवडत नसत. पण कुणी त्यांना हांकलूनहि देत नसे. आलांत—या, बसलांत—बसा, चाललांत—जा, लोक त्यांच्याशीं असं वागायचे.

लीला घरीं आली तोंच जनाबाईनीं नन्नीला तिच्यापुढें धरुन म्हटलं, "बाई ऽ दूध उलटी केलं बं. रडायची राहात पन नाई"

लीलानं चटकन् तिला हातांवर घेतलं आणि दोन्ही हातांवर झुलवीत तिची ती समजूत घालूं लागली, "नायू, नायू—बाळीला काय झालं? मी आलं ना? आतां रडायचं कशाला?" नन्नीला दोन्ही हातांवर खेळवीत ती खोलींत येरझारा घालूं लागली. कायंदे डोळे भरुन तिच्याकडे पहात राहिले आणि म्हणाले, "हें सारं प्रेम मुलं विसरुन जातात, नाहीं?"

त्यांच्याकडे बघतां बघतां लीलाला त्यांची एकाएकीं विलक्षण कींव आली. कायंद्यांना सहानुभूतीची अत्यंत गरज होती. ते अगदीं एकटे होते. दुःखी होते. त्यांचं ह्या जगांत कुणी नव्हतं. माणसाला कुणाची कां होईना, पण सोबत लागते. मायेपेक्षांहि सोबतीची गरज आहे माणसाला प्रेमाशिवाय हें आयुष्य किती भयाण आहे.

नन्नी रडायची थांबली तशी लीलानं तिला पाळण्यांत टाकलं आणि जनाबाईला पाळणा हलवायला सांगून ती बाहेर आली. कायंदे टाईम्स-मध्यें डोकं खुपसून बसले होते. वाचतांना लहान मुलांप्रमाणें ते वाचीत असलेला मजकूर तोंडानें म्हणत होते. लीला सामानाची आवराआवर करीत राहिली. कायंद्यांनीं पहिलं पान वाचून संपवलं आणि मग ते लीलाला म्हणाले,

"बाळ झोपलं का तुमचं?"

"हो मघाच."

"आमची नात गेले दोन दिवस आजारी आहे. सूनबाईंचीं जाग्रणं चाललीं आहेत. मग सगळा वैताग निघतो आमच्यावर."

"सूनबाईचं डोकं अजून नाहींच कां शांत झालं?"

कायंद्यांनीं 'चालायचंच' अशा अर्थी हात उडवला.

"आमच्याकडे हल्लीं खाणावळीचा डबा चाललाय. आपल्याला तें अन्न पचत नाहीं. आवडतहि नाहीं. पण सांगणार कुणाला आणि ऐकणार कोण? मला म्हाताऱ्याला जरासा गरम भात असला कीं बस झालं. पण आमचा विचार करतंय कोण? आतां तीं गार गार भाताचीं ढेकळं का आम्ही खायचीं!"

लीलाला कांदेबटाट्याच्या रस्स्याची आठवण झाली. म्हाताऱ्याला पोटभर खायला घालावं आणि तृप्त करावं असं तिला वाटलं. ज्याच्यासाठीं तडफडून अन्न शिजवलं त्याला त्याची पर्वा नव्हती. मग ज्याला गरज होती त्याच्या तोंडांत तरी अन्न पडूं द्यावं.

"थोडं खाणार का आमच्याकडे?" तिनं कायंद्यांना विचारलं.

कायंदे जरासे घुटमळले आणि म्हणाले, "अं...खाऊं कीं."

लीलानं एका बशींत फुलक्या आणि वाटींत रस्सा घातला आणि कायंद्याच्या पुढ्यांत तें आणून ठेवलं. कायंदे मिटक्या मारीत आणि बोटं चाटीत खाऊं लागले. खातांना रस सगळा अंगावर सांडत होता. फुलकीचे तुकडे रस्स्यांत भिजवून हात बरबटवीत ते खात होते. हां हां म्हणतां त्यांनीं चट्टामट्टा उडवला. वाटी चाटून चाटून घेतली. बशींतला कणन्कण वेचून खाल्ला. शक्य असतं तर बशी आणि वाटीहि खाऊन टाकली असती त्यांनीं.

"चांगला झालाय् का रस्सा?" लीलानं विचारलं.

"बरा झालाय्," कायंदे मान डोलावीत म्हणाले. मिसेस् कायंदे बटाट्याचा रस्सा काय सुरेख करायच्या! "अजून आठवण आली कीं तोंडाला पाणी सुटतं."

लीलाच्या मनांतली सहानुभूति क्षणार्धांत गळून पडली. एवढं खाऊन

मंगल गृहोपयोगी सोप जेली व (टिनोपॉल मिश्रित) साबू चुरा
१४ पौंडी जेलीचे डबे
(फक्त मुंबईत) घरपोंच केले जातील.
ट्रेड मंगल मार्क
चौकशीः मे. व्ही. गाडगीळ आणि कंपनी
रानडे रोड, दादर, मुंबई २८.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

म्हणे 'बरा झालाय्.' 'चांगला झाला' इतकंसुद्धां म्हणवलं नाहीं थेरडयाच्यानं! हावरट मेला! चाटून चाटून खाल्ला तर खरा. अशानंच सून छळीत असेल. बरं झालं—असंच पाहिजे. आतां कृपा करून उठा आणि चालते व्हा,

माघाच्या सहानुभूतीच्या पाझरांत विरघळून गेलेली तिडीक पुन्हा उठून उभी राहिली संताप...संताप...लीलाचं डोकं भणभणूं लागलं. कशाला आपण ह्या म्हाताऱ्याला घरीं घेऊन आलों कुणास ठाऊक! अशा आपण कां वागवतों!

पुन्हा सकाळची आठवण आली.

पुन्हा सुरेंद्रबद्दलचा राग उसळून उठला. दुष्ट नाहींतर!

रात्रीं भांडण केलं म्हणून झोपायला उशीर झाला. नवीनं दोनदां झोप मोडली. रात्रीं तरी एवढं कांहीं अडलं होतं का? पण हट्ट सोडायचा नाहीं आपला! आपण देखील ठरवलं होतं कीं आज हट्टाला जुमानायचं नाहीं. पण आपणच बावळट! रात्रीं झोपायला उशीर झाला तरी शेवटीं सकाळीं आपल्यालाच धडपडत उठावं लागतं आणि स्वतः स्वारी मात्र सावकाश उठते, सावकाश चहा घेते आणि वर्तमानपत्रं वाचीत घरांत चाललेल्या धडपडीकडे पाठ फिरवून बसते. पण आपण तरी कशाला धडपडलों? कशाला स्वयंपाकाची घाई केली? कशाला स्वतःच स्वतःला दुखवून घेतलं? अडलं होतं का कांहीं? आपण कशाच्या तरी आहारीं जातों, वाहवतों, स्वतःला हरवून बसतों आणि मग चडफडत राहतों.

कार्यंद्यांशीं शब्दहि न बोलतां लीला धुमी बसून राहिली तेव्हां कायंदे मुकाट्यानं निघून गेले. ते गेल्यांवर लीलानं आंघोळ आणि जेवण उरकून घेतलं आणि काल अपुरी सोडलेली कादंबरी वाचायला घेतली. सगळ्या कटकटींचें गाठोडें बाजूला ठेवून ती कादंबरीच्या प्रवाहांत घुसली. आदल्या दिवशीं तरंगत सोडलेले धागेदोरे तिनं स्वतःभोंवती गुरफटून घेतले आणि कल्पनेच्या डोहांत ती खोल खोल बुडूं लागली.

कादंबरीच्या नायकाचें प्रेम एका विवाहित स्त्रीवर जडलेलें असतें. त्या स्त्रीला नवऱ्यापासून मूलबाळ झालेलें नसतें आणि विवाहानंतर एकमेकांपासून तीं सतत दुरावत गेलेलीं असतात. अशा परिस्थितींत नायिकेला प्रेमाची, सहानुभूतीची अत्यंत गरज भासूं लागते. नवऱ्याकडून तिला ज्या प्रकारचें प्रेम हवें असतें तें मिळूं शकत नाहीं. अशा वेळीं तिच्या आयुष्यांत एक पुरुष येतो. तिला त्याची व त्याला तिची अत्यंत ओढ वाटूं लागते. तीनहि चांगलीं माणसें—पण अशा चमत्कारिक परिस्थितींत सांपडतात कीं कुणीच कुणासाठीं कांहींहि करूं शकत नाहीं. नायिकेच्या मनांत भयाण निराशा उत्पन्न होते व त्या भग्न मनस्थितींतच तिचा दुःखमय अंत होतो.

लीलानं कादंबरी वाचून संपवीत आणली होती. नायिका व तिचा प्रियकर ह्यांच्या शेवटच्या भेटीचा प्रसंग ती वाचीत होती. वाचतां वाचतां तिच्या डोळ्यांतून पाणी झरूं लागलें. ती हुंदके देऊन रडूं लागली. त्या क्षणीं ती कादंबरीच्या नायिकेच्याच अवस्थेला जाऊन पोंचली होती. एका भयाण निराशेच्या अंधारांत चाचपडत फिरत होती. त्या निराशेनं ती भारावून गेली होती. खूप रडून घेण्यांत तिला त्या क्षणीं अत्यंत सुख वाटत होतं. असं कांहींतरी विलक्षण घडायला हवं होतं. कांहींतरी विलक्षण......

लीलानं जीभ चावली. छेः! चाललों आपण वाहवत. आपण का आतां कॉलेजमध्यें आहोंत असलीं दिवास्वप्नं पहायला? सगळं सगळं खरं वाटण्याचं तें वय आतां संपलं! ते दिवस संपले. प्रेमावरचा तो विश्वासहि संपला. प्रेमबीम सब झूट आहे. कसलं आलंय प्रेम! आयुष्यांत शेवटीं नुसता द्वेष उरतो—मत्सर उरतो—तिरस्कार उरतो.

ती ताडकन् पलंगावरून उठली. तिच्या पायाच्या धक्क्यानं पलंगाच्या काठावर टाकलेला सुरेंद्रचा बुशकोट खालीं जमिनीवर पडला. तिनं चटकन तो उचलला. अरे हो! सुरेंद्रनं कालच रागानं तो इथं भिरकावून दिला होता. त्याचीं तुटलेलीं बटणं तिनं शिवलीं नव्हतीं म्हणून तिच्यावर तो रागावला होता. तिनं चटकन् शिवणाचा करंडा काढला आणि ती बटणं शिवायला बसली. सकाळींच राग करून झालाय. आतां त्यांत आणखी भर नको. जनाबाईला धोब्याकडे पाठवून इस्त्री करूनहि मागवला

## ही-साप नीति




खड्डयांत पडलेल्या एका कोल्ह्याला काठावर उभा राहिलेला एक बावळट बोकड दिसला. उन्हानें त्रस्त झालेल्या बोकडानें पाण्यांत डुबकणाऱ्या कोल्ह्यास विचारलें, "भाई, आंत थंड वाटत असेल नाहीं का? माझी तर तल्खली होत आहे. कोल्हा धूर्तपणें म्हणाला, "साथी काय सांगूं! मॉस्कोतल्या थंड हवेची आठवण येते. ये, ना, इकडे! आपण सहजीवन जगूं या!" बोकडानें दाढी सावरीत आंत उडी मारली न मारली तोंच कोल्हा त्याच्या पाठीवर पाय देऊन वर चढला आणि त्यानें कोल्हेकुई दिली. त्या पक्षसादानें रानांतले इतर कोल्हे जमले व खड्डयांतल्या बोकडाला वांकुल्या दाखवूं लागले.




अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पाहिजे. सगळी घडी मोडून चुरगाळून टाकलाय्. तें सुद्धां बायकोनंच बघितलं पाहिजे...

तेवढ्यांत दारावरची कडी वाजली.

"कोण आहे ?" लीलानं विचारलं.

दार ढकलून कोकाटे बाई आंत आल्या.

"काय चाललंय शिवणकाम ?"

"कांहीं नाहीं हो. 'ह्यां'चाच बुशकोट दुरुस्त करीत होतें."

"ओ हो ऽ, महत्कार्य चाललंय् म्हणायचं," कोकाटेबाईंनीं धबकन् पलंगावर अंग आदळलं.

"कोठारकर भेटली होती काल मंडळांत," कोकाटेबाई अर्थपूर्ण स्वरांत बोलल्या, "तुम्ही नाहीं आलांत काल !"

"नाहीं आलें, काम होतं जरा—"

"अहो, कामं कुणाला नसतात? आम्ही नाहीं येत कामं टाकून? इथं कुणाला मोठी हौस आलीय् मिरवायची, पण तिथं गेल्यासरशीं तेवढाच वेळ सत्कारणीं लागतो. दोन चांगले शब्द कानावर पडतात. कोठारकर तुम्हाला परवां भेटली होती म्हणे. मी तिला म्हटलं—लीलाताई तर रस्त्यावरच मला भेटल्या होत्या संध्याकाळीं. पण त्या तर बोलल्या नाहींत ही भेटली म्हणून. खोटं बोलायची वाईट संवय आहे तिला. तुम्हालाच विचारून पहावं म्हटलं."

"ती भेटली होती परवां. पण मी तुम्हांला बोलायचं विसरून गेलें," लीला तुटकपणें बोलली. कोकाटेबाई आणि ती ह्या दोघींत गप्पा मारण्याचा प्रमुख विषय कोठारकरीणबाई होत्या. पण दोनतीन दिवसां-पासून लीलानं ठरवलं होतं कीं फिरून कोकाटेबाईंच्या समोर कोठारकरचा विषय काढायचा नाहीं. हो ! आपल्याशीं ती चांगली वागते. उगीच कोकाटेबाईंना ती आवडत नाहीं म्हणून तिची निंदा कशाला करा आणि ऐकून घ्या ? कोकाटेबाई भेटल्या कीं कोठारकरचा विषय काढायचाच नाहीं असं तिनं पक्कं ठरवलं होतं. एवढंच नव्हे तर यापुढं कोकाटे-बाईंना शक्य तों टाळायचं, त्या भेटल्याच तर जपून बोलायचं, असंहि तिनं ठरवलं होतं पण कोकाटेबाई स्वतःच तिच्याकडे आल्या होत्या.

"ही कोठारकर पक्की लबाड आहे बरं का ?" कोकाटेबाई म्हणाल्या.

"असं ? मला कल्पना नाहीं तिच्या स्वभावाची," हा विषय टाळणं आतां अशक्य आहे हें ओळखून लीलानं उत्सुकतेनं विचारलं, "तुम्हांला कसं समजलं ?"

"माझ्याकडे कांहीं दिवसांपूर्वी आली आणि म्हणाली 'पांच रुपये देतां का जरा. संध्याकाळीं परत करतें.' मी म्हटलं 'जाऊं दे. आपली मैत्रीण आहे.' संध्याकाळीं कांहीं आली नाहीं. मी आपली सहज बाजारांत गेलें संध्याकाळीं तर ही बया शिंप्याकडे पोलक्याचा कोरा कपडा घेऊन उभी असलेली दिसली. तेव्हांपासून अजूनपर्यंत पैसे परत करायचं नांव नाहीं. मी देखील विचारायला गेलें नाहीं. बरं नाहीं दिसत तसं विचारणं. पण हिला कांहीं तरी लाज हवी कीं नको ?"

"कमाल आहे बाई. त्या कल्पनाताई साठ्येसुद्धां असंच कांहींतरी सांगत होत्या तिच्याविषयीं. हिला खोडच दिसतेय् उसनंपणा करायची."

"हो, उसन्यावर ऐट मिरवायची. मी असं ऐकलंय कीं तिच्या नवऱ्याला म्हणे असला नट्टापट्टा केलेला चालत नाहीं. तो पैसे देत नाहीं म्हणून ही लोकांकडे तोंड वेंगाडून पैसे आणते आणि आपल्या नट्टापट्ट्याचा खर्च भागवते. ऐपत नाहीं तर नसता तोरा द्यावा कशाला हिला ?"

"चमत्कारिकच बाई दिसतेय् !"

"चमत्कारिक नाहीं तर काय ?"

"मला आतां जपूनच राहिलं पाहिजे जरा. माझ्याशीं फार लाडांत येऊन वागते अलीकडे."

"अगदीं थारा देऊं नका तिला. मला चांगला अनुभव आहे तिचा."

कोकाटेबाई खूप वेळ कोठारकरच्या 'एकेक गंमती' सांगत राहिल्या. लीलाची हंसतां हंसतां पुरेवाट झाली. कोकाटेबाईंना फर्स्टक्लास चहा करून द्यावा असा विचार करून ती स्वतःच चहा करायला उठली. चहावर तिनं त्यांना मसाल्याची सुपारी दिली. त्या जायला निघाल्या तरी आग्रह करकरून तिनं त्यांना बसवून घेतलं.

कोकाटेबाई गेल्या न गेल्या तोंच दारावरची कडी पुन्हा खडखडली.

"आहे का कुणी घरांत ?" कुणा तरी बाईचा अपरिचित आवाज दाराबाहेरून आला. आवाज चांगलाच खणखणीत होता.

"कोण आहे ?" दार उघडीत लीलानं विचारलं.

"माझं जरा आपल्याकडे काम आहे."

"काय काम आहे ?"

"अहो, पण जरा आंत तर येऊं द्याल. बसा तर म्हणाल."

बोलणारी बाई उंच आणि हडकुळी होती. आवाज पुरुषी होता आणि खडसावून बोलत होती. केस पांढरे होत आले होते. अंगावरचे कपडे मळके होते.

लीलाला त्या बाईची भीति वाटली. तिच्या नजरेंतल्या हुकमतीची भीति वाटली. तिच्या आवाजांतल्या कठोरपणाची भीति वाटली. अलीकडे दारावर कुठल्या तरी आश्रमाचें नांव घेऊन वर्गणी गोळा करायला पुष्कळच स्त्रिया येत. कुणी फिरत्या विक्रेत्याहि असत. पण त्या कुणी इतक्या अरेरावीनं वागत नसत. ही बाई वेडी तर नव्हती ? तिला आंत घेतल्याबद्दल लीलाला पश्चात्ताप वाटूं लागला. "काय काम आहे ?" तिनं घाबरतच विचारलं.

"आधीं मला थोडं पाणी द्या बघूं." ती टेबलावरलें मासिक उचलून त्यानं वारा घेत म्हणाली.

लीला मुकाट्यानं पाणी आणायला आंत आली. जनाबाई स्वयंपाक-घरांत घोरत पडली होती. तिला आ वासून झोपलेली पहातांच लीलाच्या मस्तकांत नेहमींची तिडीक उठली. ध्यान नाहींतर ! अशा वेळीं नेमकं झोपलेलं असतं. नको तीं माणसं घरांत नेमकीं घुसतात. त्यावेळीं त्यांच्या अंगावर गुरकावायला दारांत नेमकं नसतं हें ध्यान.

दिवाळी शुभचिंतन
काशिनाथ नारायण परांजपे
सोनें-चांदीच्या व मोत्यांच्या दागिन्यांचे व्यापारी
७२, काऊ लेन, घाटकोपरवाला चाळ, मुगभाट, मुंबई नं. ४

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

अनुक्रमणिका

घटाघटा पाणी पिऊन होतांच ती बाई म्हणाली. "मला भूक लागली आहे. कांहीं खायला द्याल का? सकाळपासून मी उपाशी आहें. शेजारच्या घरीं गेलें तर त्यांनीं जोरानं दार लावून घेतलं. माझं बोट चिमटलं. आजकाल माणुसकी राहिली नाहीं कुठं. तुम्ही देणार आहांत का खायला? का तुमच्याकडेहि गचांडीच मिळणार आहे मला?"

ती बाई खुशाल उद्दामासारखी डोळे वटारून लीलाच्या अंगावर ओरडत होती. आतां मात्र लीला खरोखरच भ्याली होती. ती घाबऱ्या घाबऱ्या आंत गेली आणि पितळेच्या थाळींत पाव आणि चटणी घेऊन आली. कुत्र्यानं उकिरड्यावर उडवलेलं अन्न वसवसून खावं तसं त्या बाईनं एका दमांत खाऊन घेतलं.

खरकटे हात तिनं तसेच पातळाला पुसले. अचानक तिचं लक्ष समोरच्या भिंतीवर टांगलेल्या कॅलेंडरकडे गेलं.

"अशी सुंदर होतें मी दिसायला," ती बाई कॅलेंडरवरील चित्राकडे बोट दाखवून म्हणाली.

लीलानं मान वर करून पाहिलं. एक सडपातळ उंच मुलगी ऐटींत डाव्या हातावर पदराचा घोळ सावरीत तिरप्या नजरेनं पाहून हंसत होती. कां कुणास ठाऊक, लीलाला त्या बाईचं म्हणणं खरं वाटलं.

"आतां माझ्याकडं पाहून खरं नाहीं वाटणार तुम्हाला! पण अशी होतें मी दिसायला. पुरुष नुसते वेडे व्हायचे माझ्यावर. त्या मेल्यानं माझा घात केला नसता तर..." ती बाई डोळे वटारून चित्राकडे बघत राहिली. लीलाला तिची दया आली. पण ह्या बाईच्या अधिक आहारीं जाण्यांत अर्थ नव्हता.

"हें पहा, आतां तुम्ही जा. मला कामं आहेत दुसरीं," लीला मोठ्या मुष्किलीनं धीर करून म्हणाली.

"तुम्ही मला हाकलणार आहांत तें मला माहीतच आहे. जगांत दया म्हणून कुठं उरली नाहीं," ती बाई कर्कश सुरांत म्हणाली.

लीला घाईघाईनं आंत गेली आणि पांच रुपयांची नोट कपाटांतून काढून ती तिनं त्या बाईच्या हातांत आणून कोंबली.

"आतां जा......" ती केविलवाणं तोंड करून त्या बाईला म्हणाली.

"तुमच्याकडे एखादं पातळ आहे का हो? सिल्कचं असलं तर द्या ना—मला शोभेल असं," ती बाई निर्लज्जपणें म्हणाली.

आपल्यावर होणाऱ्या अन्यायाच्या जाणीवेनं लीला अगदीं हताश झाली होती. पण कांहीं झालं तरी ही बाई घराबाहेर जायला हवी होती. लीला आंत गेली आणि दिसेल ती साडी उचलून तिनं ती त्या बाईच्या अंगावर आणून फेकली.

"जा...जा...", तिला किंचाळून ओरडावंसं वाटलं. पण ती अगतिकपणें तशीच उभी राहिली.

आतां मात्र ती बाई उठली व शब्दहि न बोलतां चालूं लागली.

लीलानं धाडकन् दार लावलं आणि सुटकेचा निःश्वास सोडला. आज माणसांनीं अगदीं कमाल चालवली होती. प्रत्येकजण तिला आपल्या इच्छेला जुंपीत होता – हवं तसं वांकवीत होता. सगळ्या माणसांची लीलाला चीड आली, पण त्या सर्वांपेक्षां लीलाला स्वतःची चीड आली.

आपण तरी कां आपल्याला जुंपून घेतों? आपण का हवं तसं वांकतों? आपण असा कां वागतों? अखेर आपण आहोत तरी कोण?

आपण कोण आहोंत?

एक व्यक्ति! एक स्वतंत्र व्यक्ति कीं आपल्याला भेटणारी प्रत्येक व्यक्ति म्हणजे आपण? ह्या असंख्यपणांत आपलं स्वतंत्र अस्तित्व कुठं आहे?

त्यांतल्या एकाहि प्रश्नाचं उत्तर तिला सांपडलं नाहीं. ● ● ●


फिलिप्समुळेंच उत्सवप्रसंगी प्रकाश व आनंदाचे वातावरण




फिलिप्स













अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



*दाढ दुखीचें दुःख अपार;*
*पण त्यावर*
*रामबाण उपाय हा एकच;*
*ही एकदंतकथा वाचणें.*
*क्षणभर त्या दुःखाचा*
*विसर पडेल.*

# एकदंतकथा

*आणि तसें झालें तर ती*
*पुन्हां पुन्हां वाचा;*
*दुःख अवघेंचि विरोनि जाईल....*

**मा**नवी देह पंचमहाभूतांचा बनलेला आहे असें म्हणतात. ज्या ज्ञानी मंडळींना मानवी देहांत पंचमहाभूतें दिसलीं त्यांना महाभूतांतील खवीस किंवा वेताळ म्हणतां येईल असें सहावें महाभूत कसें दिसलें नाहीं याचें मला राहून राहून नवल वाटतें. या सहाव्या महाभूताला सामान्यांच्या भाषेंत 'दांत' असें म्हणतात.

माझ्या मतें दांत ही परमेश्वरानें मारून ठेवलेली मेख आहे. मानवी देहाची सर्व रचना परिपूर्ण केल्यानंतर जवळजवळ सहासात महिन्यांनीं ही दांताची कल्पना परमेश्वराला सुचली असावी. नाहीं तर इतर सर्व अवयव एकदम फुटत असतांना दांतच तेवढे एखाद्या सभेच्या मुख्य पाहुण्यासारखे मागाहून कां यावेत!

तुटलेलें बोट पुन्हा उगवल्याचें माझ्या तरी पाहण्यांत नाहीं किंवा पहिलें नकटें नाक गळून पडून त्या जागीं नवें नाक आल्याचेंहि ऐकिवांत नाहीं. पण दांत हा एकच अवयव असा आहे कीं जो दोन दोनदां उगवतो. तेव्हां माणसाला शरण आणतांना तृण धरायला एखादी चांगली जागा असावी म्हणून ही दांतांची योजना झाली आहे याबद्दल माझी तरी खात्री आहे. तसं दांतानीं माणसाला काय दिलं आहे! दुसरा कुठलाहि अवयव उगवतांना माणसाला त्रास होत नाहीं पण दांत हे त्रास दिल्याशिवाय उगवत नाहींत. ते येतांना ताप आणि गेल्यावर पश्चात्ताप!

मला स्वतःला तर दांताबद्दल मुळींच प्रेम वाटत नाहीं. कारण लहानपणीं मला दांत येत असतांना त्यांनीं घरांतल्या माणसांना रडवलं होतं म्हणे! अर्थात् हें सर्वस्वी खरें असेलच असें नाहीं. त्यांच्याबरोबर मीहि रडलों असलों पाहिजे. दांत आल्यानंतरहि मी दिसेल त्याला चावत असे अशीहि एक दंतकथा ऐकून अजूनहि कित्येक नातेवाईक माझ्यापासून दूर पळतात. आतां मी दिसेल त्याला मुळींच चावत नाहीं. कारण चावण्याची हौस अनेकदां स्वतःचींच मनगटें चावून चावून भागली आहे! नाहीं म्हणायला गद्धेपंचविशींत माझ्या दातांचा दुसऱ्यांना थोडा उपद्रव झाल्याच्या तक्रारी मला ऐकाव्या लागल्या. पण तो प्रकार कांहींसा आपलेच दांत आणि आपलेच ओठ अशा स्वरूपाचा असल्यामुळें त्या तक्रारी फिर्यादी पक्षांनीं मुक्यानेंच गिळल्या. पण माझ्या दातानीं मला एवढा उपद्रव दिला आहे कीं त्या मानानें दुसऱ्यांना झालेला उपद्रव कांहींच नाहीं. आणि म्हणूनच दांतांबद्दल मला दांतांत धरतां येईल एवढासुद्धां आदर राहिलेला नाहीं. माझ्याप्रमाणें मराठी भाषेलाही दांतांबद्दल आदर नाहीं असेंहि मला नंतर आढळून आलें. कारण मराठी भाषेंत अशी म्हण किंवा शब्दप्रयोग नाहीं ज्यांत दांतांबद्दल मंगल भावना व्यक्त झाली आहे. ज्या म्हणी व शब्दप्रयोग दांतांशीं निगडीत आहेत त्या दारिद्र्य, भिकारपणा, असभ्यपणा यांचें

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

प्रत्यंतर घडविणाऱ्या आहेत. नाहीं म्हणायला प्रेमविव्हल कवींनीं प्रेयसीच्या दांतांना कुंद-कळ्यांपर्यंत नेऊन पोचविलें असेल तेवढाच अपवाद! तरी पण केवळ प्रेयसीच्या दांतांत जीव अडकून तिच्या प्राप्तीसाठीं झगडणाऱ्या प्रियकराचें उदाहरण माझ्या तरी ऐकिवांत नाहीं. डोळे, रंग, ओठ, एखादा तीळ, एखादी खळी माणसाला गुंतवतात. पण दांत पाहून वेडा झालेला प्रियकर मला अजून भेटावयाचा आहे. लहानपणीं जे न घासल्याबद्दल मार खावा लागतो, तरुणपणीं जे फार घाशीत बसल्याबद्दल वडील माणसांचीं बोलणीं खावीं लागतात, व्यवहारांत जे कोण केव्हां पाडील याचा भरवंसा नसतो आणि जे दंतवैद्याचे खिसे भरतात ते दांत अशी माझी दांतांबद्दलची कल्पना आहे.

मनुष्य स्वभावाप्रमाणें मीहि प्रथम दांताची पर्वा केली नाहीं. दांत दुखणाऱ्या माणसांची अवहेलना केली. एवढ्याशा दांतदुखीचें एवढें मोठें कौतुक लोक कां करतात हें मला कळत नसे. आमच्या परशा पहेलवानासारखा मस्त गडीसुद्धा दांतापुढं चारीमुंड्या चीत झालेला मीं पाहिला तेव्हां मला या दांतदुखीचा बरा संशय आला.

परशा हा जन्मापासून पहेलवान. रानांत अनेकदां लांडग्यांशीं एकटा झुंजलेला. अनेक लांडग्यांचे सुळे नुसत्या काठीच्या तडाख्यानें पाडणारा हा गडी नेहमी अशा ऐटींत चालायचा कीं जसा काय वनराजच! छाती इतकी पुढें काढायचा कीं अनेकदां आधीं त्याची छातीच दिसायची आणि अर्ध्या मिनिटानें त्याचा चेहेरा दिसायचा. रस्त्यांत भेटला की, "काय रं मुड्द्या, कुट निगालास?" असा त्याच्या दृष्टीनें अत्यंत प्रेमळ पण माझ्या दृष्टीनें अतिशय उर्मट असा सवाल करायचा. मला त्याचा राग येत असे.

"चाल्लोंय् कुस्ती मारायला—येतोस?"

"कुस्ती?" असं म्हणून तो अत्यंत विकट हास्य करायचा आणि "अरं अगुदर माशी तर मार नाकावरली—मग कुस्तीचं बगू." असं म्हणून माझ्या खांद्यावर मोठ्या प्रेमानें दणका द्यायचा. पण गंमत अशी की दणका मला दिला तरी लागायचं त्याला.

"च्या आयला, लइ हाडं हैत तुज्या अंगांत —दगडावाणी लागत्यात हाताला." असं त्यानं म्हटलं की हाडाच्या बाबतींत कां होईना पण आपण त्याच्या वरचढ आहोत याचाच आनंद अधिक वाटायचा. मग जरा खुषींत येऊन म्हणायचा, "मारशील ल्येका तूं कुस्तीबी मारशील ह्या हाडांच्या जोरावर. काय खरं का न्हाइ हाडके पैलवान?"

आपल्या ताकदीची—मस्तीची त्याला फार घमेंड होती. नजरेंत जरब होती. मान वळवून कुणाकडं त्यानं पाहिलं तर तो माणूस जागच्या जागीं उभा रहात असे. स्वतःच्या उल्लेख करतांना तो शिंव्ह म्हणायचा. स्वतःला 'शिंव्ह' म्हणून घेण्यांत त्याला अभिमान वाटायचा.

"काय परशा, यंदा कशी काय तयारी आहे?" असं कुणीं विचारलं की त्याचं उत्तर ठरलेलं असे,

"शिंव्हाला काय भ्या हाय व्हय कुनाचं?"

'शिंव्ह मातीत उतरला की लांडगी कोल्ही पाक पशार व्हत्यात,' 'शिंव्हाला अल्याड लई झोप लागतीया,' अशा भाषेंत तो नेहमी स्वतःबद्दल बोलायचा. त्याला दांत घासायचा विलक्षण कंटाळा असे. चारआठ दिवसांतून एकदां केव्हांतरी दांत घासण्याचें सोंग करायचा. त्याबद्दल मी एकदां सहज त्याला विचारलें, "परशा, तूं दांत घाशीत नाहीस वाटतं रोज?" "शिंव्ह काय दांत घासतो व्हय कदी?" असें त्यानें ताडकन उत्तर दिलें.

असा हा सिंहासारखा उग्र व बलदंड परशा एके दिवशीं सपाटून मार खाल्लेल्या कुत्र्यासारखा समोरून येत होता. त्याची ऐट, त्याचा दिमाख, त्याची घमेंड यांपैकीं कशाचाहि मागमूस त्याच्या चेहऱ्यावर दिसत नव्हता. कुस्तींत हरला तरी तो कधीं असा दिसला नव्हता. जवळ जाऊन मीं विचारलं, "काय पहेलवान, काय झालं आज?"

केविलवाणा चेहरा करून म्हणाला, "दांत रं! काल रातच्या धरनं असा ठणकतुया... काईएक सुचनासं झालया—"

"अरे सिंहाचे दांत कधीं दुखतात होय?" मी जरा थट्टेनं म्हणालों.

"कसला शिंव्ह घिऊन बसलास मर्दा—ह्या दांतानं शिंव्हाचा पाक चकरा करून टाकलाया." असं म्हणून त्यानं त्याच्या दांतदुखीची दर्दभरी कहाणी मला सांगितली आणि अखेरीस म्हणाला, "अरं शिंव्हच न्हवं नरशिंव्ह आला तरी दांताम्होरं त्येचं काई एक चालायचं न्हाई."

मला त्यावेळीं परशाचं हसूं आलं. पण कांहीं काळानंतर मीझाहि जेव्हां परशा झाला तेव्हां माझा नक्षा पार उतरला. माणसाला मरण आणि दांतदुखी चुकवताच येत नसावी. किंबहुना दांत ह्या इंद्रियाचें एक कार्य दुखणें हेंच असावें. जन्मांत एकदांहि दांत न दुखलेला मनुष्य मला तरी अजून आढळलेला नाहीं. असा कुणी असलाच तर तो कमनशिबीच असला पाहिजे. ब्रह्मांड पहाण्याचा योग त्याच्या नशिबीं नाहीं!

अनेक वर्षें समोर येईल तें मिटल्या डोळ्यांनीं चावणारा माझा दांत एके दिवशीं कांहीं कारण नसतांना ठणकूं लागला. असा ठणकूं लागला कीं त्यानें नरसिंहाचें रूप घेतलें. आणि माझी अवस्था त्याच्या मांडीवर पडलेल्या हिरण्यकश्यपूसारखी हीनदीन झाली. दांत ठणकूं लागल्याबरोबर मीं पहिली गोष्ट कोणती केली असेल तर ती ही कीं ज्यांच्या ज्यांच्या दाढदुखींची अवहेलना केली होती त्या सर्व माणसांची त्यांच्या दांतां आणि दाढांसकट मनांतल्या मनांत क्षमा मागितली.

ऊंस गोड लागला कीं तो मुळापासून खाण्याची प्रवृत्ति जशी माणसांत असते तशी दांतांतहि असावी. कारण दांत दुखायला लागला कीं तो मुळापासून दुखूं लागतो. किंबहुना दांताला मूळ असतें हें फक्त तो दुखायला लागला म्हणजेच कळतें. माझा दांत जेव्हां दुखायला लागला तेव्हां तर माझी खात्रीच झाली कीं आपण आरोग्यशास्त्राच्या पुस्तकांत पाहिलेलें दांतांचें चित्र आणि प्रत्यक्ष आपले दांत यांत फार फरक असला पाहिजे. आपल्या दांताला मूळ नसून झाडासारख्या मुळ्या असल्या पाहिजेत आणि त्या हिरड्यांत सर्वत्र पसरल्या असल्या पाहिजेत. नाहींतर सगळेच दांत दुखत असल्याचा भास मला कां व्हावा? प्रत्येक दांताला हात लावून पाहिल्यानंतर ज्या दांतानें शंख करायला लावला तो दुखरा दांत याची खात्री झाली. दुखणारा दांत हा स्त्रीपेक्षांहि शालीन असतो. आजची स्त्री धक्के खाऊन सहनशील झाली आहे. पण दुखऱ्या दांताला लहानसा स्पर्शसुद्धां खपत नाहीं! बरं, हें दुखणें तरी साधें सरळ असावें? तेंहि नाहीं. एखाद्या कवीच्या मनांतील जिप्सीसारखा एखादा लाकूडतोड्या माझ्या दांताच्या मुळाशीं खोल बसलेला असतो आणि तो एकामागून एक घाव घालीत असतो.

वसंत सबनीस

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

न
व्या
का
दं
ब
ऱ्या

■ अलगूज ■ चंदन ■ माकडीचा माळ ■ रानगंगा : अण्णाभाऊ साठे ■ रानपाणी ■ एक डोळा बोलतो आहे ■ पिसाटवारा ■ एक धागा सुखाचा : श्रीपाद काळे ■ माणूस : मनोहर तल्हार ■ पुनर्जन्म : कृ. ज. दिवेकर ■ अवेळ : माधव कानिटकर ■ चक्र ■ सारे प्रवासी घडीचे : जयवंत दळवी ■ राक्षस [मॉबी डिक] : रघुवीर सामंत ■ ऋणानुबंध : राम कृ. जोशी ■ कांटा : भाऊ पाध्ये ■ देवकी : मधु मंगेश कर्णिक ■ उडोनी हंस चालला : गो. नी. दांडेकर ■ भाग्यचक्र : अं. शं. अग्निहोत्री ■ सर्कस सुंदरी : चन्द्रकांत काकोडकर ■ रत्नदीप ■ सौभाग्य : मामा वरेरकर ■ कुलाब्याची दांडी ■ निरंजन : ना. सी. फडके.

मॅजेस्टिक बुक स्टॉल

गिरगांव नाका, मुंबई ४

●

शनिपाराजवळ, पुणें २

असें म्हणतात कीं दिवसा सभ्य दिसणारीं माणसें रात्रीं आपल्या खऱ्या रूपांत फिरतात. दांत हा अवयवहि अशाच माणसांसारखा असावा. नाहींतरी दिवसा अधूनमधून पण सभ्यपणें दुखणारा दांत रात्रीं राक्षसासारखा अक्राळविक्राळ कां होतो ? दांतांत आणि चोरांत साम्य असतें तें याचबाबतींत दोघेहि रात्रीं गडबड करतात.

दांत दुखण्यानें मी जसा लाकूडतोड्यासारख्या काव्यकल्पना करतो तसाच अध्यात्मिक तत्त्वचिंतनहि करतो. दांत दुखतो तेव्हां मला साक्षात्कार होतो कीं दांत हेच सत्य आहे जग आणि ब्रह्म मिथ्या आहेत. त्या क्षणीं संसार असार वाटतो, नेहमीं हवेहवेसे वाटणारे शेंगदाणे दगडासारखे वेचव लागतात, बायको व मुलें हा केवळ भास आहे असें वाटतें, समोरून येणारी एखादी बांधेसूद सुंदरी डोळ्यांना जाणवतच नाहीं आणि दांताचा ठणका मला ब्रह्मांड दाखवू लागतो. रात्रभर माझ्या ब्रह्मांडाच्या दहावीस फेऱ्या तरी सहज होतात आणि पहाटे ब्रह्मांड मिथ्या असून दांतच सत्य आहे याची पुन्हा एकदां जाणीव होते.

माझ्याबद्दल लोकापवाद फार. दांतदुखीहि त्यांतून सुटलेली नाहीं. माझ्या दांतदुखीच्या काळांत सबंध आळीला रात्रभर झोंप मिळत नाहीं असें म्हणतात. पण माझा यावर विश्वास नाहीं. अर्थात् आळींतील सर्व लोक आळीपाळीनें माझ्या घरांत डोकावून "फक्त दांतदुखीच ना ?" असा सवाल करून जातात हें खरें आहे. पण यावरून त्यांना झोंप येत नाहीं असा निष्कर्ष काढणें बरोबर नाहीं. आतां मागऱ्याच दांतदुखीच्या वेळीं (अलीकडे दांतदुखी ही बाळंतपणासारखी नेमानें येऊं लागली आहे ! ती लांबवण्याचा मी प्रयत्न करतों पण अजून यश नाहीं.) मी पलंगाच्या कोपऱ्यांत दोन्ही हातांत तोंड धरून (आपलेच हात आणि आपलेंच तोंड) बसलों होतों. (दांतदुखीच्या काळांत सामान्यतः मी असाच बसतो.) चेहेऱ्यावर बहुधा कुणीतरी नुकतीच थोबाडींत मारल्याचा भाव असावा. कारण मी आरशांत पहात नाहीं. तोंडातल्या दांताला आरसा कशाला ! मी घशांतल्या घशांत आवाज बंद करण्याचा प्रयत्न करून सुद्धां तो बंद होत नव्हता. घसा आणि जीभ फितूर झाली होती. मी फारच मोठ्यानें ओरडत होतों असें बायकोचें मत होतें. आणि माझ्याबाबतींतील बायकोचें मत हें बहुधा सबंध आळीचें मत असतें.

"अहो, केवढ्यांदा ओरडताय् ? लोकांना काय वाटेल ?" अशी दमदाटी बायकोशिवाय कोण देणार ?

"माझा दांत दुखतोय त्याला मी काय करूं ?"

"पण शेजारींपाजारीं माणसं रहतात. तीं काय म्हणतील ? अगदी लहान मुलासारखे काय थैमान घालताय् ?"

"दांत...दांत...दांत..." मी चिडून म्हणालों.

"तें कळलं."

"तुला कळलं. सगळ्यांना कुठं कळलय् !"

"सगळ्या जगाला का कळायला पाहिजे ! थोडा तरी सोशिकपणा दाखवाना म्हणतें मी."

"तूं लाख म्हणतेस—दांत तुझा नाहीं. तो माझा आहे. माझ्या दांतदुखीबद्दल मीं किती ओरडावं हें ठरविणारी तूं कोण !"

"मग खुश्शाल ओरडा ऽ ऽ"

"ओरडीन...ओरडीन...सोडतों की काय ! आई ग ऽ ऽ ऽ...मेलो ऽ ऽ ऽ"

"आतां गप्प बसा जरा. मी कापूर देतें दांताखालीं धरायला. त्यानं ठणका कमी होईल."

"नको ऽ ऽ ऽ...सरळ बत्ता आण आणि दांतावर हाण."

"वेड लागलंय कीं काय तुम्हांला ?"

"तूं खल करूं नकोस बत्ता आण."

"इश्श्य ! मेला एवढा दांत दुखतोय तरी शब्दावर कोटी करायची सोडूं नका !"

तेवढ्यांत बाहेर कुणी तरी आले. बायको जाऊन पाहून आली आणि खालच्या आवाजांत मला म्हणाली, "दाते आले आहेत." "ह्या दात्यांचा आणि दांतांचा कांहीं संबंध आहे कीं काय ? माझ्या प्रत्येक दांतदुखीच्या वेळीं नेमके दाते कसे प्रथम येतात ?" दांत दुखीच्या काळांत माझी सहनशक्ति पार खलास झालेली असते. दाते किंवा दातार ह्या दांतांशीं जवळीक दाखविणाऱ्या माणसांनाहि भेटूं नये असें वाटतें !

माझ्या दांतदुखीचें आणखी एक वैशिष्ट्य असे कीं माझ्या विव्हळण्यानें शेजारीपाजारी गोळा होतात आणि माझ्या दांतांच्या अध्यक्षतेखालीं दांतदुखी, ती कां होतें, टाळावी कशी आणि झाल्यावर कोणते उपचार करावेत यावर एकदां तरी परिसंवाद होतोच. उपस्थित वक्ते मोठ्या हिरिरीनें त्यांत भाग घेतात. हीच मंडळी एवढ्या मोठ्यानें बोलतात कीं माझें विव्हळणें त्यांत बुडून जातें. माझा अनुभव








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

असा कीं दांतदुखीवरील चर्चेनें दांत दुखी मुळीच कमी होत नाहीं! दांतदुखीवरील इतके उपचार मला पाठ झाले आहेत कीं मी तेवढ्या भांडवलावर दंतवैद्याचा धंदा कांहीं दिवस सहज करूं शकेन. माझा दांत दुखूं लागला कीं मी बायकोला कांहीं उपचार करायला सांगतों आणि तीहि आपले कांहीं उपचार करते. अशीं मिळून २०-२५ प्रकारचीं औषधें, बोळे माझ्या दांतामागें लागतात. चार दिवसांनीं दांत दुखायचा थांबतो. कशामुळें थांबला याचा शोध करायच्या मी भानगडीत पडत नाहीं. दांत थांबल्याचें कळल्याबरोबर परिसंवादांतील सगळे वक्ते आपलाच उपचार लागू पडला कीं नाहीं याची खात्री करून घेण्यासाठीं येतात. मी कुणाचेंहि मन दुखवीत नाहीं. प्रत्येकाला त्यानें सुचविलेल्या उपायानेंच गुण आल्याची कबुली देऊन मोकळा होतों. सगळे खूष होतात. दंत आघाडीवर सर्वत्र सामसूम होते. एखाद दुसरा महिना जातो आणि पुन्हां तोच दांत, तोच ठणका आणि तेच उपचार यांचा पुन्हा प्रयोग होतो.

या सगळ्याला कंटाळून शेवटीं मी दांताचा प्रश्न कायमचा सोडविण्याच्या दृष्टीनें तो दांतच काढून टाकण्याचा निर्धार जाहीर केला. अनेकांचा सल्ला घेऊन आणि अनेक दंतवैद्यांचे चेहेरे पाहून त्यांतल्या त्यांत बऱ्यापैकीं दंतवैद्य गाठला. कां कुणास ठाऊक पण माझी अशी समजूत झाली कीं ज्याचे दांत चांगले असतील असाच दंतवैद्य शोधणें बरें. यापूर्वी आयुष्यांत दंतवैद्याशीं कसलाहि संबंध आला नव्हता. आणि तेंच ठीक होते असें संबंध आल्यावर वाटलें. मी त्याला भेटून सारी दंतकथा सांगितली. दांत काढून टाकण्याचा माझा विचार दंतवैद्याइतका दुसऱ्या कुणालाच पसंत पडला नाहीं. दांत काढण्याबाबत आमचें मतैक्य झाल्यावर पुढचा मार्ग सरळ होता. फक्त दांत काढायलाहि पैसे द्यावे लागतात याचें वाईट वाटलें. पण मग माझी मींच समजूत घातली कीं, आपण डोक्याचे केस मुळासकट काढीत नाहीं तरी पैसे देतो मग दांत मुळासकट काढण्यासाठीं पैसे दिले तर काय बिघडलें?

आणि मी प्रामाणिकपणें सांगतों कीं दहा बारा वर्षांपूर्वी दंतवैद्यांबद्दलच्या खऱ्याखुऱ्या दंतकथा ऐकल्या होत्या त्यावरून दंतवैद्य हा प्राणी सुतार आणि लोहार यांच्या दरम्यान कुठेंतरी असावा अशी समजूत होती. दंतवैद्याची खुर्ची, दांत उपटण्याची क्रिया इत्यादि सर्व गोष्टींबद्दल माझ्या मनांत विक्राळ भीति होती. पण प्रत्यक्षांत तसें कांहीं वाटलें नाहीं. दंतवैद्य अलीकडे फारच माणसाळले आहेत असें माझें प्रामाणिक मत झालें. त्यानें माझ्या हिरड्यांत इंजेक्शन देऊन इतका लीलया दांत उपटला कीं मी आश्चर्यचकित होऊन पहातच राहिलों. दांत उपटण्याची क्रिया इतकी सोपी असेल असें वाटलें नव्हतें. मी आजवर शत्रूंना आणि शेजाऱ्यांना भांडणाचें वेळीं दांत उपटून हातांत ठेवीन', 'दांत घशांत घालीन' अशा माझ्या शक्तीचें प्रदर्शन करणाऱ्या धमक्या दिल्या होत्या त्यांना कांहींच अर्थ नव्हता, याची हळहळ दंतवैद्याच्या खुर्चीत असतांनाच वाटली.

दंतवैद्यानें दांत दाखवला. हाच तो खल दंत! ज्यानें आज माझें बायकोपुढें हंसें केलें तोच हा नीच दांत. नतद्रष्टा! तुला हेंच शासन योग्य आहे असें मी उरलेले दांतओठ खाऊन मनाशीं म्हणालों. आतां पुन्हां तो ठणका लागणार नाहीं, पुन्हां ते बोळे धरावे लागणार नाहींत, पुन्हां बायकोचा उपदेश ऐकावा लागणार ह्या विचारांनीं मी आनंदानें बेहोष झालों. उरलेल्या दांतांना धाक बसावा म्हणून तो काढलेला दांत घरी नेण्याचा विचार मनांत येऊन गेला. पण त्या दांताची संगतसुद्धां नको असें वाटून मीं तो दंतवैद्यालाच अर्पण केला. दधिचीनें आपली सगळीं हाडे दिलीं आपण एखादा दांत दायला कांहींच हरकत नाहीं.

बाजीरावला मस्तानी मिळाल्याबद्दल जेवढा आनंद झाला नसेल तेवढा मला दांत गेल्याबद्दल झाला. मी विजयोन्मादांतच घरीं आलों. पूर्वी मराठे सरदार शत्रूचा निःपात करून जसे घरीं येत असतील तसा मी आलों होतों. दारांतूनच ओरडून चारपांच शेजाऱ्यांना सांगितलें कीं, 'तो तुम्हांला जागवणारा दांत गेला. यापुढें दंत सताह नाहीं' बायकोपुढे उभा राहून 'प्रिये पहा दांत निघुनि गेला ऽऽऽ' असें नाटकांतील नायकाच्या आवेशांत गाणेंहि म्हणालों. इंजेक्शनचा अम्मल उतरल्यानंतर ठणका लागला तरी तो प्रेमभंगाच्या ठणक्यासारखा तात्पुरता होता. तो मीं सहज सहन केला. प्रेमभंग सहन करणाऱ्याला हा ठणका अगदींच मामुली वाटतो.

दोन दिवसानंतर आनंद थोडा कमी झाला. बायकोला एक दांत काढल्यावर मी कसा दिसतो हें बारकाईनें पाहण्याची लहर आली मी आ वासून तिच्यापुढे उभा राहिलो. ती सहज म्हणाली, "तुमचा कुठला दांत दुखत होता?"

"अग...हा..." असें म्हणून मी त्या दुखणाऱ्या दांताच्या जागीं बोट ठेवलें. तो दांत तिथेंच होता. त्याच्या पलीकडचा दांत गेला होता. न दुखणारा!

"म्हणजे" मीं झपाट्यानें आरसा पुढें घेतला आणि कांहीं वेळ तोंडें वेडीवाकडीं करून व कांहीं वेळ आरसा वेडावाकडा करून पाहिले. दुखणारा नीच दांत जागच्या जागींच होता. मी मटकन खालीं बसलों. एकच इच्छा प्रबळ झाली कीं त्या दंतवैद्याचे सगळे दांत पाडून यावेत.

• • •

"दृष्टी विना सृष्टी फुकट"
म्हणून नसलेली दृष्टी मिळविण्यासाठीं



सुंदर आणि कंपनी चष्म्यांचे व्यापारी
डोळे डॉक्टरकडून तपासले जातात.
ऑफिस : २९२, गिरगांव रोड, केळेवाडी, मुंबई ४.
ब्रँच : १६१, बुधवार पेठ, पुणें २.

नूतन वर्षाभिनंदन—
मामा काणे
यांचें
स्वच्छ उपाहार गृह
(स्थापना १९१०)
दादर, मुंबई २८








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट





लग्न होऊन सहा महिने झाले होते, आणि सुधाकर जोशीचा संसार अगदीं रंगांत आला होता. दिवस हिवाळ्याचे होते. महिना डिसेंबरचा होता. भर दुपारींसुद्धां घाम येत नव्हता. संध्याकाळीं कचेरींतून आल्यावर चहाच्या घोटाबरोबर एखाद्‌दुसऱ्या चुंबना-शिवाय भागत नव्हतें आणि रात्रीं पांघरुणाच्या उबेशिवाय झोप लागत नव्हती.

जीवन चाळीचें होतें. खोली एकच होती. पण माणसें दोन होतीं. नवरा आणि बायको—सुधाकर आणि सुहासिनी. स्वयंपाकासाठीं केलेल्या पड्द्याआड गेलें, किंवा थोडें दार ओढून घेतलें कीं वेळ भागवून नेण्याइतका खासगीपणा मिळत होता. अहेराच्या पैशांतूनच सुधाकरनें खोलींत नळ आणि रेडियो घेऊन टाकला होता. त्यामुळें बायको फारशी डोळ्याआड होत नव्हती. लग्नाच्या दुसऱ्याच दिवशीं सकाळीं सुधाकरनें क्रीमवाल्या छानदार बिस्किटां-बरोबर बायकोला बजावून ठेवलें होतें—“हें बघ, ही चाळ आहे. इथें खाजगी कांहीं राहत नाहीं. थोडीशी ओळख व्हायची खोटी, कीं माणसं जमायला सुरुवात होते. मग अड्डा जमतो. आणि मग लोकांना दाखवल्याशिवाय आपणाला कांहीं म्हणजे कांहीं करतां येत नाहीं.” इथें सुहासिनीनें सुहास्य वदनानें असें चमकून पाहिलें—सुधाकरनें बिस्किटांचा बोकणा तोंडांत ठेवून तिचें चुंबन घेतलें, आणि मग म्हणाला, “तेव्हां चाळींतल्या लोकांशीं फारसा संबंध आणूं नकोस. आपलं जेवढ्यास तेवढं. आपलं घर बरं कीं आपण बरं...घरांत रेडिओ आहे, खोलींत नळ घेतलाय. लग्नांत मिळालेलीं पुस्तकं आहेत. हवी तर लोकर आणून देतों. पुढंपाठीं जमेल तशी पेटीहि आणून देईन... शक्य तों लोकांकडे जायचं नाहीं आणि उगीच लोकं जमवायचीं नाहींत...अग, असं केलं तर हनीमूनसाठीं महाबळेश्वर नको, नि काश्मीर नको...इथेंच अपुलं महाबळेश्वर!...”




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


अनुक्रमणिका

*किलकिल्या डोळ्यांनीं ती जगाकडे पाहूं लागते तेव्हां डोळ्यांत एक चक्र फिरत असतें : ‘दिसतं तसं नसतं....दिसतं तसं नसतं........’ मनांतली पाल सारखी चुकचुकते........आणि तीच पाल तिला सुधाकराच्या डोळ्यांत दिसते.....जीभ बाहेर काढून लवलवतांना........*

---

सुधाकरनें आंखून दिलेल्या योजनेबरहुकूम सुहासिनी तंतोतंत वागली होती. हवें तेव्हां उठावें, वाटेल तेव्हां फिरायला जावें, नाटक-सिनेमे पाहावे, ऑम्लेट नि आइस्क्रीम खावें. हवें तें करावें, नि हवें तसें वागावें. मोजक्या माणसाशीं मोजका संबंध ठेवावा, नेमकें बोलवें, नेमकें हसावें. वाटलेंच तर सुधाकरच्या कचेरीच्या वेळांत खोलींत चारदोन माणसें घ्यावीं, किंवा घटकाभर दुसऱ्या खोलींत जाऊन बसावें. बस्स. बाकी सकाळ, संध्याकाळ, रात्र — दोघांचा संसार. असा हा चिमणा-चिमणीचा संसार मजेंत सुरू होऊन रंगांत आला होता. दर शनिवारीं सिनेमा नाहीं तर चौपाटी आणि रविवारीं गोडधोडाचें सुग्रास जेवण, चौपाटीची हवा, सिनेमांतला रंगीत काळोख, ऑम्लेटची खरपूस चव—आणि ओठांवर रंगणारा विडा. नाहीं म्हणायला सुहासिनी माहेरीं गेली. सुधाकरची चेंबूरची बहीण माहेरीं आली —किंवा सुधाकर पहिल्या मजल्यावरच्या आपट्यांकडे कॅरम खेळायला गेला कीं यांत थोडा व्यत्यय यायचा. पण हा एवढासा वियोग पानांतल्या कातासारखा कडू असूनहि बाकी मसाल्यांत असा विरघळायचा कीं त्यानेंच एक खुमासदार चव यायची!

रविवार म्हणजे तर दिवसाची रात्र आणि रात्रीचा दिवस. रविवारीं सकाळीं आठ वाजेपर्यंत सुहासिनीला अंथरुणाबाहेर पडण्याला मनाई होती. आणि त्या दिवशीं तिनें चहा करायचा नाहीं. चहा सुधाकर करायचा आणि तोंड न धुतांच बिछान्यांतच तिनें तो घ्यायचा. बेड-टी! सिनेमांतल्यासारखें! दुपारचें जेवण डोळ्यांवर चढायचें, रंगलेल्या ओठांनीं, मिटल्या धुंद पापण्यांनीं त्यानें तिच्याकडे पाहायचें, आणि मग सगळें जग बघतांबघतां दृष्टिआड व्हायचें.

सुधाकर बी. ए. पर्यंत शिकला होता. एका खाजगी कंपनींत तो मालकांचा खाजगी चिटणीस म्हणून नोकरीला होता. तो खूप खूप इंग्रजी पुस्तकें वाचायचा, आणि त्यांतल्या किती तरी गंमती सुहासिनीला सांगत राहायचा. खुबीदार, गोड गोड बोलायचा, आणि तें ऐकतां ऐकतां सुहासिनी हरखून जायची.

सुहासिनी मॅट्रिकला दोनदां बसली होती, आणि मग तिनें तो नाद सोडून दिला होता. ती आपली सुधाकरला छान छान जेवण करून वाढायची, मोकळ्या वेळांत गोडधोड पदार्थ करून संध्याकाळीं तयार ठेवायची. सगळीं मराठी मासिकें वाचायची. तो ऑफिसांत निघाला कीं दारांत उभी राहायची, आणि त्याच दारांत उभी राहून संध्याकाळीं वाट पाहायची. जातां येतां चुंबन द्यायची, त्याच्या मिठींत बसून त्याला हवा तितका वेळ त्याच्या डोळ्यांत पाहात राहायची. हवें तेव्हां हवें तें द्यायची, आणि त्याच्या सुखांत आपलें सुख पाहायची.

पण दोन माणसांचा असा गोड संसार देवाला फार वेळ पाहवत नाहीं, हेंच खरें! देवाच्या वक्र दृष्टीची कोपऱ्यांत दडून कलि वाट पाहत असतो. चोर पावलांनीं तो कुठून तो येतो, आणि त्यांतल्या स्त्रीला एकदर्पी गाठून तिचा स्त्रीधर्म तिला सुनवतो, तिचें स्त्रीत्व जागें करतो, आणि म्हणतो, "या जगांत दिसतं तसं कांहींच नसतं!"

कलि तिला ही नवी दृष्टि देऊन जातो आणि जाग येऊन किलकिल्या डोळ्यांनीं ती जेव्हां जगाकडे पाहूं लागते तेव्हां तिच्या डोक्यांत एकच घण बसत असतो—"दिसतं तसं नसतं—दिसतं तसं नसतं!"

एका रविवारीं दुपारीं अचानक सुहासिनीला ही नवी दृष्टि मिळाली. सुधाकरच्या उबदार मिठींत ती अगदीं सवंख हरपून बसली होती.

पुरुषोत्तम धाक्रस

इतक्यांत दारावर टक् टक् आवाज आला. सुधाकर ताडकन् उठून बसला. सुहासिनीचा पदर दूर सारून त्यानें विचारलें,

"कोण आहे?"

दारापलीकडून आवाज आला—

"मी—लिली!"

"लिली?—हं—काय ग लिली—"

असें म्हणत तो कॉटवरून उठला, पण सुहासिनीनें झटकन् त्याचा हात धरला. त्याला रोखून ती म्हणाली, "हें काय? तुम्हांला शुद्ध आहे का? जरा थांबा."

अशी ही खिसफिस करीत सुहासिनीनें चांगलें पातळ सावरून घेतलें, पटकन् उठून ती खुर्चीत बसली, तेव्हां सुधाकरनें दार उघडलें.

दारांत आपट्यांची लिली उभी होती. तिच्या चेहऱ्यावर दाबलेले विचित्र चोरटे भाव होते. सुहासिनीनें ते पाहिले, आणि तिला तिचा अस्सा राग आला—पण सुधाकरचें तिकडे लक्षच नव्हतें. त्यानें आपलें लिलीला सरळ—नेहमींच्या रिवाजानें विचारलें, "काय ग लिले?"

"बाबा नीं तुला बोलावलंय्."

"कशाला?"

"कशाला म्हणजे? खेळायला. आज रविवार ना!"

"पण वाजले किती?"

"साडेचार. बाबा म्हणाले, सुधाकर विसरला कीं काय पाहून ये."

रविवारीं आणि सुटीच्या दिवशीं दुपारीं तीन पासून सहा सात पर्यंत आपट्यांच्या खोलींत कॅरमचा अड्डा बसायचा. सुधाकरचें लग्न होण्यापूर्वींपासून हें चालत आलें होतें. रात्रीं रात्रीं सुद्धां खेळ चाले, पण सुधाकरचें लग्न झाल्यापासून आपट्यांनींच त्याला रात्रीं खेळायला यायची बंदी केली होती.

सुधाकर तंद्रीबाहेर आल्यासारखा म्हणाला, "अग रविवार तें खरं. पण आज आमचीं जेवणं उशिरां झालीं. उशिरां झोंपलों." आणि हळूच सुहासिनीकडे पाहून तो म्हणाला, "बरं तूं चल, सोंगट्या मांडा, मी आलों."

"सोंगट्या मांडलेल्या यत, लवकर या—" म्हणत लिली निघून गेली. पण सुहासिनीला वाटलें, ती तोंड लपवीत हसत गेली. ती म्हणाली, "हसायला काय झालं हिला?"

पण सुधाकरचें तिच्या बोलण्याकडे लक्षच नव्हतें. मोरींत जाऊन त्यानें तोंड धुतलें. केस

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# वॉटरबरीज़ कंपौण्ड

लाल लेबल




खोकला व सर्दी
इन्फ्ल्युएंझा
छातीचे विकार
दमा
यांवर अत्युत्कृष्ट

हें केवळ
एक औषध नाहीं
**तर खात्रीचें**
**शक्तिदायक**
**टॉनिक हि आहे!**

वॉटरबरीज़ कंपौण्ड हें एका दीर्घकालच्या अनुभवसिद्ध पाठानुसार तयार केलेलें खात्रीचें शक्तिदायक टॉनिक असून डॉक्टर त्याची नेहमीं अगत्यपूर्वक शिफारस करीत असतात.

**औषध म्हणून:** वॉटरबरीज़ कंपौण्डमध्यें क्रिओसोट व ग्वायकॉल हीं छातींतील कफ बाहेर पडण्यास साह्य करणारीं औषधें असून त्यांनीं छाती मोकळी होते...त्यामुळें वॉटरबरीज़ कंपौण्डनें खोकला व सर्दी त्वरित व परिणामकारक रीत्या नाहींशी होतात.

**शक्तिदायक टॉनिक म्हणून:** वॉटरबरीज़ कंपौण्ड शरीरांत रोगप्रतिबंधक शक्ति निर्माण करण्यास साह्य करतें व वारंवार उद्भवणाऱ्या रोगसंसर्गापासून त्याचा बचाव करतें. त्यानें भूक वाढते, पचनक्रिया सुधारते, जोमदार रक्त अंगांत भरतें व क्षारहानि भरून निघते.

WCRY-I MAR

वॉर्नर-लॅम्बर्ट फार्मास्युटिकल कंपनी (यु.एस्.ए. मध्यें संस्थापित, सदस्य जबाबदारी मर्यादित)







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

विंचरून झकास भांग काढला. आपला तुकतुकीत चेहरा त्यानें वरून-खालून आरशांत न्याहाळून पाहिला. मग चेहऱ्यावर पॉवडर मारली. पुरुषानें पॉवडर मारलेली सुहासिनीला मुळींच आवडत नसे. ती त्याला 'बायकी' म्हणून हिणवी, पण त्याचें त्याला कांहीं वाटत नसे. किती बोललें तरी तो आपलें तें सोडीत नसे.

चुरगळलेल्या धोतराच्या निऱ्या त्यानें चोपून घेतल्या, आणि अलगद त्याचा सोगा खांद्यावर टाकून तो म्हणाला,

"अच्छा, जाऊन येतों."

"कधीं ?"

"येतों एक दोन गेम मारून."

"चहा नको ?"

"अग, आतां उशीर झाला आहे. आणि तिथें होईल ना ?"

आणि तिच्या तोंडून झटकन् प्रश्न गेला, "कोण, लिली करील ?"

सुधाकरला कांहींच कळलें नाहीं. तो म्हणाला, "मग कोण करील त्यांच्याकडे दुसरं ? आई गेल्यावरं लिलीशिवाय दुसरं कोण आहे तिथें ?"

मग सुहासिनीनें खोचून विचारलें, "सहापर्यंत याल ना ?"

"बघूं या. दोन गेम तरी होणार. आज मुळांतच उशीर झालाय—"

"संध्याकाळीं जायचंय ना ?"

"हो ना. पण नाहींच जमलं तर रात्रीच्या शोला गेलं. इथं काय ?"

आणि धोतराचा घसरलेला सोगा वर करून तो गच्चींत फिरायला गेल्यासारखा निघूनसुद्धां गेला.

बाहेर चाळींतल्या मुलांचा गोंगाट नित्याप्रमाणें चालू होता. मध्येंच एखादा फेरीवाला 'भरणीऽऽऽए!'' चा पुकारा घसा फोडून तिसऱ्या मजल्याला भिडवीत होता. माणसें झोपा काढून गॅलरींत आळसावून वेळ घालवीत बसलीं होतीं. बायका—कुणी तांदूळ घेऊन बसल्या होत्या, कुणी केरवारा करीत होत्या—कुणी एखादी नवथर लतिका या खोलीपासून त्या खोलीपर्यंत वेणी घालीत गलथानपणें नाचत होती.

पण सुहासिनीच्या डोक्यांत यांतलें कांहींच शिरत नव्हतें. सुधाकर गेल्याबरोबर पुन्हा तिनें दार लावून घेतलें, आणि ती कॉटवर पडून राहिली. सुधाकर आणि लिली यांचाच वेध घेऊन तिचें विचारचक्र गरगरत सुटलें होतें.

—एकदां तिला वाटलें, असेंच उठून आपट्यांच्या खोलींत जावें. पण तिथें जाऊन तरी काय ? आपली दादहि न घेतां सुधाकर तसाच तिच्याशीं खेळत राहील, आणि लिली तर वडलांच्या देखत सुधाकरला भिडू म्हणून वाटेल तशी नाचवीत राहते. सुधाकर इतका चांगला खेळतो, पण समोर लिली असली कीं ती म्हणेल त्याच सोंगट्या घेत बसतो...तिला सोंगट्या घेतां येत नाहींत—पण तरी ती सुधाकरला शिकवीत असते आणि सुधाकर नंदीसारखा तिच्यापुढें मान डोलवीत बसतो. स्ट्रायकर उचलतांना नि सोंगट्या लावतांना कितीदां तिचीं बोटें त्याच्या बोटांना लागत असतात...पण दोघांना त्याची जाणीवहि होत नाहीं...नवराबायकोसारखा रोजचा स्पर्श—आणि खेळतांना दोघांची थट्टा काय चालते नि नेत्रपल्लवी काय होते—खेळाच्या नांवाखालीं वाटेल तें करावें...बोलणार कोण? लिलीचे वडील—ते तर लेकीला शब्दानें बोलत नाहींत ...तिचें लग्न जमत नाहीं म्हणून म्हणे ते तिला बोलत नाहींत—दुखवीत नाहींत...तिचें लग्न जमत नाहीं हा आपलाच गुन्हा असल्यासारखे ते तिला जपत असतात...सुधाकरच मागें एकदां सांगत होता.

—इतके दिवस सुहासिनीच्या तरी हें कुठें ध्यानांत आलें होतें ? आज चारपांच महिने ती हें पाहत होती, सुधाकरच्या तोंडून लिलीचें पुराण ऐकत होती. पण एकदांहि तिच्या हें ध्यानांत आलें नाहीं कीं, तीं दोघे आज अनेक वर्षें या एकाच चाळींत अशींच खेळत होतीं.

लिलीचें लग्न अजून जमत नाहीं, तेव्हां उद्यां तिला स्वतःच्या पायावर उभें राहतां यावें म्हणून ती यंदा ट्रेनिंग स्कूलला जात होती. तीन महिन्यांनीं परीक्षा, म्हणून हल्लीं रोज ती सुधाकरला शंका विचारायला येत होती. केव्हांहि पुस्तक घेऊन यायची, आणि सुधाकरला वाटेल तें विचारीत सुटायची. सुधाकर स्वतः ट्रेनिंग झाल्यावर म्युनिसिपालिटींत दोन वर्षें मास्तर होता. नंतर तो बी. ए. झाला, आणि त्यानें दुसरी चांगली नोकरी पकडली. पण त्याचा पूर्वीचा अनुभव होता ना ? म्हणूनच ती त्याच्याकडे यायची, नि तास-तास हें विचार तें विचार, करीत राहायची. शेवटीं अभ्यासावरून गप्पावर यायचें—नि यांतच वेळ निघून जायचा.

रात्रींची गोष्ट. जेवणें साडेनऊला आटपून सुहासिनी आरामखुर्चींत पडली तीच तिला झोप लागली. अकरा वाजतां जागी होऊन पाहते, तर सुधाकर खाटेवर लोळतोय, आणि लिली चक्क त्याच्या पायांना ढुंगण लावून मांडा ठोकून बसलेली. आणि अभ्यास कसला, तर सिनेमांतल्या गप्पा !

सुहासिनी जागी झाल्यावर लिली म्हणाली, "अय्या, वहिनी जाग्या झाल्या—आतां बसून चालायचं नाहीं. नाहीं तर वहिनी लाटणं घेऊन पाठीला लागतील !" आणि स्वतःच खोखो करून हसत सुटली. थट्टेच्या बुरख्याखालीं आपलें कांहींहि खपतें, आणि कांहींहि लपतें.

ती गेली, आणि सुहासिनी सुधाकरला म्हणाली, "वाजले किती ?"

"अकरा."

"काय चाललं होतं इतका वेळ ?"

"अग, अभ्यास असतो ना तिचा ?"

"शिकवणी आहे कीं काय ?"

"म्हणजे ?" सुधाकर आ करून बघूं लागला.

"रोज येते म्हणून विचारलं."

"अग, रोज येते म्हणजे पूर्वीपासून आपल्याशीं माझे तसे संबंध आहेत. मॅट्रिकच्या वर्षी


सतत पांच शो मुंबईत लागोपाठ हाऊसफुल्ल करून नविन विक्रम केलेली नाटिका व कार्यक्रम आतां लवकरच महाराष्ट्राच्या दौऱ्यावर येत आहे.

"अशोक नॅशनल थिएटर" सादर करते

"भुताटकिच्या घरांत एक रात्र" (नाटिका)

शिवाय : नृत्य, भांगडा, लावणी, दोन बायका व त्यांचा एक नवरा, चित्रकाराचें स्वप्न, जागतिक किर्तीचे नक्लाकार जॉनी व्हिस्की याच्या नकला.

कलावंत : सीमा, चित्रा, रत्नप्रभा, राजा गोसावी, रमेश देव व अशोक ताटे

संगीत : एन्. दत्ता. लेखक : दिनकर पाटील. दिग्दर्शक : दामू केंकरे.

आमच्या असंख्य चाहत्यांस ही दिपाळी सुखाची जावो

—अशोक ताटे





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

अनुक्रमणिका

बारावर राहण्याची पाळी होती, तर वर्षभर आपट्यांनीं मला जेवायला घातलं. त्यांच्याकडे कसली शिकवणी? आणि म्हटलं तर आपटे आत्तां देतील पैसे काढून!"

"मीं तसं कुठं म्हणतें?" सुहासिनी मध्येंच म्हणाली, "पैशांसाठीं नाहीं कांहीं—रोज येते म्हणून आपलं विचारलं."

"रोज म्हणजे—आतां तिची परीक्षा जवळ आली नां?"

सुहासिनीला काय बोलावें कळेना. एकदां तिला वाटलें, अभ्यासाला यायचें तर ही रात्रीचीच वेळा कां? आणि मग तिच्या अगदीं तोंडावर आलें होतें, शिकवणी करायची तर ती इथें कां? तिच्या घरींच जाऊन बसायचें... पण असें विचारलें तर सुधाकर म्हणेल, ही शिकवणी कुठाय?—आणि मग तिच्या मनांत आलें, इथें बसतात तेंच बरें. आपल्या देखत जर खेटून बसण्यापासून चाळे चालतात, तर सुधाकर तिथें रोज गेला तर काय, बघायलाच नको! लिलीचे वडील—ते लक्षसुद्धां देणार नाहींत. ते जातील झोपून—घरांत दुसरें माणूस नाहीं...रात्रीं काय हवे ते धंदे चालतील...

हे असे विचार मनांत आले, आणि सुहासिनीचें डोकें पुरें भरकटून गेलें. लिलीचें तारुण्य तिच्या डोळ्यांना खुपूं लागलें. तिचे दांत पुढें आहेत—पण हें व्यंग कुणाला? तिच्याशीं लग्न करायचें असेल त्याला. एरवीं आपली चालचलाऊ गंमत करायला त्यांचा अडथळा कशाला येतोय?—आणि दातांचें हें व्यंग सोडलें तर लिलीची अंगलट सुहासिनीपेक्षांसुद्धां छान होती. मागून पाहिली तर लिली सुंदरच दिसे. सगळे अवयव कसे रेखीव होते, —मागून पाहिलें तर कुणीहि पुरुष तिच्यावर भाळेल...तिचें हें रेखीव शरीर, तिची ती छानदार अंगलट—सुधाकरला काय हें दिसत नसेल? हें सगळें पाहून त्याच्या मनांत कांहींच येणार नाहीं?...असें कसें होईल? बोलून चालून जात पुरुषाची. मिळेल तितकें हवेंच असतें...

रात्रीं लिली गेल्यापासून असे अनंत विचारांचे डोंब उसळत होते, आणि सुहासिनीला कांहीं म्हटल्या कांहीं सुचत नव्हतें. आतां खेळायला म्हणून लिलीनें सुधाकरला बोलावून नेलें, हें तिला मुळींच आवडलें नाहीं. लिली आपल्या इथें सुधाकरसाठीं यावी, ही कल्पनाच तिला असह्य होत होती. आंतल्या आंत ती धुमसत राहिली होती.

चाळींतल्या गोखलीणबाई मध्येंच डोकावून गेल्या. खरशीकरांचा बबन तर धाडकन् दार उघडून आंतहि आला. पण झोपेचें सोंग घेऊन सुहासिनी पडूनच राहिली. रेडिओवरच्या गाण्यांसाठीं गोखल्यांची कुंदी दोनदां येऊन गेली. सुहासिनीचा कुंदीवर एवढा लोभ—पण तिलासुद्धां तिनें दाद दिली नाहीं. कुंदी बिचारी रेंगाळली, आणि निराशेनें दार ओढून निघून गेली.

सात वाजून गेल्यावर सुधाकर खोलींत आला. दार लोटलेलेंच होतें. खोलींत काळोख होता, आणि दिवा न लावतां सुहासिनी कॉटवर लोळत होती. सुधाकरची चाहूल लागतांच तिनें दाराकडे पाठ केली, आणि ती निपचित पडून राहिली.

सुधाकर एकदम पुढें गेला, आणि सुहासिनीच्या अंगावर रेलून म्हणाला, "सुहास, ए सुहा—"

"ऊं–ऊं" करीत तिनें फक्त कूस बदलली.

काळजीनें अधिकच ब्याडांत येऊन सुधाकरनें दोन्ही हातांत तिला पकडून विचारलें, "ए—ए राजा—ऐकलंस? मी आलोंय—पाहिलंस?"

"हूं."

"हूं काय? एवढा वेळ झोपून होतीस?"

"अं? हं."

"कां ग, बरं नाहीं वाटत?"

"अं—अं—अं—"

"म्हणजे काय?" त्यानें कपाळावर हात फिरवून विचारलें, "कपाळ का दुखतंय?"

"हं."

"कपाळ दुखतंय?"

"हं."

"अरेच्या! कपाळ दुखतंय हें सांगायचं तर 'हं–हं' काय?" मग लाडांत येऊन तो

## ही-साप नीति




एक लांडगा आपल्या हद्दींतून परक्याच्या हद्दीत पाण्याच्या निमित्ताने गेला. तिथे ओढ्याच्या काठीं एक कोवळें कोकरूं त्याला दिसतांच त्याने जिभल्या चाटण्यास सुरुवात केली. कोकरावर तो वस्कन् ओरडला; 'ए शेळपटा, माझ्या बाजूचं पाणी उष्टं करून वर मला शिव्या देतोस?" कोकरूं नम्रपणे उद्गारलें, "चाचा, मी हा बच्चा एवढं पाणी कसं उष्टावीन बरं? आणि शिव्या म्हणाल तर माझ्या अहिंसक व शाकाहारी मुखांतून रामधून सुद्धा अजून नीट उमटत नाही!" लांडगा लाल होऊन म्हणाला, "तूं नसशील तर तुझ्या बापाने किंवा काकामामानें दिल्याच असतील आणि कदाचित् तुझीं पोरेंहि देतील. हरामखोर!" असें म्हणून त्याने कोकरावर झडप घालून त्याला गिळंकृत केलें.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# कुटुम्बा करितां सर्वोत्तम भेंट

सणाचे दिवस म्हणजेच कुटुंबाकरितां भेंट खरीदी करण्याची योग्य वेळ. आणि नमुनेदार भेंट म्हणजे उषा शिवणयंत्रच होय—जे घरामधें कितीतरी उपयोगी पडते. हे डिझाइनमधें आधुनिक आहे आणि प्रत्येक उषा मॉडिल हें उच्च कोटी चें, शानदार आणि काम देण्यांत उत्तम असते. आतां शिवणकाम म्हणजे आणखी कितीतरी गंमत.

तुमच्या स्थानीय विक्रेत्याला आमच्या आकर्षक हप्तेबंदीच्या अटीबद्दल भेटा

चित्रांत दर्शविलेलो यंत्रे हँड, फूट व फोल्डिंग मॉडिल्स मधें मिळतात.









जय इंजीनियरिंग वर्क्स लिमिटेड, कलकत्ता-३१

शिवणकामा मधें आराम
—शिवणकामा करितां उषा

उषा

शिवण यंत्रे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

म्हणाला, "ए, ए सुहास—ए—राजा—"

"काय?"

"म्हणजे काय? तूं रागावल्येयस?"

पण या प्रश्नाला तिनें 'हं' सुद्धां केलें नाहीं. सुधाकर गयावया करुन म्हणाला, "अग असं काय करतेस? तुझी झोप गेली नाहीं का अजून?"

हें सगळें बोलतांना पुन्हा पुन्हा तो अंगचटीं येत होता. ती लाडांत यावी म्हणून धडपडत होता. असें लाडांत आल्यावर काय होतें हें तिला आतां पाठ होतें. नेहमीं तिला तें हवें असतें. खरें सांगायचें म्हणजे पुन्हा पुन्हा होणाऱ्या त्याच्या स्पर्शानें ह्या वेळींसुद्धां तिला तसेंच कांहीं तरी होऊं लागलें होतें. पण सुधाकरवरचा राग तिला आंतून सारखा डिवचीत होता. एकदम तिला लिलीची आठवण झाली, आणि तिला वाटलें, सुधाकरला सरळ सगळ विचारावें. त्याच्याकडे पाहतां पाहतां लिलीच्या आठवणीनें तिची चीड वाढूं लागली. आतां ती कांहीं तरी विचारणार, इतक्यांत सुधाकर म्हणाला,

"आणि हें काय, तूं चहासुद्धां नाहीं केलास?"

तिनें मानेनेंच नाहीं म्हटलें.

"कां?"

"कशाला करायचा? आपणच करायचा, नि आपणच प्यायचा!"

असें कधींच झालें नव्हतें. सकाळीं सुधाकर असतांना आणि संध्याकाळीं तो ऑफिसांतून आल्यावरच ती नेहमीं चहा करायची. रविवारीं दुपारचा चहा घेऊनच तो खेळायला जायचा. सहा महिन्यांत कधींच तिनें एकट्यानें चहा केला नव्हता. सुधाकर नसतांना ती कधीं चहा करून प्यायची नाहीं. सुधाकरच्या हें लक्षांत आलें, आणि आपण आज चहा न घेतल्यामुळें तिनें तो केला नाहीं, स्वतःहि घेतला नाहीं—ह्या जाणिवेनें त्याचा बायकोवेडा जीव खजील झाला!

तावडतोब त्यानें दिवा लावला. स्टोव्ह पेटवला. पातेलींत दोन कप पाणी ठेवून त्यांत साखर घातली, आणि आधण चुलीवर ठेवून तो तिला म्हणाला, "ऊठ आतां लवकर, आणि दोघांनीं मिळून फक्कडसा चहा घेऊं या. चल लवकर."

मग मात्र तिचा नाइलाज झाला. आपल्याशिवाय ती चहा प्यायलेली नाहीं ही गोष्ट त्याला लागली होती. आणि हें लक्षांत येतांक्षणींच आपल्या चुकीचें परिमार्जन तो करीत होता. अशा स्थितींत त्याच्यावर चिडायचें कसें हें तिला कळेना. तिनें तोंड धुतलें, टॉवेलनें स्वच्छ पुसून काढलें. केस सारखे केले, चेहऱ्यावर पॉवडरचा थर टाकला. आणि मानेपासून पॉवडर चोळीत चोळीत ती त्याच्या पुढ्यांत येऊन बसली.

भगभगलेल्या स्टोव्हच्या लालसर प्रकाशांत तिचा चेहरा असा लालबुंद झाला, कीं चहाच्या पुडीचा डबा हातांत तसाच ठेवून तो तिच्याकडे अधाशी नजरेनें पाहूं लागला.

इतक्यांत दारांत कुणाची तरी चाहूल लागली, तशी पटकन् तिनें चहाचा डबा त्याच्या हातांतून काढून घेतला.

सुधाकरनें दार उघडलें. दारांत लिलीचे वडील उभे होते.

"या तात्या."

"काय चाललंय?" दारांतच उभे राहून तात्या विचारूं लागले. "चहा? अरे या वेळीं चहा कसला पितां?"

सुधाकर कांहीं तरी बोलून जाईल म्हणून सुहासिनीच म्हणाली, "चहा ताजा नव्हे तो. मघांच यांचा करुन ठेवला होता, तो गरम करतें. हे खेळायला गेले होते ना तुमच्याकडे?"

"म्हणजे दुपारचा चहा व्हायचाच होता! चहा घेतल्याशिवायच हा वर आला होता!"

"हो ना."

"मग मघाशीं काय म्हणालास? लिली म्हणत होती तेव्हां, कीं आत्तांच घेऊन आलों म्हणून?"

सुहासिनीनें मध्येंच तोंड घातल्यामुळें सुधाकरची ती थाप त्याच्या अंगाशीं आली होती. ती चमकून त्याच्याकडे पाहूं लागली. तो तात्यांना म्हणाला, "तुमचा नुकताच झाला होता, म्हटलं, उगीच माझ्या एकट्यासाठीं पुन्हा कशाला?"

"वा वा वा! म्हणजे कमालच केलीस तूं. आपलं घर म्हणायचं नि असं करायचं. बरं झालं, लिलीनं तरं सुद्धां केला म्हणून!"

—अस्सं! म्हणजे लिलीनं तरीसुद्धां करून दिला काय?... सुहासिनीचा खालचा ओठ आपोआप दातांखालीं गेला.

आपल्यांतलाच थोडा थोडा कमी करून तात्यांना तिनें चहा दिला, आणि पाठ वळवून ती चहाबरोबर रागाचे घुटके घेऊं लागली.

मग तात्या म्हणाले, "बरं, लिलीनं विचारलंय, रात्रीं येऊं का नऊनंतर?"

सुधाकर म्हणाला, "अभ्यासाला ना? येऊं द्या कीं—"

"नाहीं म्हणजे, तिनं विचारलंय, कीं तुम्ही कुठें सिनेमाबिनेमाला जाणार नाहीं आहांत ना? जाणार असलांत तर मग आज येणार नाहीं ती."

सुधाकर घड्याळांत पाहून म्हणाला, "आतां आज सिनेमा बोंबलला. आठ वाजले. अजून आमचं जेवण व्हायचंय. आज सिनेमाचा बेत रद्द. आमचं काय, प्रत्येक रविवारीं सिनेमाला आम्ही जातोच असं नाहीं. एखाद्या दिवशीं नाहीं गेलों म्हणून कांहीं सिनेमा ओस


आकर्षक व शानदार
अशा
अनेकरंगी छपाईसाठीं
आमची अद्यावत यंत्रसामुग्री
तुमच्या सेवेला सज्ज आहे



* * *



ही दिवाळी आमच्या ग्राहकांस
व हितचिंतकांस आनंदाची जावो



आशा प्रिन्टरी
१३ वी खेतवाडी, मुंबई ४







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

पडत नाहीं!" आणि असें म्हणून तो स्वतःच हसत सुटला.

तात्याहि थोडे हसले आणि म्हणाले, "बरे तर जातों मी. तिला तसं सांगतों, जेवण करून ये म्हणून. बघ जरा तिचा अभ्यास, इतकं केल्यासारखी परीक्षा पदरांत पडली म्हणजे झालं. तेवढं एकदां झालं कीं माझी एक काळजी मिटली. उद्यां माझं कांहीं झालं तरी स्वतःच्या पायावर ती उभी राहील. मास्तरीण म्हणून लागली कीं तिला कधीं कुणाच्या तोंडाकडे पाहायला नको..."

तात्या गेले, नि सुहासिनीनें झटकन् तोंड फिरविलें. पण तरीसुद्धां तिनें राग गिळून टाकला. तिनें ठरवलें कीं रात्रीं लिली आली कीं, डोळे मिटून जागें राहायचें, अभ्यासाच्या वेळीं काय काय चालतें तें नीट पाहायचें... आणि मग रात्रीं सुधाकर जवळ आला कीं त्याला या सगळयाचा जाब विचारायचा. एकदां काय तो निकाल लावून टाकायचा.

असें ठरवून ती जेवणाला लागली. पण तो डंख पोटांत फार वेळ राहिला नाहीं. जेवतांना सुधाकर म्हणाला, "सव्वानऊ वाजून गेले. आत्तां ती येईल—"

"कोण?" घास थांबवून सुहासिनीनें विचारलें.

"लिली."

सुहासिनीनें घास घशाखालीं घातला, आणि ती गप्प बसली. सुधाकरचें लक्ष नसतांना त्याच्याकडे रोखल्यासारखी पाहत बसली. त्याच्या कपाळांतून, केसांतून आरपार पाहूं लागली.

जेवणावरून तिचें लक्ष उडालें. कपाटांत कांचेच्या आंत लावून ठेवलेल्या पुस्तकांतून, भिंतीवर टांगलेल्या दोघांच्या फोटोंतून, दांडीवरच्या कपड्यांवरून तिची नजर घारीसारखी वळवळत राहिली, आणि एकदम कॅलेंडरवरच्या बाईवर जाऊन बसली. आणि मग पटकन् तिनें मिस्किलपणें विचारलें, "हल्लीं बऱ्याच दिवसांत तुम्ही त्या बाईची विचारपूस केलेली नाहीं!"

"कुणाची?"

"ही—" कॅलेंडरकडे बोट दाखवून ती म्हणाली, "हीना कुमारी—तुमची प्रेयसी!"

मीना कुमारीचें तें चित्र सुधाकरला फार आवडायचें. इतकें कीं साहेबाच्या केबिनमधून त्यानें तें पळवून आणलें होतें. सुधाकर तिच्या त्या पोझवर खूप होता. त्या चित्राचा विषय आला कीं तो दहा-दहा मिनिटें त्यावर बोलत राहायचा. आडव्या-उभ्या कोनांतून त्यांतले बारकावे न्याहाळीत राहायचा. त्यानें त्या बाईवर इतका विचार केलेला तिला सहन होत नसे. आणि फोटोबरोबर तें कॅलेंडरहि तो न चुकतां ओल्या फडक्यानें पुसून काढायचा आणि त्याबद्दल तिनें नापसंती दाखवली कीं म्हणायचा, "तुम्ही बायका त्या बायकाच. तूं त्या चित्रांतल्या निर्जीव बाईचासुद्धां मत्सर करतेस—" आणि मग तिची टिंगल करायचा. म्हणूनच हल्लीं हल्लीं तीहि तें सगळें टिंगलीवर आणायची. मीनाकुमारीचें 'हीनाकुमारी' करायची. आणि त्याची बडबड आणि फडक्यानें पुसणें—यावरून तिनें 'विचारपूस' हा कोटिबाज शब्द तयार केला होता.

सुधाकर म्हणाला, "मीं हल्लीं तिची विचारपूस करायचं सोडून दिलं आहे. तूं तिला झाडू मारतेस ना?" आणि खोखो करीत तो हसत सुटला.

तशी ती म्हणाली, "चेष्टा राहूं द्या, पण खरंच तुम्हांला ती आवडते कीं नाहीं हो?"

"कोण?"

"मीनाकुमारी!"

"अर्थात्."

"बायकोपेक्षां सुद्धां?"

"बायकोपेक्षां!" त्यानें तिच्या डोळ्यांत खोल पाहून विचारलें. "बायकोपेक्षां म्हणजे काय?"

"तुमच्या बायकोपेक्षां ती सुंदर आहे कीं नाहीं?"

"अर्थात्. हें देवच बोलून चुकलाय."

मग तोच चेष्टेचा धागा पकडून तिनें विचारलें, "तिच्याशीं लग्न व्हायला हवं होतं, असं कधीं वाटतं कीं नाहीं?"

तो त्याच धाग्यांत आपला धागा गुंतवून म्हणाला, "आम्हांला ढीग वाटतं. पण उपयोग काय?"

पुन्हा त्याच आडव्या भाषेंत ती म्हणाली, "आपल्या बायकोपेक्षां सुंदर मुलगी दिसली कीं दर वेळीं असंच वाटतं ना?"

तो बेसावधपणें म्हणाला, "हा काय प्रश्न आहे, प्रत्येकालाच असं वाटत असणार. अधिक सुंदर मिळालं तर कुणाला नकोसं होईल?"

त्याबरोबर टपून बसल्यासारखा तिच्या तोंडून प्रश्न सुटला, "मग आपल्यांच्या लिलीशीं कां नाहीं केलंत लग्न?"

चमकून त्यानें तिच्याकडे पाहिलें. ती तशीच हंसत होती. आणि त्याला असें दिसून आलें कीं त्या हंसण्याला एक सूक्ष्म अशी कडवट किनार आहे. ती कडवट किनार त्याच्या डोळ्यासमोर गरगरूं लागली. तिचा तो प्रश्न सुरीसारखा खोल खोल जाऊन रुतला. किती तरी वेळ त्याला कांहीं बोलतांच येईना.

नजर न काढतां ती त्याच्या चेहऱ्यावर दृष्टि रोखून बसली होती. त्याच कडवट धारेनें मग ती म्हणाली, "सांगा ना?"

पाण्याचा घोट घेऊन तो सावध झाला. आणि त्यानें विचारलें, "मला तुझ्या प्रश्नाचा रोख कळला नाहीं."

## सनई

इंदिरा

दूर दूर धुक्यांतून
येते सनई मंजूळ
मावळल्या चंद्रम्याचा
एक किरण कोमळ!

दूर दूर धुक्यांतून
येते सनई मंजूळ
फुलां तुळशीचा गंध
वाहे गंधाचा ओघळ!

दूर दूर धुक्यांतून
येते सनई मंजूळ
गार मोगरीदंवाची
माळ गुंफिली सुढाळ!

दूर दूर धुक्यांतून
येते मंजूळ सनई
दुलईच्या उबेंतून
जाग येते-आहे-नाही

अशी जेव्हां येते जाग
माझा भाग्यकाल येतो
माझा अवघा दिवस
जाई-जुईंतून गातो.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"न कळण्यासारखं काय आहे त्यांत? लिलीशीं तुमचा इतक्या दिवसांचा संबंध—"

"संबंध?"

"म्हणजे परिचय—घरोबा!" ती जिभेवर घास ठेवीत म्हणाली, "तुम्हांला असं कधीं वाटलं नाहीं?"

"काय वाटायचं?"

"लग्न करावंसं."

"लिलीशीं?" कांहींच लक्षांत न आल्यासारखें त्यानें विचारलें. "तुला काय वेड लागलंय कीं काय!"

"वेड कसलं? काय वाईट आहे दिसायला ती? आतां तेवढे दांत सोडले तर खरोखरच ती छान दिसते.- पाटमोरी पाहिली तर कुणालाहि भुरळ पडेल."

"कशावरून काय विचारतेयस तूं आज हें!"

"कशावरून नाहीं." ती साळसूदपणें म्हणाली, "काल ती नवं पातळ नेसून गॅलरींत पाठमोरी उभी होती. इतकी छान—खरोखरच सुंदर दिसत होती."

"पण मला हें विचारण्यांत हेतु काय?"

"हेतु कांहीं नाहीं. तुमचा त्यांचा इतकीं वर्षे घरोबा. तुम्ही त्यांच्याकडे वर्षभर जेवतहि होतां. तुमच्या कधीं मनांत नाहीं आलं?"

तो एकदम चिडला. म्हणाला, "मूर्ख आहेस."

"हें कांहीं विचारल्या प्रश्नाचं उत्तर नव्हे."

जास्तच चिडून त्यानें विचारलें, "आज इतकं खोदून कां विचारतेयस तूं? तुला अशी शंका कां आली?"

"शंका कसली? तुमचा नि त्यांचा इतक्या दिवसांचा संबंध आहे म्हणतां—"

"कसला संबंध?"

"कसला म्हणजे आपला—तुमच्याशिवाय तिचं पान हलत नाहीं. हें विचार, तें विचार करीत इतकी ती घोटाळत असते तुमच्या भोंवतीं. आणि त्यांत कांहीं गैर आहे असं म्हणत नाहीं मी. सुंदर पुरुषाविषयीं एखाद्या मुलीला असं आकर्षण वाटणं गैर नाहीं—"

"तिनं असं सांगितलं तुला!" त्यानें ताठरून विचारलें.

"सांगायला कशाला हवं! अशा गोष्टी सांगत नाहीं कुणी. मला आपलं वाटतं, कीं तिची विचारीची फार निराशा झाली आहे—त्याशिवाय तुमचं लग्न झाल्यावरसुद्धां तुमच्या भोंवतीं इतकी घोटाळत राहणार नाहीं ती."

तो बोलायचा थांबला. त्याला बोलतांच येईना. तिनें तें ओळखलें. आणि तो असा कात्रींत सांपडलेला पाहिल्यावर ती चटकन् विचारून गेली, "आतां तुम्हीच सांगा, रात्रीं अकरा वाजतां एखाद्या परकी पुरुषाला कुणी मुलगी अशी खेटून बसेल का?"

आणि एकदम डोक्यांत प्रकाश पडल्यासारखा तो हसला. कांहीं क्षण तो तिच्याकडे तसाच पाहत राहिला. आणि मग तिच्या अंतराचा वेध घेत म्हणाला, "अस्सं. म्हणजे यासाठीं दिवसभर तूं अशी अस्वस्थ आहेस? असं असं. म्हणून तूं मघाशीं अशी फुरंगुटून बसली होतीस." आणि तो एकदम हंसायलाच लागला.

तो हंसायला लागल्याबरोबर तिचा नूर पालटला. तिचेंच कांहीं तरी चुकत असल्यासारखा तो हंसत होता. तसा इतका वेळ दाबून ठेवलेला तिचा संयम सुटला. ती फाडफाड बोलूं लागली, "हंसून घालवूं नका. या हसण्यानं मी फसणार नाहीं. असं चेष्टेवारी नेण्यासारखी ही साधी गोष्ट नाहीं. तुमचा स्वभाव मी चांगला ओळखतें. चूक अंगाशीं आली कीं असं थट्टेवर घालवायचं नि काखे वर करायचे. कुणाला दाखवतां हें!"


Whether it is a Residential Quarters or Industrial Establishment
Here it is - the Multi-purpose Product at the Right Price

"KOTAH STONE"

Invariably a first choice among Government Departments, Engineers, Architects and Contractors

*Available in Three Lovely Colours:*

BLUE (GREEN), BROWN AND CHOCOLATE

**Associated Stone Industries (Kotah) Limited**

*Quarries, Factory and Head Office*

**RAMGANJMANDI (Rajasthan)**

*Branches:*

Nanabhai Mansion, 5th Floor,
Phirozshah Mehta Road, Fort, BOMBAY-1
*Phone*: 26-1265
*Grams*: "KOTAHSTONE"

Bhajiwali Pole,
Buranpuri Bhagol, SURAT
*Phone*: 665
*Grams*: "KOTAHSTONE"

*For Acid and Alkali Proof Stone Flooring Insist on*

"KHEEMUCH STONE" *and* "MANDANA STONE"









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



जेथें पाहिजे सर्वोत्कृष्टच...

# संसारदक्ष मातांची पसंती – डालडा

गोड स्पर्धाच बक्षिसाची!... बक्षीस! – अर्थात् आईच्या प्रेमाचं, तिच्या हातच्या रुचकर पदार्थांचं! घरांतील लहानथोरांच्या उड्या पडणारे त्यांचे हे आवडते पदार्थ ती करीत असते डालडांतच!

डाल्डा सर्वोत्कृष्ट वनस्पति तेलांपासून बनविलेलं असून आरोग्यनियमांनुसार सीलबंद डब्यांतूनच विकलं जात असतं. यामुळें तें नेहमीं शुद्ध नी ताजं मिळतं. वाढत्या मुलांसाठीं पोषक जीवनसत्वंहि त्यांत घातलेलीं असतात. आपणहि घरां-तील मंडळीच्या आवडीचे पदार्थ डालडांतच करून त्यांचे धन्यवाद घ्या!




**डालडा वनस्पति-स्वयंपाकासाठीं एक खास शुद्ध स्निग्ध पदार्थ**

DL. 81-X52 MA

हिंदुस्तान लीव्हरचें उत्पादन




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

"हें बघ," तिच्या चढत्या आवाजानें दबून सुधाकर म्हणाला, "असं तोंडाला येईल तें बरळूं नकोस. तुला काय वाटलं, लिलीवर माझं प्रेम आहे ! लिली मला आवडते ?"

"तें मला ठाऊक नाहीं. हे असले घेर मला मुळींच खपणार नाहींत."

"खपणार नाहींत म्हणजे ?"

"खपणार नाहींत म्हणजे चालणार नाहींत !"

आणि ती गप्पच बसली. निमूटपणें जेवूं लागली. या बाबतींत आपणाला जास्त कांहीं बोलण्याची इच्छा नाहीं, हें तिनें त्या निमूटपणांतून उघड केलें.

सुधाकर गोंधळला. घास न घेतां तसाच ताटांत बोटें फिरवीत राहिला. यांत खरें म्हणजे त्याची कांहींच चूक नव्हती. लिलीचें लग्न जमत नव्हतें, आणि तिचें वाढतें वय तिला स्वस्थ बसूं देत नव्हतें. चाळींतले सगळेच तरुण मुलगे तिच्याकडे दुर्लक्ष करीत होते. सुधाकर हा एकच तिच्या वायां चाललेल्या तारुण्याला आधार होता. आपल्यांच्या उपकारांमुळें सुधाकरला लिलीची लगट झिडकारतां येत नव्हती. आणि तसा तो पुरुष होता. लिलीनें इतका लाळघोटेपणा केल्यावर त्याचें कांहीं चालत नव्हतें. लिलीचें लग्न जमेपर्यंतच काय तें हें चालायचें. पुढें कुठें येणार आहे ती ?—असा हा सुधाकरचा लिलीच्या संबंधांतला कांहींसा भिडस्त, कांहींसा दयाशील आणि कांहींसा 'सहज मिळतेंय तें कसं सोडायचं,' असा दृष्टिकोन होता. पण लिलीच्या फाजीलपणामुळें आज गोष्ट या थराला आली होती. आतां यांतून मार्ग कसा काढायचा ? सहा महिन्यांच्या सुखी संसाराचा लिलीमुळें बेरंग होण्याची पाळी आली.

तो जेवायचा थांबला, तशी तीहि थांबली. जेवण तसेंच अर्धवट टाकून उठली, आणि तोंड धुऊन तिनें सरळ खाट पकडली, तिला त्याच्याशीं जास्त बोलण्याची इच्छाच उरली नाहीं. सुधाकरहि उष्ट्या-खरकट्याकडे पाहत झटकन् उठला. आतां कोणत्याहि क्षणीं लिली अभ्यासाला येईल याची जाणीव होतांच तो पुरा गोंधळून गेला. त्यानें टॉवेलाला हात पुसले—आणि लिली आलीच !

झटकन् सुधाकर पुढें गेला. दारांतच त्यानें तिला अडवलें, आणि तो म्हणाला, "अग लिले, अग आज जमायचं नाहीं. हिला बरं नाहीं—"

तिथूनच आंत डोकावून लिली म्हणाली, "काय हो वहिनी, काय झालं एकाएकीं ? मघाशीं तर चांगल्या होत्या—"

आंत ती आंत येणार हें लक्षांत येतांच सुधाकर म्हणाला, "उठवूं नकोस—झोप लागल्येय तिला."

लिली घुटमळून नाइलाजानें परत गेली. ती गेली आणि डोळे उघडतांच सुहासिनीचें लक्ष बाहेर गेलें. मणेरीकरांच्या बिऱ्हाडांतलीं तीन चार जणें खिडकींतून सुधाकरकडे विचित्रपणें पाहत होतीं. पलीकडच्या बिऱ्हाडांतला दिवाडकरांचा श्रीपाद गॅलरींत येऊन मारक्या डोळ्यांनीं तेंच करीत होता.

सुधाकरनें दार लावून घेतलें, आणि सुन्न डोक्यानें तो दाराला पाठ टेकून तिथेंच उभा राहिला.

समोरच्या बिऱ्हाडांतल्या त्या नजरा सुईसारख्या सुहासिनीला टोचूं लागल्या. आजूबाजूच्या बिऱ्हाडांतून सुधाकरचें फारसें जाणें-येणें नव्हतें. चाळींतलीं बहुतेक माणसें त्याच्याशीं तुटकपणें वागतांना दिसत. पण आज तिला तें सगळें असह्य वाटूं लागलें. उलट सुलट अनेक विचार, अनेक आठवणी डासांसारख्या तिच्या डोळ्यांपुढें, कानांपुढें घुमूं लागल्या. आणि एकाएकीं सुधाकरचें पहिल्या रात्रींचें बोलणें तिला आठवलें—

"...चाळींतल्या लोकांशीं फारसा संबंध आणूं नकोस. आपलं जेवढ्यास तेवढं...आपलं घर बरं कीं आपण बरं...घरांत रेडिओ आहे, नळसुद्धां खोलींत घेतलाय...पुस्तकं आहेत...पेटीसुद्धां आणून देईन..."

घरांतल्या घरांत सगळ्या सोई करून देण्यांत सुधाकरनें आपल्यावरील प्रेमाचें केवढें प्रदर्शन केलें होतें ! पण आतां तिच्या मनांत येऊं लागलें, आजूबाजूच्या लोकांपासून आपणाला दूर ठेवण्याचाच तर या साऱ्यामागें त्याचा हेतु नसेल ? वरकरणीं बायको सारखी जवळ हवी, पण आंतून ती लोकांपासून दूर असावी... लोकांच्या संपर्कानें तिला स्वतःविषयीं कांहीं वाईटसाईट कळूं नये...

उघडें पडलेलें उष्टें-खरकटें आणि उरलेल्या अन्नाचा पसारा भगभगत्या दिव्याच्या पसाऱ्यांत डोळ्यांत भरत होता. तें लक्षांत आल्याबरोबर चटकन् जाऊन सुधाकरनें छोटा निळा बल्ब लावला, आणि मोठा दिवा घालवला.

मग कुशीवर झोपलेल्या सुहासिनीकडे त्यानें पाहिलें, आणि तो निश्चयपूर्वक तिच्याजवळ आला. तिच्या पाठीवर त्यानें हात ठेवला, आणि एकदम तिच्या तोंडून हुंदका बाहेर पडला. ती मुसमुसूं लागली.

तिच्या पाठीवरचा सुधाकरचा हात सैल पडला. तिला गप्प कसें करावें, तिची समजूत कशी घालावी हें त्याला सुचेना. शब्दांना उत्तर देतां येतें, पण अश्रूंपुढें शब्द गारद होतात. किती तरी वेळ तो पुतळ्यासारखा पाहत राहिला. मग प्रयत्नपूर्वक तो बोलला, "ए, ऐकलंस ?—हें बघ—"

पण तिनें पाहिलें नाहीं.

"असं काय करतेस ? रडतेस काय अशी ? हें बघ—मी सांगतों बघ—ऐक ना—"

पण ऐकून घ्यायला ती तयार नव्हती.

"कमालच केलीस तूं. एवढ्याशा गोष्टीवरून रडतेस काय—वेड्यासारखी ?"

पण ती रडायची थांबेना.

मग मात्र तो हवालदिल झाला. दातांत बोट चावीत भकास नजरेनें पडद्याबाहेर पाहूं लागला. आणि यांतून कांहींच उपाय नसल्यासारखा म्हणाला, "हें बघ, ऐकतेस ? तूं म्हणत असशील तर उद्यांपासून लिलीला मी शिकवीत नाहीं—"

"मी म्हणत असलें तर—" तिच्या तोंडून शब्द फुटले, "मी म्हणत असलें तर कशाला ! मी कांहीं म्हणत नाहीं. तुम्हांला कांहीं वाटत नाहीं ना ?"

"मला वाटत नाहीं ना म्हणजे काय ?" न रुचून त्यानें विचारलें. आणि मग पटकन आधाराला काडी सांपडल्यासारखा तो म्हणाला, "मी तरी काय करूं सांग. तूंच सांग, मी तिला बोलावतों का ? तीच सारखी नाचते—आणि खरं सांगूं, भिडस्तपणामुळं मला तिला कांहीं बोलतां येत नाहीं. आपल्यांकडे बघून गप्प बसावं लागतं. तिला तोडायचं म्हणजे त्यांना तोडण्यासारखं होईल तें. अगदीं खरं सांगूं, मला सुद्धां तिचं तें दात विचकणं आवडत नाहीं."

तिचे हुंदके थांबले होते आणि डोळ्याच्या कोपऱ्यांतून ती त्याच्याकडे पाहूं लागली होती. तें पाहून त्याला हुरूप आला. एकदोन क्षण त्यानें डोकें खाजवलें. मग तिच्या तोंडाजवळ तोंड नेऊन कमालीच्या हलक्या आवाजांत तो म्हणाला, "माझंच चुकतं. तिला स्पष्ट शब्दांत सांगितल्याशिवाय भागणार नाहीं. थांब, उद्यांच तिची गंमत करूं या."

तिनें डोळे मोठे करून त्याच्याकडे पाहिलें. लिलीची जिरवण्याच्या कटांत आपणालाहि तो सामील करून घेणार आहे, या त्याच्या सुरानें तिचें कुतूहल जागें झालें.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

तो म्हणाला, "उद्यांपासून तुझ्या मावशीची पेटी तूं इथें आणून टाकतेस! नाहीं तरी मावशीकडे ती पडूनच असते. तूं म्हटलंस तर मावशी कांहीं नको म्हणणार नाहीं."

"आणि! पेटी आणून काय करायचं!"

"आणि काय, वाजवायची."

"कोण शिकवणार?"

"मी शिकवीन."

"तुम्ही!" आणि नकळत तिला हसूं आलें.

"अग, येतं तेवढं शिकवीन. शिवाय पुस्तकं आणून देतों. दिवसां पाहिजे तर क्लास जॉइन कर. नाहीं तरी तुझी हौस आहेच ना? होऊन जाऊं दे. जमलं तर पुढंपाठी पेटी घेऊन देईन."

"नवी?"

"त्याला काय झालं? दोन-अडीचशेंचा प्रश्न. यंदाचा बोनस त्यांत घालवूं." आणि तिच्या पालटल्या नजरेंत खोल शिरून त्यानें विचारलें, "मग टरलं! उद्यां तूं पेटी घेऊन यायची. पुढचंमी पाहून घेतों. एका धोंड्यांत दोन पक्षी!"

एवढें सांगितल्यावर सुहासिनीचा राग थंड झाला. तिला वाटलें, खरोखरच एका धोंड्यांत दोन पक्षी. लिलीची व्याद दूर होईल, आणि आपली पेटीचीहि हौस होईल. किती तरी दिवस पेटी आणण्यासाठीं ती त्याच्या मागें लागलेलीच होती.

तिची खुषी त्यानें हेरली, आणि मग एवढा वेळ मिटलेलें असूनहि जें शरीर त्याला दूर झालें होतें तें सगळेंच्या सगळें कवेंत पकडून त्यानें तिचें मनसोक्त चुंबन घेतलें. आणि खिडकीच्या पडद्याच्या फटींतून बाहेर पाहत तो अधीर होऊन म्हणाला, "दिवा घालवूं?"

ती एकदम मागें झाली. या माणसाला काय म्हणावें, हेंच तिला कळेना. इतका प्रकार झाल्यानंतरहि हा माणूस क्षणांत सगळें पुसून निलंज्जपणें वर हसूं शकतो, इतक्या अधीरपणें आपल्या आसक्तीचें उघडें प्रदर्शन करीत सुटतो, हें पाहून कधीं नाहीं इतकी तिला त्याची उबग आली. त्याच्या अधाशी नजरेची तिला शिसारी आली. पदर सावरीत ती पटकन् वर उठली, आणि म्हणाली, "तुम्हांला कांहीं आहे कीं नाहीं? अजून उष्टं-खरकटं करायचं आहे. मांडीं घासायचीं आहेत—"

तिचा रुष्ट सूर लक्षांत येऊन तो किंचित् वरमला आणि तिला खूष करण्यासाठीं म्हणाला, "मी ठेवूं का मांडींकुंडीं अडवून?"

## भैरवी



••••••••••••

वि. स. खांडेकर

रे! पहा चंद्र हा गगनिं ढळे!
कशि चपलचरण मधु रजनि पळे! ॥ध्रु०॥

गा सख्या गा गोड भैरवी
द्रवतिल हृदयें करुण मधुर रवें
संपवि मैफल रसिक-गौरवीं
वघ शुक्र चांदणी मंद जळे ॥ १

गायिल्यास किति रागरागिणी
सूर गुंजती अजुनी कानीं
अवीट अनुपम जरी मोहिनी
रे तोड पाश, वरि नभ उजळे ॥ २

हिमकालांतिल पहाटवारें
भरे हुडहुडी, कांपति तारे
कंप तुझ्या परि सुरांत कां रे?
ती कला मरणिं जी सहज फुले ॥ ३

दे शेवटचा घांस गोड दे
जनमनवन हें नाचवि मोदें
विसरूनिया मग सकल कायदे
उधळील काळ शिरिं अमर फुलें ॥ ४.

"कांहीं नको."

तिनें पटकन् जाऊन मोठा दिवा लावला, आणि पातळ खोवून ती कामाला लागली. भराभर उष्टीं मांडीं तिनें मोरींत टाकलीं. लादी पुसून तिनें तुपामिठाच्या बरण्या दुधाच्या कपाटांत अडगवल्या. आणि पातळ अधिकच वर घेऊन ती मोरीच्या तळाखालीं मांडीं घासूं-विसळूं लागली.

वर गेलेल्या तिच्या पातळांतला परकर, आणि गोऱ्या पुष्ट पोटऱ्या त्याच्या डोळ्यांत भरूं लागल्या. अधाशी नजरेनें तिच्या अंगप्रत्यंगांत नजर खुपसून तो खुर्चीत बसून राहिला. जणुं कांहीं ती कुणी तरी परकी बाई होती. आतां तिला खूष करण्यासाठीं तो युक्ति शोधीत होता. मग एकदम त्याचें लक्ष रेडिओवर गेलें. पटकन् उठून त्यानें बटन फिरवलें, आणि दुसरें बटन सरकवीत सरकवीत त्यानें एक गाणें पकडलें. आवाज मोठा केला—

त्या गाण्याची तान दारांखिडक्यांतून बाहेर गेली, आणि धाडकन् दार उघडून शेजारच्या गोखल्यांची कुंदी आणि प्रकाश आंत आलीं. सुधाकरच्या राज्यांत मुलांना फारसा वाव नव्हता, पण सुहासिनीच्या लळ्यामुळें गोखल्यांचीं मुलें यायचीं. आणि त्यांतल्या गोखल्यांच्या कुंदीवर सुधाकरचाहि जीव होता.

गाण्याला कान देत कुंदी पुढें आली, आणि गुपचूप कॉटवर बसली. छोटा प्रकाश रेडिओ-खालींच बघत उभा राहिला.

—गोखल्यांची कुंदी परकरी—अकरा-बारा वर्षांची चिमुरडी गोड पोर. गोरी गोरी पान. काळेभोर गहिरे डोळे. एव्हांपासून ती अशी कांहीं सुंदर दिसायला लागली होती कीं थेरडा पुरुषहि विचलित व्हायचा. सुधाकरला ती फार आवडायची. ती खाटेवर बसलेली पाहिल्यावर तोहि खाटेवर जाऊन तिच्याशेजारीं बसला.

मग हळूहळू त्यानें तिचा गालगुच्चा घेतला तिला नाक उडवून दाखवलें, तिच्या डोक्यींत एक टप्पल मारली.

"थांबा हो—" म्हणून कुंदीनें त्याचा हात मागें लोटला. पण सुधाकरनें तोच हात पकडून घेतला—तांबुसगोरीं,नाजुक, लुसलुशीत बोटें... त्यानें तो तसाच धरून ठेवला. नेहमींप्रमाणें. कुंदीनें तो सोडवण्यासाठीं खूप धडपड केली, तसा सुधाकरनें कुरवाळीत कुरवाळीत हळूच दाबून तो जवळ ओढला—रोजच्यासारखा.

कुंदी "ईऽ ऽ—" करून ओरडली.

रोजचाच खेळ. पण आज कसें कोण जाणे, सुहासिनीचें अचानक तिकडे लक्ष गेलें. पुन्हा पुन्हा कुंदी हात मागें ओढीत होती, आणि सुधाकर तो सोडीत नव्हता.

किंचित् वाकून तिनें नीट पाहिलें. तिचें लक्ष सुधाकरच्या डोळ्यांत भरलें, आणि थट्टेच्या बुरख्याखालीं त्यानें डोळ्यांत दडवलेली घाणेरडी पाल लवलवतांना तिला दिसली. एकदम तिच्या तोंडून उद्गार आला—

"सोडा तिला!"

सुधाकरनें चमकून मागें पाहिलें. तरीहि त्याच्या चेहऱ्यावर उमटलेल्या फाटक्या हास्याकडे पाहून तिच्या हातांतलें राखाडीनें लडबडलेलें भांडें गळून पडलें.

मान खालीं घालून तिनें भिंतीचा आधार घेतला, आणि पाहतां पाहतां ती पुन्हा धुमसूं लागली.

• • •


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

# शून्यफुली चढाओढ

*मारा हो सत्वर ।*
*'फुली' ही सुंदर ।*
*वैभव मंदिर ।*
*उभाराया ॥*
*आतांपर्यंत आपण*
*अनेक चढाओढींत भाग*
*घेतला असेल; पण*
*महाराष्ट्राचे ख्यातनाम विनोदकार*
**श्री शामराव ओक** *निर्मित*
*या चढाओढींत भाग घेऊन*
*अर्थ आणि परमार्थ*
*दोन्हीं साधा........*

स जयति सिंदुरवदनो. . इत्यादि
वक्रतुण्ड महाकाय, वगैरे
जगतः पितरौ वन्दे पार्वतीपरमेश्वरौ । इति

श्री लक्ष्मीनारायणाय नमः, मारुतीला नमन, व गरुडाला, रामाला (व रावणालाहि, कारण तो मागसलेल्या अल्पसंख्यांकांचा पुढारी होता.) आम भारतीय जनतेस अभिवादन, महाराष्ट्रास तर विशेष, कारण आम्ही जें म्हणतों तें महाराष्ट्रासच कळेल. मराठी माणसांना आमचे दंडवत, त्यांतल्या त्यांत शेतकरीपुत्र नामदार चव्हाणांना, महाराष्ट्राचा मंगल कलश आणण्याबद्दल, आणि रणझुंझार आचार्य अत्र्यांना, संयुक्त महाराष्ट्रासाठीं मराठी मुलखांत रान उठवून जागृति केल्याबद्दल ! तसेंच नमन सगळ्या नव्याजुन्या, विविध पक्षांच्या, विविध मतांच्या पुढाऱ्यांना. नमन जनतेला, बहुजन समाजाला, कीं ज्यांच्या बेशक विश्वासावर आमच्यासारखे खाजगी साहसी योगक्षेम चालवूं शकतात.

आम्हाला मराठी जनतेस विदित करण्यांत आनंद होत आहे, कीं सर्वस्वीं लोकहितकारी, निकोप आणि सरकारमान्य, अशी एक नवी सांस्कृतिक कलाकृति आम्ही अंगिकारीत आहोंत. तिचें नांव " शून्यफुली चढाओढ."

मानवी ज्ञानाचे जितके म्हणून पैलू आहेत त्या सर्वांतून प्रतिबिंबित होणारीं सत्यदर्शनें आमच्या चढाओढीद्वारां समाजाला घडणार आहे आमच्या विधानांतून असणारे प्रश्न 'शून्य कीं फुली ?' या साध्या पर्यायानें सोडण्याजोगे जागतिक महत्त्वाचे प्रश्न असतील. उदाहरणार्थ,

परमाणुस्फोटक : मानवाला उपकारक, कीं मानवांतक ? या प्रश्नाच्या जागेवर शून्य किंवा फुली काढून उमेदवाराला आइनस्टाइन किंवा शॉ यांच्या इतकेंच विनतोड उत्तर देतां येतें. खरोखर या जगांतले बहुतेक प्रश्न शून्य किंवा फुलीनें निकालांत निघण्यासारखे नाहींत काय ? "युद्ध कीं बेसुमार लोकवस्ती ?" या प्रश्नाला शून्यानें किंवा फुलीनें उत्तर देणारे मतदाते हिटलर किंवा माओ यांच्यापेक्षां कुठल्याहि प्रकारें कमी असतील काय ?

शून्यफुली चढाओढ हें सोपें व सुटसुटीत नांव दीर्घ परिश्रमानंतर गहन संशोधन करून काढलेलें आहे. शून्य आणि फुली या प्रतीकांतून वेदान्त धर्म, नीतिशास्त्र, तत्त्वज्ञान, इतिहास, राजकारण, समाजधारणा, आरोग्य, शिक्षण, काव्य, नाटक, नृत्य, निरूपण, निवेदन, तमाशा, लोककला व भक्तिमार्ग या विषयांना कसें साह्य झालें आहे तें सविस्तरपणें आमच्या भव्य जहिरातीत छापून ज्ञानप्रसाराचा मार्ग तर आम्ही चोखाळणारच आहोंत, पण त्या जहिरातील कारण अशी जी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

शून्यफुली चढाओढ तिचा विसर मात्र ज्ञान-साधनेच्या भरांत कोणाला हं वो नये ही जनता जनार्दनास विनंति. शून्यफुली स्पर्धा जितकी अभिनव तितकीच सुबोध आहे. समान लांबी-रुंदीच्या चौकटींत समान अंतरावर दोन उभ्या व दोन आडव्या रेघा काढल्या कीं जो नऊ घरांचा पट तयार होतो, तोच या चढओढीचें पटांगण. ही चौकट दगडावर कोरल्याची उदाहरणे वेरूळच्या लेण्यापासून इराण-अरबस्तानच्या खांबांपर्यंत, मिसर देशापासून दक्षिण अमेरिकेपर्यंत, चीन व मलई बेटें, आस्ट्रेलिया, हिंदेसिया, व सीलोन या देशांतूनहि आढळतात. आपल्या देशांत नवग्रहांच्या आंगठीची जुळणी याच आकारांत असते ही लक्षांत घेण्यासारखी गोष्ट आहे. प्रागेतिहासकाळापासून मानवाचा हा खेळ नव्या शैक्षणिक स्वरूपांत सादर करण्यांत आम्हास अभिमान वाटतो.



नमुन्याच्या या चौकटीत आमचेतर्फे आम्हीं तीन जागीं शून्यें दिलीं आहेत त्यांच्यामधून सीधा मार्ग काढण्याची व डाव जिंकण्याची संधि तिसऱ्या आकृतींतील फुलांच्या ओळीनें विशद केली आहे. या फुलांची यशोमाला जिंकण्यासाटीं पण लावण्यांत आला आहे तो केवळ तीन सवालाचे जबाब देण्याचा. अचूक उत्तरें लिहिण्यासाटीं चौथ्या आकृतींत तीन आंकडे दिले आहेत, प्रिय उमेदवार हो, केवळ तीन प्रश्न, विधानत्रयी ! पण ती बरोबर पडली तर अपार बक्षिसाची शक्यता! सवाल याप्रमाणें आहेत:

१ 'चूप! आवाज करूं नको!' याअर्थी शब्द.

२ (आडवा)'दडून रहा' हा इशारा.
(उभा) सुराला लागते ती.

३ उपयुक्त पशु, पाळण्यास योग्य.

आणि फुल्यांच्या रांगेत येणाऱ्या शब्दांचा अर्थ "गोंगाट" असा यावा.

अशा सवालाचे जबाब देण्यासाटीं मनुष्य किती बहुश्रुत असावा लागतो तें सांगणें नलगे. प्रश्नांचीं उत्तरें हवीं तीं होऊं शकतील, पण ती योग्य रीतीनें एकमेकांत अडकून त्यांच्यामधून विजयी शब्द काढणें हें खरें कौशल्य आहे, आणि ही चढाओढ निपुणत्वाची कसोटी आहे, तिच्यांत उमेदवार म्हणून उतरल्यानें माणसाच्या ज्ञानाचीच नव्हे तर ईर्ष्येची, प्रयत्नशीलतेची, विचारशक्तीची परीक्षा होते, हें अधिकारी साहेबांस पटवूनच आम्हीं शून्यफुली चढाओढीचें अनुज्ञापत्र मिळविलें आहे. केवळ साहेबांचाच नव्हे तर आपल्या लोकप्रिय शासनाचाहि प्रेमळ आशीर्वाद आमच्या या उपक्रमाला आहे. नमुन्यादाखल वर दिलेल्या सवालांचे जबाब लिहून फुल्यांची यशस्वी ओळ कशी येते पुढील आकृतींत पहा.

| | ० | ग |
|---|---|---|
| ० | ल | प |
| गा | य | ० |

नमुना

अशा शून्यांनी रचलेल्या व्यूहाचा तीन फुलांच्या रांगेनें वेध करण्याचें आव्हान आम्ही आमच्या देशबांधवांस प्रेमानें देत आहोंत! सोबत क्रमांक एकच्या–शून्यफुली चढाओढीच्या कोऱ्या प्रवेशपत्रिका छापल्या आहेत, तरी 'या हो सन्डे भक्तजन, हें तो बुद्धीचें भोजन!' प्रत्येक चढ-ओढींत फक्त तीनच सवालाचे जबाब, प्रवेशपत्रिकेवर काळजीपूर्वक, खाडाखोड न करतां शाईनें भरून केवळ एक रुपया प्रवेश शुल्कासह शेवटच्या तारखेचे आंत पाठवा, आणि सहस्रांचे पारितोषिक मिळविण्याच्या संधींत भागीदार व्हा! उद्योगिनम् पुरुषसिंहमुपैति लक्ष्मी, तेव्हां लागा उद्योगाला! एका उमेदवारास हव्या तितक्या प्रवेशपत्रिका योग्य शुल्कासह पाठवतां येतील. घरांतील प्रत्येकाच्या नांवानें एकेक पाठवा. चार आंकड्यांची रकम आपल्या मराठी लोकांत दुर्मिळ असतें हें सर्वांस विदितच आहे आणि ती मिळवण्याचा मोका या चढाओढींत भाग घेणाऱ्या कोणासहि येऊं शकेल. रोखीच्या पावत्या सर्व लक्ष्यातून पानांच्या गाद्यांवर मिळतात. तेथेंच कोऱ्या प्रवेशपत्रिका व पाक्षिकें ही अल्पदरांत मिळतील.

आपण सगळेच साक्षर नाहीं, पण ही चढा-ओढ इतकी सोपी आहे कीं निरक्षरांसहि सवाल दुसऱ्याकडून ऐकून त्याचे जबाब लिहा-यला सांगतां येतील. दहा निरक्षरांच्या प्रवेशपत्रिका शुल्कासह पाठवणारास एक रुपयाची पावती मोफत मिळेल. त्या दहांतल्या एकाला या चढाओढीचे निमित्तानें साक्षर केल्यास आमचें खास अभिनंदन–पदक पाठविण्यांत येईल. पंच-वीस प्रवेशपत्रिका रुपयांसह पाठवणाऱ्या उमेद-वारास एक उत्कृष्ट कंगवा व एजंटास उंची अत्तरकुपी बहाल करण्यांत येईल. शंभर पत्रिका रोख रकमेसह पाठवणाराचा आमच्या कचेरींत प्रसिद्ध व्यक्तीच्या (एखाद्या प्रसंगीं उपमंत्र्याच्या देखील) अध्यक्षतेखालीं सत्कार करण्यांत येईल. एकरकमी पारितोषिक विजेत्याचा फोटो व परि-चय वर्तमानपत्रांत छापला जाईल; आणि जेव्हां आमच्या आगामी पांच आंकड्यांच्या इनामाचा एकरकमी विजेता निघेल, तेव्हां तर बक्षीस समारंभ स्टेडिअममध्यें ठेवून तो भारताच्या लाडक्या पंडित नेहरूंच्या, परमपूज्य राष्ट्रपतींच्या किंवा निदान उपराष्ट्रपति डॉ. झकीर हुसेन

## मीलनाचा दीपराग

अंबादास दिगंबर माडगूळकर

क्षितिजाच्या शिंपल्यांत
सांज-शिखराचा मोती.
भाला झेंपावत वेंचूं
मेघा कुणी हंसगती.
नदीकांठीं शेवरीचा
तुरा पिवळा पालवे
जुन्या कुण्या आठवाने
झालें वावर हिरवें.

..खांद्यावरून उतरे
माझी लोभली नजर.
वारा रिमझिम धावे
तिचा धरुनिया कर.
मनगौरा रानांतली
आकाशांत पिंगा घाली.
तिला चुंबूं पाहे, उंच
माझ्या शरीराची वेली.

..मीलनाचा दीपराग
मुक्यानेंच गातो वारा
सुनें उजळीत तम
पेटे एक एक तारा!




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

अनुक्रमणिका

यांच्या तरी हप्ते करण्याचा आमचा मानस आहे. कर्ताकरविता तो श्रीहरी आहे ! लाडू म्हणे आतां, व्हावी चढाओढ, शेवटही गोड, बक्षीसानें !

एकाहून जास्त उमेदवारांचें उत्तर अचूक आल्यास बक्षिसाची रक्कम अर्धी विजेत्यांस सम प्रमाणांत वाटली जाईल आणि अर्धी पुढील चढाओढीच्या बक्षिसांत मिळवली जाईल. एक-टाच विजेता निघाल्यास मात्र पुरी रक्कम आदा करण्यांत येईल. याप्रकारें उमेदवारांना चिका-टीचें उत्तेजन व फिरून यत्न करीत राहण्याचा परिणामीं फायदा दिसून येणार आहे. पाहूं कोण निघतो एकमेवाद्वितीयम् आणि होतो भव्य बक्षिसाचा धनी ! प्रवेशपत्रिका तपासून आमचा जो निर्णय होईल तो अखेरचा, त्यावर कुठलाहि पत्रव्यवहार किंवा वाद होणार. आपलें उत्तर खरें असूनही बक्षिस मिळालें नाहीं असा दावा अस-णारांना स्वतःच्या उत्तराची नोंदचिठी (छोट्या चौकटीतली) दाखवून प्रवेशपत्रिका शोधून काढण्य साठीं रु. दहा खर्च द्यावा लागेल. प्रवेश पत्रिका चूक किंवा खोडाखोड केलेली निघाल्यास आणखी दहा रुपये नुकसानभरपाई द्यावी लागेल. प्रवेशपत्रिका अचूक प्रश्न लवादाकडे नेऊन सोडण्याची व्यवस्था केली आहे. बक्षिसाचे कितीही वाटेकरी झाले तरी त्यांचे भाग तावडतोब चेकनें किंवा मनीऑर्डरनें अथवा तिकिट रूपानें पाठवले जातील. एका खेपेस अचूक उत्तर देऊन बक्षिसाचा अल्पच भाग तुमच्या वांट्याला आला तरी आगे बढो ! केव्हांना केव्हां तरी लक्ष्मी तुम्हांला एकट्याला निवडील. हिम्मते मर्दा मदते खुदा !

अनक्यानें बक्षिसाच्या रकमेनें शिक्षण पुरें केलें. तमक्यानें शेत घेतलें, फलाण्यानें बाय-कोला सोनें दिलें. ढिकण्यानें आपल्या शाळेला देणगी दिली, सर्जेरावांनीं एंजिन घेतलें, शितो-ळ्यांनी गाडी घेतली, लाडांनीं दुकान घातलें तर खोतांनीं खोंड घेतला, अशा बातम्या, फोटो, मुलाखती आपण नित्य पाहतां. त्याच मालिकेंत एक दिवस आपलेंहि नांव चमकूं नये काय ! 'केशवराव खैऱ्यांनीं खडा घेतला !' 'दलपत-भाईंनीं बॉंड घेतला' 'चंगाबाईंनीं (लाजून) नांव घेतलें, ज्यांनीं त्यांच्यासाठीं ज्यांच्या नावें प्रवेश पत्रिका भरून पाठवली होती त्यांचें, अशा प्रकारची आपल्याबद्दलहि गोड बातमी वृत्तपत्रां-तून येऊं शकणार नाहीं काय ? का नाहीं ? 'प्रयत्न पुरुषें सोडो नये.' 'एका कोळियानें ? हें बालवयांतलें प्रयत्नशील प्रतीक विसरलांत काय ? तर 'उतिष्ठत, जाग्रत प्राप्यवरान्य बोधत' म्हणजे, उठा, जागे व्हा आणि वर मिळत आहे तोंच स्वीकारा ! जय हिंद !

आमच्या शून्यफुली स्पर्धेचा शैक्षणिक व समाजसेवाशील कायक्रम काय आहे तो सांगि-तल्यावर तर आपण गोरक्षणाच्या देणगीच्याहि अगोदर प्रवेशपत्रिकेचें शुल्क भराल. कारण ऐका, शून्यफुलीचढाओढीतर्फे आज मुंबईत पुढील लोक-कार्यें होत आहेत, अशी समाजसेवा घडत आहे, याप्रमाणें विद्याप्रसाराचें कार्य चाललें आहे :—

शंभर मराठी शाळांतील प्रत्येक वर्गातल्या पहिल्या येणाऱ्या मुलास शून्यफुली फूटपट्टी देण्यांत येईल, दश हायस्कुलांतील प्रथम श्रेणीच्या विद्यार्थ्यास शून्यफुली शंभर पानी वही बक्षीस मिळेल. कॉलेजांतील उत्तम विद्यार्थी–विद्यार्थि-नींना प्लास्टिकची उत्तमपैकीं शून्यफुली हातपाकिटें उत्तेजनार्थ मिळतील. त्याशिवाय गांवांतील प्रत्येक देवळापुढें सव्वा रुपयाची खडीसाखर क्रमाक्रमानें वाटण्यांत येईल. कामगार विमा योजनेच्या दवा-खान्यांतून तापखोकला पडसें अजीर्णादि सामान्य विकारांवरील औषधें मोफत वाटण्याची योजना तयार होत आहे. शून्यफुली अंकलिपीपासून तो शून्यफुली 'लीलावती'पर्यंत गणितविषयक पुस्तकांचे संच संकलित आहेत. साहित्यसम्मे-लनाचा दरवर्षी निवडून येणाऱ्या अध्यक्षांस शून्यफुली मानचिन्ह देण्याचेंहि घाटत आहे.

तेव्हां मित्र हो, या महान् कार्यांत सहभागी व्हा ! दुसऱ्या गोष्टीचा विचार सोडा आणि या चढाओढीवर लक्ष केंद्रित करा. आपलें उत्पन्न वाढवण्यासाठीं तुम्ही मुख्य उद्योगाखेरीज इतर धंदे पहात असाल, रिकामेळ कमाई करूं पाहात असाल, कांहीं शिकत असाल, किंवा शिकवण्या करीत असाल तर तें सारें व्यर्थ आहे. नया पैशांच्या ठिकऱ्यांनीं सोन्याचे ढीग उभे होत नाहींत, भाग्याचें आव्हान स्वीकारून चढा-ओढीच्या मैदानांत उतरावें लागतें ! चढाओढ हेंच यशाचें इंगित आहे. चढाओढीच्या मार्गानें अमेरिका व रशिया कोठें पोहोचले आहेत तें पहा, बाकी साऱ्या खटपटी झुगारून द्या आणि शून्यफुली चढाओढीची कास धरा. लक्ष्मी तुम्हांला बोलावीत आहे, तुमच्या पुरु-षार्थाची परीक्षा आहे, तरी त्वरा करा नी प्रवेशपत्रिका रकमेसह पाठवा, भरपूर पाठवा, एक दिवस तुमचा भाग्योदय आहे ! लक्षांत ठेवा, कूट स्पर्धा एकच, शून्यफुली चढाओढ !

चढाओढ मारी जिवा लावि गोडी
फुली शून्य भेदोनि व्यूहास तोडी
महाबक्षिसें जिंकिण्यातें अनेक
पहा भाग्यलक्ष्मी तुम्हां देत हांक !
जय मुंबे ! जयमहाराष्ट्र ! जयभारत !

• • •

चार आठवड्यांत
चारपट शुभ्र
–गोरापान चेहरा !
स्पॉक




ADLAY
SP23

व्हायटनींग ॲन्ड ब्लिचिंग क्रिम

चार आठवड्यांच्या आंत आपल्या त्वचेचा गोरेपणा वाढवून तिला यौवनसुलभ मोहकता प्राप्त करून देणारें हें क्रीम आतां भारतात सर्वत्र मिळूं लागलें आहे.

स्पॉक व्हायटनींग क्रीम वापरतांच त्वचेवरील मालिन्य, डाग आणि काळ्या छटा नाहींशा होऊन त्वचेंत पडणारा फरक–गोरेपणा बरोबरच तिला प्राप्त होणारी तजेलदार मृदुता आणि सौंदर्य–पाहून आपण आश्चर्यचकीत व्हाल.

Spak COSMETICS Made in India by: JASKAR CORPORATION Bombay 7



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका







शेजारणीपेक्षां आपले कपडे चांगले असावे असेंच प्रत्येक गृहिणीला वाटतें. सफेद कपडे अधिक पांढरेशुभ्र कसे होतील असा प्रश्न तिच्यापुढें उभा राहिला कीं तिला प्रथम आठवण होते टिनोपाल्ची. कारण टिनोपालनेंच फक्त सफेद कपडे चमकदार पांढरेशुभ्र होतात हें तिला ठाऊक असतें !

**टिनोपाल वापरण्यास खर्चेहि अगदीं कमी येतो !**

सर्व-साधारण कुटुंबातील एका दिवसाचे धुतलेले कपडे पांढरेशुभ्र करण्यासाठीं फक्त पाव चमचा टिनोपाल पुरेसें असतें ! कपडे एकदां कां टिनोपाल मिश्रणांतून बुचकळून काढले कीं ३-४ धुण्यांपर्यंत बघायला नको.

**लक्षांत ठेवा—**

थोड्याशा
**टिनोपाल** नें
सफेद कपडे सर्वांत अत्यंत
शुभ्र बनतात



टिनोपाल हा जे. आर. गायगी एस. ए. बाल, स्वित्झर्लंड यांचा रजिस्टर्ड ट्रेड मार्क आहे.

तयार करणार :
सुहृद गायगी लिमिटेड, वडी वाडी, वडोदा

सोल डिस्ट्रिब्युटर्स :
सुहृद गायगी ट्रेडिंग लिमिटेड, पो.ऑ.बॉक्स. नं. ९६५ मुंबई-१ बि.आर.

MAR SISTA'6-30-171 A









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



*हृदय वाफेसारखं असतं नाहीं? ज्यानं तें बघावं*
*असं वाटतं त्याला दिसत नाहीं. सारी शक्ति*
*पणाला लावली पण त्या शक्तीचीच धास्ती! हें*
*झिरपणं चालायचं तरी कुठवर? त्याला धर नाहीं,*
*बंधन नाहीं, हें असं कां याचं उत्तर नाहीं....*



वा म न  चो र घ डे

**मा**णसाला दोनच मनें असतात अशी परवापरवापर्यंत माझी खात्री होती. नंतर वाचलें कीं, दोन नाहीं, चार असतात. तेव्हांपासून असा कहीं हबकलों कीं आपल्याला चांगलीं सात आठ मनें आहेत असें वाटायला लागलें.

इतकीं मनें काय करायचीं? तीं नकोत मला. पण नको म्हणून कसें चालेल! पोटीं आलेलें अष्टावक्र मूल आपली मालकी जन्मभर बजावतेंच ना!

तीन दिवसांपूर्वी सायंकाळीं ठीक सहा वाजतां माझ्या शरीरांतील कुठल्यातरी स्थळीं माझ्या या साऱ्या मनांनी एक परिषद भरविली. चर्चेचा विषय मी होतों. मला ऐकायचें नव्हतें, ऐकवतहि नव्हतें. पण घरचा गोंधळ बाहेर कसा काढणार? घरांत राहणाऱ्या भाडेकरूप्रमाणें त्यांनीं वर्दळीवर येऊं नये इतपतच मी आपला त्यांच्याशीं जेमतेम वागतों, तरी देखील त्यांची चर्चा मला धरूनच चालू. कोणी म्हणत होतें—"मी हें असं करायला नको होतं" दुसरें ठासून म्हणालें—"झालें तें फार छान झालें; आपली कटकट गेली; अशीच जिरायला हवी." तिसऱ्या एकानें आणखी फाटा फोडला—"घे, घे म्हणावं! मोठा आव आणत होता लेकाचा! पितळ तें पितळ अन् भाव घेतो सोन्याचा!"

येवढ्यावरच थांबलें नाहीं. मागच्या बाजूनें दोनतीन आवाज आले—"असेल, पितळ असेल; सोनें नसेलहि; पण लोखंडाच्या बाजारांत पितळहि मोलानं खपतं म्हटलं!"

त्यांनीं म्हटलं पण मला ऐकवेना, माझ्या पंचायती यांना कशाला! पण म्हणतात ना, स्वतः गप राहिलें तर इतरांना फावतें! तरी बरें, जें काय घडलें त्याबद्दल एक चकार शब्द मी कुणाशीं बोललों नाहीं. प्रकृति



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका





कीं हें सरस्वतीचें निजस्थान । कीं हें नाना कळांचें जीवन ।
नाना शब्दांचें भूषण । यथार्थ होय ॥

## विवेचक ग्रंथ

| | |
|---|---|
| १. घराला मुकलेल्या स्त्रिया व काळाची चाहूल | —सौ. मालतीबाई बेडेकर |
| २. संस्कृत नाट्यसौंदर्य | —डॉ. के. ना. वाटवे |
| ३. अभिषेक | —वि. स. खांडेकर |
| ४. छांदसी | —पु. शि. रेगे |
| ५. प्रकाशरेखा | —ग. त्र्यं. माडखोलकर |
| ६. समचिकित्साशास्त्र | —डॉ. एल्. डी. ढवळे |

## कादंबरी

| | |
|---|---|
| ७. स्वामी | —रणजित देसाई |
| ८. एका कोळियानें | —पु. ल. देशपांडे |
| ९. वृंदावन | —वि. स. खांडेकर |
| १०. उर्मिला | —ग. त्र्यं. माडखोलकर |
| ११. सावित्री | —पु. शि. रेगे |
| १२. शबरी | —विभावरी शिरूरकर |

## कथा

| | |
|---|---|
| १३. सोवत | —मधु मंगेश कर्णिक |
| १४. जाण | —रणजित देसाई |
| १५. व्यक्ति आणि वल्ली | —पु. ल. देशपांडे |
| १६. उजेडाचीं झाडें | —अनंत काणेकर |
| १७. सोनपिसें | |

# देशमुख आणि कंपनी

७३९, बुधवार पेठ, पुणे—२

दे. नं. २०३१








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



अनुक्रमणिका

आतां...
आल्हादक
नव




सुगंधयुक्त
नवा रेक्सोना

बहारदार नवा सुगंध—रेक्सोना वापरून आतां त्याचा आनंद लुटा! रेक्सोनांतील दुर्मिळ सौंदर्यवर्धक तेलांच्या मिश्रणामुळें आपली कांति दिवसेंदिवस अधिकाधिक सुंदर होत जाते.



कॅडिलयुक्त
नवा रेक्सोना
—आपल्या त्वचेला हितावह आहे

रेक्सोना गीत ऐका— सलिल चौधरी यांनीं संगीतसाज चढविलेलें आणि गीता दत्त यांनीं गायिलेलें रेक्सोना गीत आपल्या आवडत्या चित्रपटगृहांत अवश्य ऐका!

हिंदुस्तान लीव्हर लिमिटेड यांनीं भारतांत तयार केलेला.

RP. 10-X52 MA










अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

सुधारेल या श्रद्धेने तें कडू औषध निमूट पिऊन टाकलें. तरीहि हा बोभाटा, ही चर्चा!

इलाज नव्हता, कडीकोयंडा बंद केलें. एक झोका तेवढा हवेसाठीं उघडा ठेवला. त्या झरोक्यांतून न दिसणारी हवाच बघूं लागलों. जें दिसत नाहीं तें बघण्याचा छंद हा देखील परिपदेच्या चर्चेचा विषय होऊं शकतो. भीति वाटली; खिडकींतून एक झाड दिसत होतें तेंच बघूं लागलों. उगाच बोल नको!

साधें बकुळीचें झाड! वारा आला कीं, आपलीं पानें, कोंवळ्या डहाळ्या हलवीत, झुकवीत होतें. त्यातली एकच डहाळी इतरांच्या बाहेर येऊन उगीच फडफड करीत होती—वारा असला तरीहि, नसला तरीहि!

हें असें एकटें दुकटें कक्षेबाहेर कांही तरी घडतें अन् त्रास देतें!

त्या दिवशीं दुपारच्या भरउन्हांत सरोजाच्या घरीं गेलों. तिची बदली या गांवीं झाल्यानंतर चारदोन वेळां रस्त्यांत गांठ पडली होती. त्या उभयतांना मीं मजकडे बोलावलें होतें. त्यांना यायला जमलें नाहीं; मीहि त्यानंतर गेलों नव्हतों.

अवेळीं जाऊं नये हें कळत होतें पण महत्त्वाचें काम होतें, इलाज नव्हता. प्रशस्त बंगला. मोठ्या अधिकाऱ्याची पत्नी. गडीमाणसें, मोटार-गाडी, हवें तसें राहण्याची ऐपत; खाण्यालेण्याची वाण नाहीं. कुणी आला तर त्याची दखल घेतली पाहिजे अशी गरज नाहीं.

तिच्याकडे जायला मला तसा संकोच नव्हता. दोन वर्षें एकत्र शिकलों होतों, कित्येक वेळां एकत्र हिंडलों होतों, एकमेकांची सोबत केली होती. अहोजाहोच्या पलीकडे संबंध गेले होते. तिला एकेरी नावानें हांक मारण्यांत सुख वाटत होतें. सुखांत तसा कांही खोल अर्थ नव्हता. तथापि...

बुक कव्हर्स्
इलस्ट्रेशन्स्
मॅगेझीन कव्हर्स्
ॲडव्हरटायझींग-
-लेआऊटस्
कॅलेंडर डिझाइन्स्
फार्मास्युटीकल-
-डिझाईन्स्
तसेंच सर्वतऱ्हेचीं
कमर्शियल डिझाइन्स्
स्टुडिओ
आर्ट कॉर्नर
२२, खटाव बिल्डींग, गिरगांव, मुंबई ४.
प्रोप्रायटर
दिनकर कृष्णाजी देसाई

सोनचाफ्याच्या फुलानें हात लवूं दिला; सतारीनें तार छेडूं दिली, शुक्राच्या चांदणीनें डोळे भरून स्वतःकडे बघूं दिलें तर? पावसाचा एखाद-दुसरा टपोरा थेंब उघड्या अंगावर शिरशिरी...!

दिवाणखान्याचें दार अर्धवट उघडेंच होतें. टिचकी वाजविली. चाहूल नाहीं. भरदुपारीं दार उघडें ठेवायचें म्हणजे एखादा कुत्रा असला पाहिजे. आजूबाजूला चहाळ घेतला, दार उघडलें.

समोरच्याच टेबलावर सरोजा बसल्याबसल्याच झोपली होती. दोन्ही हातांच्या वर्तुळांत टेबलावर मान विसावली होती. खुर्चीवरची बैठक वळली होती. जागेपणीं जें दिसावें तें दिसत होतें—मोकळे केंस पाठीवर रुळत असलेले, पदर सरकलेला, पोटावर सुखाची सुरकुती, पाठीवर पोलक्याची कांटपट्टी! रूप जागें असतें तेव्हां तें चांगलें दिसतें; झोपलें असतें तेव्हां अधिक चांगलें दिसतें, कारण तें बघतां येतें.

थांबावें कीं परत जावें? चारदोन क्षणच पण तेवढ्यांत काय काय नि कसें वाटून गेलें...!

सरोजा! आतां ती पार दूर गेली होती. ती जाऊं नये असा मीं कधीं प्रयत्न केला नव्हता. गेली तेव्हां निरोपहि दिला होता. तरी ती गेल्याची रुखरुख कोणत्या तरी मनानें पकडून ठेवली होती आणि त्यानें तिला सोडून द्यावें म्हणून दोवेचौवें त्याचा पाठीं लागलें होतें. सरोजला जाऊं नको म्हटलें असतें तर गेलीहि नसती कदाचित्! पण गेली असती तर? सायसाखर हवी अन् तीहि आयती समोर आणून ठेवलेली! मानवेतर सृष्टींत याला काय म्हणतात ठाऊक नाहीं; माणसाच्या सृष्टींत याला गाढवपणा म्हणतात! गाढव ओरडलें तर तें म्हणे कर्कश ओरडतें!

ती निघून गेली तेव्हां तिला निमूट निरोप दिला. त्यालाहि एक कारण झालें होतें, पुसकें, वेलदोडा खाऊन पडसें व्हावें तसें! एकदां तिची एक वही मीं घरीं आणली होती. वहीच्या आंतल्या कव्हर पट्टीवर चारदोन वाक्यें पेन्सिलीनें लिहिलीं होतीं..."नुसती आठवण-तरी हृदय कसें उडून जातें. हलकी फुंकर घातली तरी पाण्यावर वलय उठतें. मनाला धीर तरी किती द्यायचा? सारी शक्ति पणाला लावली पण त्या शक्तीचीच असमर्थता! हें झिरपणं चालायचं तरी कुठवर? त्याला घर नाहीं बंध नाही, हें असं कां याचं उत्तर नाही..." "हृदय बर्फासारखं असतं नाहीं? ज्यानं तें बघावं असं वाटतं त्याला दिसत नाहीं. पेल्यांत बर्फ घातला की बाहेर थेंबाच्या रूपांत...पण बर्फ?...!"

या वर्षांना, ही आठवण–तिचा आपल्याशीं कांहीं संबंध नाहीं एवढें मला पक्कें माहीत होतें, दार बंद होतें म्हणून हंसत निरोप दिला होता. सरोजा पार दूर निघून गेली. मी तिथला तिथेंच राहिलों!

आणि आज तीन वर्षांनंतर...!

तिला जाग आली नाहीं. मी बाहेर आलों. दार ओढून घ्यावें म्हणून फळी ओढली, आवाज झाला. सरोजा जागी झाली.

"कोण तूं? कधीं आलास? हांक कां नाहीं दिलीस? बैस ना!"

"जरा अवेळीं आलों, यावं लागलं; क्षमा नाहीं मागत पण..."

"अवेळीं आलास म्हणूनच बरं वाटलं."

"असं म्हणावंच लागतं."

"म्हणून नाहीं म्हणत. खरंच सांगतें, फक्त..."

"काय?"

"अवेळीं कोणी येणार नाहीं या निराशेनंच डोळा लागला होता. वेळच्या वेळीं सगळं करून कंटाळलें आहे रे मी!"

"थोडंसं काम होतं..."

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"मग नमता आला तर बरं झालं असतं, काम नसतां कोणी येऊंच नये असा कुठं कायदा आहे काय ?"

"या पूर्वींच मीं यायला हवं होतं."

"मग आतां आलास तो कामाशिवाय असं म्हण की झालं. काम-बिम राहूं दे बाजूला."

"तसं नाहीं..."

"तसंच. कामच तेवढं खरं अन् बाकी सगळं खोटं असंच तुलाहि वाटूं लागलं कां रे ?"

"आतां बोलणंच खुंटलं."

"फार छान झालं. बैस आतां स्वस्थ अन् मी विचारतें त्याचीं उत्तरं दे."

"पुस्तक न उघडतां परीक्षेला बसूं म्हणतेस ?"

"बसून तरी बघ ! सगळ्यानींच अभ्यास केला तर परीक्षाच कशाला घ्यायची ? असंच झालं आहे. सरळ असेल त्याला उलटं म्हणायचं अन् लोकांना दिसेल तें सरळ म्हणायचं. शिवण असलेल्या बाजूनं पोलकं अंगांत घालायचं अन् वर दिसेल तो भाग सुलटा ! जाऊं दे. चहा घेशील ?"

"चहाची वेळ नाही ही."

"म्हणून तर आग्रह करतें. सगळं वेळच्या वेळीं करण्यांतच अर्थ असतो काय ? सगळं ठरवूनच करायचं ?"

"परीक्षेतला पहिला प्रश्न वाटतं हा ?"

"हा नव्हे. मी विचारतें, समजा सगळीं घड्याळं बंद पडलीं तर काय होईल रे ?"

"हें कसं शक्य आहे ?"

"नापास ! सूर्य काय उगवायचा राहून जाईल ? वारा आपलं वाहणं सोडून देईल ? समुद्राच्या लाटा जिथल्या तिथं थबकून राहतील ? पृथ्वीचा गंध नाहींसा होईल ? ढगांतलं पाणी आटून जाईल काय ? धरतीवर पाऊस पडणं बंद होईल काय ? विजेचा कडकडाट, ती लखलख काय बंद होईल ?"

"त्या बिचाऱ्या घड्याळांचा यांत कांहीं संबंध नाहीं. असलाच तर जन्य-जनक संबंध. कुणाच्या तरी उगवण्यांतून, त्या लाटांतून, त्यांच्या उफाळांतून त्या घड्याळाचा जन्म झाला..!"

"वेडं मूल जन्माला यावं तसा ! धड जगत नाहीं अन् जगूंहि देत नाहीं. मरतमरत जगायचं. जन्मभर त्याची लाळ पुसा अन् शहाणं करण्याचा आटापिटा करीत लाज लपवा."

"पण तुझ्या घड्याळांवर येवढा राग कां ? तें बिचारं निर्जिव यंत्र. चारदोन लोखंडाचे तुकडे एकाशीं एक टिकटिक करीत राहतात. वाटलं तर ऐकावं, वाटलं तर फेकून द्यावं."

"खरं आहे तुझं म्हणणं. पण फेकून देतां येत नाहीं. परई म्हणून झाड वाढवावं अन् त्याला नुसतीं फुलं यावीं. तर म्हणून तें नुसतं बाजूला सारतां येत नाहीं. तें तोडून, उपटून टाकावं लागतं. एक सांगतें तुला. स्त्री हवं तें करूं शकतें पण ती इतकी अगतिक असते कीं तिला तोडतां येत नाहीं. गेलीं तीन वर्षं पाणी घातलं आहे, जपलं जोपासलं आहे...!"

"इतक्या वर्षांनीं तुला भेटतोंय मी. बागेतली हिरवळ तुडविणारी, अभ्यासाचा तास बुडवून पावसाच्या सरी अंगावर घेणारी सरोजा राहिली नाहींस तूं !"

"अजूनहि अंगावर घ्याव्याशा वाटतात पण तास नाहीं बुडवितां येत. ज्या क्षणीं बुडविण्याची शक्ति येईल त्या क्षणीं...! पण कुठून तरी टण् असा ठोका पडतो अन् निमूट आंत जावं लागतं !"


# प्रकाशनाच्या यशाचीं तीन गमकें



**राजमान्यता :** मराठी पुस्तकांना जीं पारितोषिकें दिलीं जातात त्यांत सर्वांत अधिक पॉप्युलर प्रकाशनेंच आहेत. गेलीं पांच वर्षें सतत ह्या बाबतींत पॉप्युलर प्रकाशन आघाडी-वर आहे. किंबहुना आमच्या पहिल्या ४० पुस्तकांपैकीं २६ पुस्तकांना हा मान मिळाला. शिवाय 'भारतीय साहित्यशास्त्र' ह्या ग्रंथास साहित्य अकादेमीनें गौरविलेलें आहे.



**लोकप्रियता :** पुस्तकें छापावयाचीं तीं विक्री-साठीं. तेव्हां प्रकाशनसंस्थेचें खरें यशापयश खपावरच अवलंबून असतें. पॉप्युलर प्रकाशनां-पैकीं जवळ जवळ २५ टक्के पुस्तकांची आवृत्ति संपून बहुतेकांची दुसरी आणि कांहींची तिसरी आवृत्ति निघाली आहे. पॉप्युलर प्रकाशनें नाहींत असे वाचनालय (सार्वजनिक अथवा खाजगी) महाराष्ट्रांत विरळाच.



**विद्वन्मान्यता :** १९५२ च्या विजयादशमीस कबुतरें (गंगाधर गाडगीळ) आणि कमळण (अरविंद गोखले) ह्या दोन लघुकथासंग्रहानीं पॉप्युलर प्रकाशनास सुरुवात झाली. त्यावेळीं जवळ जवळ प्रत्येक मराठी नियतकालिकांत पुस्तकांतील मजकूर, छपाई, मुखपृष्ठ इत्यादि-विषयीं स्तुतीपर परीक्षणें आलीं. तेव्हांपासून आतांपावेतों आमच्या सर्वच पुस्तकांचे टीका-कारांनीं आणि परीक्षणकारांनीं कौतुक केलें आहे. शिवाय आतांपर्यंत दहाबारा पुस्तकांचा तरी वेगवेगळ्या अभ्यासक्रमांत समावेश झाला आहे.

ह्या दहा वर्षांच्या कालांत ज्या सर्व लेखक, चित्रकार, मुद्रक-पुस्तकविक्रेते इत्यादि व्याव-सायिक, विद्वान टीकाकार, प्राध्यापक, रसिक वाचक, ग्रंथपाल आणि सरकार आणि असंख्य हितचिंतक यांचें आम्हांला साहाय्य झालें त्या सर्वांचें आम्ही शतशः आभारी आहोत.

**पॉप्युलर प्रकाशन**
ताडदेव, मुंबई ३४







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"सुख अति झालं म्हणजे तें असं वहायला लागतं."

"हवं तर ऐकूं नकोस पण उपदेश नको करूं. ज्याला चाबतं तें भोरडतं...! अन् सतत टणूटण् टोके देणारीं हीं घड्याळं! पहाटे पांचला जागं व्हायचं, उठून चहा करून द्यायचा; काठी, कोट, जोडा—सगळी फिरायला जायची तयारी करून द्यायची! मग सात वाजतात, तेव्हा न्याहारी करायची; आठ वाजेपर्यंत बोलायचं, हास्य-विनोद करायचा, ऐकायचा; जरा जास्त झाला तर घड्याळ टणकतं! मग दहा वाजतात तेव्हां जेवणें, जेवतांना मासिकांतल्या गोष्टींची मूलभूत चर्चा करणें. मग अकरा वाजतात. गाडी पंचमध्यें आली की हंसत निरोप देणें, 'लवकर यायचं, उशीर करायचा नाहीं.' असं म्हणणें... ...त्या शब्दांना अर्थ नसतो, वेळापत्रक कधींच चुकत नसतं. नंतर वाजतात पांच. तेव्हां तीन मैलांची रपेट करायची तयारी करून देणें; आपल्याला जायचं नसलं तर कमीपणा घेऊन लाचार होणें, 'वारे सह-चारिणी' हा विनोद ऐकून हंसणें...सगळं वेळापत्रक बिनचूक. यांत मुलाचं रडणं, अवेळीं त्याला भूक लागणें...त्याला वाव नाहीं म्हणून मूलहि होत नाहीं. देशकार्य आपोआप हातून घडतं...! मग दहाचा ठोका पडतो, आवाज येतो 'ये'! अकरा वाजले कीं परवानगी मिळते—'जा'! उपदेश मिळतो—'माणसानं कांहीं वाचावं, ज्ञानाची अखंड उपासना करावी!...''

"सरोजा, मला यांतलं कांहीं कळत नाहीं. पण..."

"कळल असतं तर असं मध्येंच अडवलं नसतं. किति दिवसांनीं हें असलं वेढ्ळट तोंडाबाहेर आलं...कुडीबाहेर येण्याचा थोडा प्रयत्न केला. ढग भरून आले, पावसाचा शिंतोडा एकटेपणाचा धिक्कार करूं लागला अन् असं वाटलं की तो कोट असाच, एकाच पावसांत...पण छे!.."

सरोजाला मध्येंच अडविण्यांत अर्थ नव्हता. उठून जायची इच्छा नव्हती. थांबायचा धीर नव्हता. शेवटीं पांचचा टोका पडला अन् सरोजा जागी झाली.

तिथून निघालों तों काय नि किति बोचर घेतलें त्याला अंत नाहीं. कसलीं तरी कुंपणें बोचत होतीं; दगडावर फणा आपटल्यागत आवाज कानीं सळसळत होता. पांखरूं आपली चोंच पिंजऱ्याच्या तारेवर दुखावून घेत असल्याचें जाणवत होतें!

कांही तरी केलें पाहिजे; आपल्यानें जें होईल तें, जसें होईल तसें, जेवढें होईल तेवढें. स्नेहाचेंहि एक ऋण असतें. तें बोंचतें. आपण तिला निरोप दिला होता. झोडपणाऱ्या पावसांत अनिर्बंध स्वच्छंद पुरविणाऱ्या सरोजाला कधीं तरी थोडी साथ दिली होती; विस्मयानें बघत कां होईना पण जवळ होतों. अंधारांत घराबाहेर पडलेल्याला कुठलीहि कां असेना एखादी दिवटी पाऊल उचलायला आधार देते.

कांहीं तरी केलें पाहिजे. फणा आपटायचा दगड दूर करणें शक्य नव्हतें; कर्तव्यहि नव्हतें. पिंजरा माझा नव्हता. त्याच्याजवळ जाण्याचा मला परवानाहि नव्हता. पण जरा वेळ कां होईना, आपल्या विश्वासावर पांखराला बाहेर काढून परत पिंजऱ्यांत पोंचविणें शक्य होतें. तेवढाच विरंगुळा, तेवढीच मोकळी हवा!

उत्तम विचार. सगळ्या धर्मग्रंथांनीं त्याला मान्यता दिली आहे. संसारांत न पडणारे ऋषिमुनीदेखील संसाराबद्दल असेंच सांगून गेले आहेत. मानवता कीं काय म्हणतात ती हीच!

पांखरूं थोडा वेळ बाहेर काढायचें; मोकळी हवा त्याला द्यायची; परत आश्वासन देतदेत त्याला हळुवारपणें पिंजऱ्यांत ठेवायचें!

आणि तें आपल्यालाच आवडायला लागलें तर? छे! शक्यच नाहीं!

आणखी अशीच एक दुपार. चार तास तरी सरोजाच्या घड्याळांत ठोका पडणार नव्हता. तिला बाहेर नेलें. दूर आडवस्तींत, जिथें बसलें तर कपडे मळतील अशा ठिकाणीं बसवून तिला खाऊं घातलं. हाताची थाळी, बोटाचा चमचा; हात पुसले झाडपाल्यानें. सरोजा हरखली, हसूं लागली, गाऊं लागली. पायाला चाकें लावून तळ्याकाठीं धावली!

पायरीवरून पाण्यांत पाय सोडून ती पाण्यांत कुरवाळूं लागली. तळ्याच्या पल्याड बाजूला म्हशी डुंबत होत्या. दुसऱ्या बाजूला बाया बापड्या हातांनीं धुणीं आणि तोंडाने शब्द बडवीत होत्या. तंगड्या उघड्या. कांहीं बोरीच्या, कांही बाभळीच्या! तिसऱ्या बाजूला थोराड पोरटीं येत, खंब ठोकत अन् कपडे फेकून पाण्यांत उडी मारीत; चुळा भरभरून एकमेकांच्या अंगावर फेकीत!

या देखाव्यांत ताल नव्हता, नवें नव्हतें, बघण्याजोगें कांहीं नव्हतें. पण सरोजाची नजर हलत नव्हती. भुकेला जीव भाकरीची चळथ बघत होता.

"चलायचं.. निघूं या आतां."

"कुठं! तें बघ तिकडे. इथं अंग झाकायच्या, उघडं व्हायच्या वेळा ठरलेल्या नाहींत...!"

"निघूं या. हवं तर उद्यां परत येऊं."

"थांब. छळूं नकोस असा."

"रागावलीस?"

"नाहीं रे! असं कां म्हणालास?"

"तें सांगतां यायचं नाहीं. कुणावर तरी खूप जीव लावून बसलों म्हणजे हें असं कळायला लागतं, न सांगतांहि ओळखतां येतं."

"असं? पुन्हां सांग! तुला बोलायचं झालं तर असंच कांहींतरी बोलत जा. माझी शपथ तुला."

"शपथ घालून नाहीं बोलतां येत, सरोजा!"

"खरं आहे; चुकलं, खरंच चुकलं माझं. शपथेनं असं नाहीं बोलतां येत. संवय, संवय बरं ही! याच संवयीला उबगलें आहें मी. सगळं हुकमानं, इच्छेनं झालं पाहिजे, व्यत्यय नको, प्रत्यवाय नको...म्हणूनच हें असं डोकं आपटावंसं वाटतं...ढग आले तरी दुपार तीच, ऊन सणसणलं तरी तीच, बर्फाचं शीड फाडून वारा चावायला आला तरी दुपार तीच."

कडक उन्हाळ्याकरितां ४२ वर्षें लोकप्रिय असलेलें बर्फतुल्य सुवासिक
"केल्व्हिन्स" लेमन्क्रीम
वापरल्यानें केसांना उत्तम प्रकारें वळण लागून,
काम करण्यात उत्साह वाटतो.
केल्व्हिन केमिकल कंपनी, मुंबई २.

ते शब्द—"असाच बोल, माझी शपथ तुला."—या शब्दांची न्याहारी करायला बसलों तेव्हां ऋषीमुनींना नैवेद्य दाखवायची देखील शुद्ध राहिली नाहीं. म्हणूनच शरीराच्या कुठल्या तरी भागांत भरलेली ती मनांची परिषद ठरावामागून ठराव चर्चेला घेत आहे.

आणि माझी 'न्याहारी' झाल्यानंतरची सरोजा! ती हंसते तेव्हां मोती सांडतात; वाऱ्यावर थुरथुरणाऱ्या तिच्या केसांच्या रेशमी लडी कुरवाळाव्याशा वाटतात; समोर बसली तर अधिक जवळ बसावी असें वाटतें. सुंदर दिसते. पाठमोरी तर अधिकच सुंदर दिसते. मोगरीला बहर आला आहे. खमंग वासानें जिभेला पाणी सुटलें आहे. कुठला नैवेद्य? आपल्या मोजक्या घासांतला घांस काढून द्यायचा!

अशा अनेक दुपारी उलटल्यानंतर! एक दिवस सरोजाला घरीं नेलें. ती आली, हंसत, गात! आली तीहि बरोबर धुंद गंध घेऊन!

"इतकं टापटिपीचं घर मला नाहीं आवडत. मला काय वाटतं सांगूं! असं वाटतं...तीं तळ्यांत डुंबणारीं पोरं आहेत ना? त्यांना जवळ बोलवावं, रागवावं त्यांच्यावर खोटंखोटं. समोर उभं करावं त्यांना—उघडीं वाघडीं, थंडीनं कुडकुडत असलेलीं, ओलं अंग निथळतें आहे—त्यांच्यावर रागावत हंसून घ्यावं; त्यांची भीति घालवावी; सगळ्यांना जवळ घ्यावं; त्यांचीं अंग पुसून पदर ओला करावा; खाऊं पिऊं घालावं; हंसली तृप्त झालीं की सांगावं—'जा परत त्या तळ्यांत, उड्या टाका अन् चुळा भरभरून'..."

ती मध्येंच थांबली. तिला वाटत होतें तें तिनें अर्धवट शब्दांत पूर्ण सांगून टाकलें. मला वाटत होतें तें सांगायची वेळ आली होती. माझ्याजवळ शब्द तेवढे पूर्ण होते, बाकी सगळें अर्धवट!

हीच वेळ होती. पुन्हां ती आली नसती; अशा स्वच्छंद, खळखळत्या रूपांत ती आली नसती.

सरोजानें टेबलासमोर उभें राहून एक रेकॉर्ड लावली. अवेळ होती म्हणून आवर्जून चहा करायला लावला. कोपऱ्यांत तंबोरा होता, त्याची गवसणी काढून अलगद मांडीवर ठेवला. हलूंच तार छेडली.

झनझनझाट! सजीवांतून निर्जीवांत छेडला गेला. ओठ विलग झाले तिचे; डोळे चितळूं लागले तिचे!

हीच ती वेळ; ही पुनः नाही यायची!

"बोल रे, परवाप्रमाणें काहीं तरी बेछूट बोल."

सरोजाचा हात माझ्या खांद्यावर होता; स्पर्शांत थरथर होती.

"बोलत कां नाहींस? घड्याळांत ठोका पडायच्या आंत काहीं तरी बोल."

हीच ती वेळ; ही पुनः नाहीं यायची! म्हणून वेळेचें भान विसरलों.

"सरोजा, चल, ये."

क्षणभर ती मजकडे बघत राहिली. अचल, अविचल, ओठ मिटलेले डोळ्यांचा वितळ थांबलेला!

"चल सरोजा, ये"

"कुठे?"

"आंत!"

अखेर वेळ आली! सरोजा उठली पण तिने दार गांठलें. निमिषार्ध—!

"अग, बाहेर नाही..."

"बाहेरच! मीं तुला शपथ घातली ती या बोलाची नव्हती. हे—हे बोल माझ्या ओळखीचे आहेत. त्यांतला अर्थ...या शब्दाच्या आंतलं जग— तें मला नवं नाहीं, तें नित्याचं, परिचित आहे, त्याचा काळ, त्याची वेळ, यमनियम, सोय सोपस्कार, सोहळा, सगळं ठरीव आहे; तें कधीं चुकत नाहीं, त्याची जाण विसरून विसरतां येत नाही. त्या 'ये' नंतर त्याच जगांतून दुसरा शब्द उमटतो...त्याच्या धास्तीनंच बाहेर पडते! निवालें मी! संभाजग्या माझ्या! जें बोलत होतास तें हवं होतं तसं बोल म्हणून शपथ दिली होती तुला! हें असं बोलूं नकोस म्हणून पुनः शपथ घालतें...!

सरोज गेली! वारा आला, लाट उसळली, वीज सळसळली आणि सरोज निघून गेली, एकटीच! ● ● ●

'उंदरांची सभा' हीं-साच नीति



एकदां एक मांजर फार सोकावलें. उंदरांना त्याचा त्रास सहन होईना. तेव्हा उंदरांनीं तातडीची सभा बोलावून मांजराविरुद्ध उपाययोजना करण्याचा विचार केला. अनेक सूचना आल्या पण पटल्या नाहीत. शेवटीं एक उंदीर शहाणपणाच्या डौलांत म्हणाला, "एकच उपाय आहे. मांजराच्या गळ्यांत आपण त्रासवाढ विरोधी घंटा बांधूं या. मांजर आलें की घंटा वाजेल आणि आपल्याला वेळींच पळतां येईल."

त्यावर एक खरा शहाणा उंदीर म्हणाला, "सूचना चांगली आहे. पण मांजराच्या गळ्यांत घंटा कोण बांधणार पवढा एकच सवाल आहे?" असें म्हणून तो खालीं बसला न बसला तोंच मांजराने झडप घालून शहाण्या आणि मूर्ख अशा दोन्ही उंदरांना गट्ट केलें.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

धडल् बंडाचार्यानें मळकट सुरळीसारखा रुमाल डोक्याभोवतीं गुंडाळला, मानेवर काळसर झालेला बोरा कोट अंगावर टाकला, आणि बटण ऐवजीं दोन पिना अडकवून तो दारांत घुटमळला. खरें म्हणजे या वेळीं पोटांत फक्त एकच कप चहा गेला असल्यामुळें तो वखवखून उठायचा, पण आज मात्र त्याला तें विशेष जाणवलें नाहीं. आज त्याला सारें अंग पोखरलेल्या लांकडाच्या तुकड्याप्रमाणें हलकें वाटत होतें, व त्याचा खालचा अंमळसर लुळा ओठ मधून अकारण थरथरत होता. आपण बाहेर जाणार हें सावित्रीबाईला सांगावें कीं नाहीं हें त्याला नीटपणें ठरवता येईना. तो उगाच खोकला, पण सावित्रीबाई कांहीच बोलत नाहीं हें पाहून तो जास्तच घाबरा झाला. सावित्रीबाई माजघरांत पिशवींत कसल्यातरी वह्या भरत होती. ती बंडाचार्यापेक्षां ठेंगणी होती, पण तिच्या विस्तारापुढें तो एखाद्या बोरुप्रमाणें दिसे. ती शाळा नंबर नऊमध्यें मास्तरीण होती. मायकलच्या क्लिपा फणसासारख्या पिंढऱ्याभोवतीं पातळाला लावून दणादणा पावलें टाकत ती शाळेकडे आली कीं त्या कंगाल वस्तींतील कल्हईवाले, खाटीक आणि पिंजारी देखील तिला वाट सोडत. पण शाळेंतील मुली मात्र तिच्यामागें तिला बाई न म्हणतां बाबा म्हणत.

धडल् बंडाचार्य घुटमळला याचें कारण निराळेंच होतें. आज सातआठ दिवस झाले, सावित्रीबाई एकदांहि त्याच्यावर कडाडली नव्हती. तिचा घसा बसला आहे कीं काय असें शेजारच्या भाऊरावनीं धडल् बंडाचार्याला एकदां विचारलें देखील. बंडाचार्याला तर तिच्या लाखोलीची इतकी संवय झाली होती कीं वाक्यें कोणत्या अनुक्रमानें येतील, याबाबत त्यानें शारदाविलास हॉटेलच्या उडप्याशीं केव्हांहि पुरीभाजीची पैज मारली असती. प्रथम ती आपल्या दळभद्री नशिबाचें वर्णन करत असे, नंतर दुकान असतांना घरांत लक्ष्मी कशी मोलकरीणप्रमाणें राबत असे हें ती शेजाऱ्या-पाजाऱ्यांना सांगत असे, व नंतर लष्कराच्या भाकऱ्या भाजत हिंडणाऱ्या बंडाचार्याला देव कसा विसरला कुणास ठाऊक, म्हणत ती फाडदिशीं दरवाजा लावून टाकत असे. एकदां तर, रात्रीं गिळायला आलास तर पाय मोडीन अशी तिनें बंडाचार्याला धमकी दिली होती. त्या दिवशीं मराठेच्या घरच्या लग्न पत्रिका, संत तुकाराम सिनेमाच्या जाहिराती फुकट वांटून मरगळलेल्या पायांनीं बंडाचार्य रात्रीं देवळाच्या कट्ट्यावर बसून राहिला. तो आपल्या डुलकींतून एकदम जागा झाला, तेव्हां सावित्रीबाई त्याला आपल्या मुसळासारख्या हातानें गदागदा हलवत होती. शेजारच्या गोंदूला घेऊन ती त्याला शोधत आली होती. "इथं काय आहे तुमच्या काकाचं गांटोडं! चला, इथं बसून मरणार कीं थंडींत?" ती खेकसली. तो घरीं गेल्यावर मग तिनें आपलें जेवण संपवलें. पण लगेच दुसऱ्या दिवशीं 'जा आतां एकदां उलथून' असें बंडाचार्याला बजावायला तिनें कमी केलें नाहीं. तिचा





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

*इतके दिवस अंधार होता; पण आतां जगलं पाहिजे. जगण्यासाठीं धडपडलं पाहिजे. वेदना आतां विझलेल्या आहेत. हावरी जीभ वळवळते; पण त्यावरहि ताबा ठेवण्याची शिकस्त करूं; पण जगलं पाहिजे. तिच्याचसाठीं, काल तिनें अचानकपणें मनांत एक आशांकुर फुलवला . . . . . .*



सारा आवेग ऊतूं येऊन जाईपर्यंत दारासमोर दोनचार पोरें जमत, एकदोन शेजारी एकमेकांकडे पहात हंसत, आणि बंडाचार्य मात्र कोटाच्या दोन्ही खिशांत हात खुपसून डूग काढून तिच्यासमोर मख्खपणें उभा असे. कारण हें सारें झाल्यावरच ती त्याच्या दररोजच्या खर्चासाठीं चार आणे देत असे. मग तो दुपारीं थंड भातभाकरी गिळून पुन्हां बाहेर पडला कीं, वेताळाच्या देवळांत थंड फरशीवर आराम वामकुक्षी, संध्याकाळीं कुठें असलीं तर फुकट धडल्कामें आटोपून रात्रीं बऱ्याच उशीरां परतत असे.

वास्तविक नेमक्या नऊ वाजतांच घरांतून बाहेर पडण्याची बंडाचार्याला आतां कांहीच गरज नव्हती. पण दुकान असल्यापासून त्याला जी संवय पडली होती, ती दुकानाचें वाटोळें होऊन गेलें तरी राहिली होती. बंडाचार्याचें एके काळीं भुसारी दुकान होतें. पण त्या दुकानासमोरच केळकरचें भाजीपुरीप्रसिद्ध हॉटेलहि होतें ही फार दुर्दैवाची गोष्ट होती. बंडाचार्याचा सारा वेळ तेथेंच जात असे. तेथील गल्ल्याजवळचें बाकडें त्यानें जवळजवळ आपल्याच मालकीचें करून टाकलें होतें. हॉटेलमध्यें शिरणारा कुणी ओळखीचा निघाला, कीं, बंडाचार्य त्याला हातानें धरून आग्रहानें शेजारीं बसवत असे, व त्याला चारत असे. त्यावेळीं त्याला शोधत खूप लोक येत. त्यांच्यांत बसून बंडाचार्य बोलूं लागला कीं त्याच्या चेहऱ्यावर आनंद ओसंडत असे. असें त्याचें दुकान पुरीभाजीमध्यें गेलें. प्रथम फाटक्या कपड्यांत त्याच्याकडे कामाला आलेल्या गुंडू गड्यानें त्याच ठिकाणीं आपलें स्वतःचें दुकान घातलें, आणि बंडाचार्य त्याच बाकावर बसून ओळखीचे कुणी भेटते कीं काय हें हावरेपणानें पाहूं लागला. सावित्रीबाईचा दर महिन्याला पगार येई, त्याला दररोज चार आणे मिळत,

वेळकगकडून कधींतरी बरीच देशभक्ती पाहिलेला एखादा खादीचा सदरा, ब्राह्मणसंस्थेकडून कधीं तरी धोतर मिळे. पण त्याच्या फाटक्या आयुष्याला गांठी गांठी पडल्या त्या कायमच्याच.

बंडाचार्य रिकामा झाला, त्याचवेळीं गांवांत चळवळ उसळली. शाळा-कॉलेजचीं तावदानें फुटलीं. फारशी प्रॅक्टीस नसलेले वकील डॉक्टर तुरुंगांत गेले व पंधरावीस पौंड वजन वाढवून देशभक्त होऊन बाहेर पडले. प्रभातफेऱ्यांमुळें सकाळची झोप अशक्य झाली, आणि चौकाचौकांत आकस्ताळी सभा झाल्या. या साऱ्यानें बंडाचार्य अगदीं झपाटून गेला. कमलातरी वास लागलेल्या कुत्र्याप्रमाणें तो दिवसभर वणवणा हिंडला. त्यानें मळकट पत्रकें वांटलीं. सकाळच्या थंडींत एक भडमुंजें उपरणें अंगावर पांघरून घरोघरीं जाऊन त्यानें प्रभातफेरीसाटीं माणसें उठवलीं. गांवांत अमक्या ठिकाणीं सभा आहे, तमक्या ठिकाणीं परदेशी कापडाची होळी आहे, या बातम्या सांगायच्या तर त्यानें मक्ताच घेतला. हातांतूनच तोफेचे गोळे निसटत असल्याप्रमाणें हात हवेंत वर उडवत, तोंडानें ‘धडल् धडल धडल्’ अशी आरोळी ठोकत, तो ठिकठिकाणीं उभा राहून बातमी सांगत असे. तो गल्लीच्या कोपऱ्याला दिसला कीं त्याच्यामागें पोरांचा घोळका धडल् धडल् म्हणत धावूं लागला, व त्याच्याचप्रमाणें हवेंत हात उडवूं लागला, आणि बंडाचार्य कायमचाच धडल् बंडाचार्य होऊन बसला. नंतर स्वातंत्र्यदिनाचें पहिलें झेंडावंदन झालें. त्यावेळीं खांबाच्या अगदीं जवळ जाऊन वंदन करण्याचा त्यानें प्रयत्न केला त्यावेळीं एका पोलीसानें त्याच्या पायावर लाठी मारली. लंगड्या कुत्र्याप्रमाणें पाय

नाचवत बंडाचार्य दीड महिना हॉस्पिटलमध्यें पडला. त्याच्या औषधपाण्यासाटीं सावित्रीबाईनें एक चिरवर विकला, आणि सारी गल्ली गोळा करून बंडाचार्यासकट सगळ्यांवर लाखोली वाहिली. चळवळ संपून गेली. पण धडल् बंडाचार्य अजूनहि त्याच हातवाऱ्यानें सिनेमा सांगतो, घरोघरीं लग्नपत्रिका वांटतो, खानेसुमारींत उगाचच धडपडतो. हें सारें तो खालच्या लिबलिबीत ओठ हलवत करतो, आणि मागें लागलेल्या पोरांच्या घोळक्याला निवळ खूप करण्यासाटीं खच्चून जोरानें धडल् धडल् म्हणून ओरडून हात हवेंत नाचवतो.

अखेर थोडें घुटमळल्यानंतर, जावें म्हणून तो पायरी उतरूं लागला, तेव्हां त्याच्याकडे न वळतांच सावित्रीबाई म्हणाली “उगाच तरबाळासारखं भटकूं नका. दुपारीं गिळल्यावर घरींच पडा स्वस्थ—”

त्या शब्दांनीं बंडाचार्याला गोंधळल्यासारखें झालें. कितीतरी वर्षांत त्यानें तिच्याकडून असले सौम्य शब्द ऐकले नव्हते. नाहींतरी चार आण्यासाटीं कांटेरी विषारी शब्द अंगाखांद्यावर पडायचे, कधींतरी आईबापाचा उद्धार व्हायचा. मग त्या विषानें तळमळत तो वेतागानें डॉक्टरकडे जाऊन बसे, व मागायला कसलें तरी औषध द्या म्हणून धरणें धरून बसे. पण आजच्या शब्दांनीं त्याला वाटत असलेली हुरहूर जास्तच वाढली, तो पायरी उतरून आला, व पाय ओढत चालूं लागला.

बंडाचार्य चालूं लागला. एकदां दोनदां गटाराकडेला गोट्या खेळत असलेलीं पोरें खेळ थांबवून धडल् धडल् म्हणून ओरडलीं. पण नेहमींप्रमाणें त्यानें त्यांच्याकडे पहात हात वर उडवला नाहीं. सुतळीनें बांधलेल्या वहाणा तुटूं नये म्हणून तो काळजीपूर्वक सावकाश चालला होता. पण आपण घरीं चहाचा एकच कप घेतला आहे हें मात्र तो विसरला नव्हता.

जी. ए. कुलकर्णी




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

## त्या तसल्या सोनसकाळीं—

नि र्म ला दे श पां डे

त्या तसल्या सोनसकाळीं, मी दंयांत न्हालें होतें
क्षिप्रेच्या कांठावरती, जुळविलें फुलांशीं नातें

मीं धुकें लपेटुन वसले, तें ओलें अंग टिपाया
सुटलेल्या केंसावरती, सोन्यानें केली किमया

स्वप्नील लोचनांमध्यें, उमटली अधूरी खूण
त्या खट्याळ मालव–कन्या, हंसल्या ग ! मला पाहून

अन् गुलाल उधळित आली, ती मादक सोनसकाळ
कां ? कुणास ठावें माझे, लज्जान्वित झाले गाल !

थरथरल्या पाण्यावरती चढला ग ! रुपेरी वर्ख
अलिगुंजन ऐकित असतां, सोशिले मधाचे डंख. . . .

ती तसली सोनसकाळ, राहिली आजला दूर
ग ! अवती भवती माझ्या ! दाटला तमाचा पूर

निःशब्द जाहला आज, हा श्यामल सागरकांठ
ह्या अंतिम जललहरीही, ओढिती मला दर्यांत

आज ह्या सांजवेळेला, घट बुडतो बुडतो डोहीं
अन् स्वयें हरवुनि वसते, घनतिमिरा मध्यें मीही

त्यामुळें जातांना तो कावळ्याच्या नजरेनें दोन्ही बाजूच्या हॉटेलकडे पहात होता. श्रीकृष्ण कॅफे-जवळ येतांच त्याचीं पावलें रेंगाळलीं. तेथें घमघमीत मसाल्याची उमळ फार मस्त होते. आणि त्यांत जर शेवचुरा घातल्या कीं पहायलाच नको. अगदीं अर्धा तासभर पोटांत अगदीं गोविंद गोविंद भजन होतें. वंडाचार्य दारांत घुटमळला. तेथूनच त्यानें नाक फुगवून मसाल्याचा वास भरून घेतला. त्यानें खिशांतून विडीचें थोटूक काढून तिथल्या फुकट दिव्यावर पेटवून घेतलें. तरीदेखील साधारण ओळखीचेंसुद्धां कुणी दिसलें नाहीं. तो कंटाळून पुढें गेला. पण कोपऱ्यावर धुवाधारातीच्या दारांत गणपतराव मदलूर दिसतांच वहाणांच्या जीवाची पर्वा न करतां तो लगबगीनें चालूं लागला, व बऱ्याच अंतरावरून हंसून त्यानें मदलूरांना नमस्कार केला. परंतु मदलूर आंत जात नव्हते, ते बाहेर पडत होते. त्यांनीं वंडाचार्याकडे सगळ पाहिलें, आंगावरचे उपरणें सांवरलें, आणि छत्री उघडून ते निघून गेले. वंडाचार्यानें त्यांना एक बारीकशी शिवी दिलीच. पण कुठलें तरी एक जुन्या उशीसारखें दिसणारें पोर समोर उभें राहून धडल् धडल् म्हणत होतें, त्याच्यावर देखील तो खेकसला. चरफडत त्यानें लायब्ररीच्या घड्याळाकडे पाहिलें. दहा वाजलेत, म्हणजे डॉक्टरांनीं दवाखाना उघडला असेल. तेथें जाण्याची आठवण होतांच वखवखलेल्या जिभेचा त्याला तात्पुरता विसर पडला, आणि तो दवाखान्याकडे वळला.

डॉक्टरांनीं नुकताच दवाखाना उघडला होता. त्यांच्याकडे येणारीं वर्तमान पत्रें वाचण्यासाठीं, जन्मतःच तें सहावें बोट असल्याप्रमाणें हातांत सतत सिगरेट असलेले मास्तर, रेल्वे क्लार्क काळे, ही मंडळी येऊन वसली होती. वंडाचार्याला येत असलेला पाहून डॉक्टर म्हणाले, "आला बुवा आमचा प्रसिद्ध पेशंट ! आज आज आतां पुन्हां विष मागायला घरीं काय भानगड झाली आहे कुणास टाऊक !" मास्तर, काळे यांनीं वर्तमानपत्रें बाजूला केलीं, व वंडाचार्याच्या दिशेनें पहात दोघेहि हंसले. कारण, पंधराच दिवसांपूर्वी वंडाचार्य आला होता, त्यावेळीं तें दोघेहि दवाखान्यांत होते, व त्यांना ती सारी गंमत आठवली.

त्यादिवशीं वंडाचार्य आला. पायऱ्या चढतांना तो नेहमींप्रमाणें एका पायरीला जोरांत ठेंचाळला, आणि डॉक्टरांच्या बाजूला एक स्टूल होतें त्यावर बसला. तो खुर्चीवर कधीं बसत नसे.

"हं काय, धडल् वंडाचार्य, आज काय आहे तक्रार ?" डॉक्टरांनीं विचारलें. पण त्यांना प्रश्नच ऐकूं न आल्याप्रमाणें वंडाचार्य आढ्याकडे पहात बसला. नंतर त्यानें मान कचकन् लांब करून तोंड डॉक्टरांच्या जवळ आणलें. तो बोलतांना ऐकणाऱ्याच्या आंत खोल उतरून बोलतो हें डॉक्टरांना माहीत असूनहि ते प्रथम जरा दचकले. "डॉक्टर, तुमच्याजवळ इतक्या बाटल्या आहेत," वंडाचार्य म्हणाला, "त्यांत मरायचं एखादं औषध असेल तर द्या मला बाटलीभर. पुरे झाली ही कटकट. एकदां उलथून जातों जगांतून"

"अहो, पण झालं काय इतकं वैतागायला ?" डॉक्टरनीं विचारलें. सांगण्यासाठीं वंडाचार्यानें तोंड उघडलें, पण तो लगेच गप्प बसला. सावित्रीबाईनें आपल्या आईचा भिकारडी डोंबारीण म्हणून उल्लेख केला, त्याचा पुनरुच्चार करणें देखील त्याला असह्य वाटलें. "देऊन टाका कसलं तरी विष, म्हणजे हा जंजाळ तरी संपेल," तो उगाचच पुन्हां म्हणाला.

डॉक्टरांनी कपाटांतून काळजीपूर्वक पाहिल्यासारखे केलें, आणि ते म्हणाले,

"अहो, आमच्याकडे विषाला काय तोटा ! तीं कोपऱ्यात हिरवी बाटली आहे ना, त्या औषधानं चारपांच तासांत मरायला होतं. त्या

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"पण या विहिरींत ठीक आहे," मास्तर पुढें म्हणाले. "तिकडे कुणी कधीं जात नाहीं. आंत उतरल्यावर सावकाश आपणाला सोसेल तेवढं तेवढं हश्यानं मरतां येतं. कुणाची तसदी नाहीं, कुणाची घाई नाहीं."

डॉक्टरांनीं चिमूटभर तपकीर घेतली. शर्टावर पडलेली तपकीर झाडत ते म्हणाले, "पण वंडाचार्य, या साऱ्या भानगडी हव्यांत कशाला तुम्हांला? तुमचं हार्ट वीक आहे ना, तेंच मग थांबेल कीं आपोआप कधीं तरी!"

"कसलं विक हार्ट नी काय!" हात झाडत वंडाचार्य म्हणाला, "गेलीं दहा वर्षें हार्ट वीक आहे, हार्ट वीक आहे म्हणून ओरडतों. कांहीं वेळां धाप लागते, घाम येतो बस्स. त्याला कांहीं धाडदेखील होत नाहीं. कपतीसंपतीं माणसं, घाम गिळतांना, जिना उतरतांना मरतात, आणि माझं काय नशीब आहे बघा डॉक्टर, असलं खोक्यासारखं हार्ट घेऊन गिळत बसतों दोन्ही वेळां!"

वंडाचार्य गप्प बसला, व त्याची मान परत गेली. चिरडलेलीं हाडें, आंतडें जाळणारी आग, फुफ्फुसें चिरडणारे हिरवें पाणी, या साऱ्यामुळें त्याच्या वैराग्याची बुरशी जळून गेली. पुन्हां साऱ्या शरीरभर धडपड उत्रेसारखी पसरली. आपणाला कांहीं तरी चमचमीत खायला पाहिजे हें त्याला जाणवलें. ही अकराची वेळ. यावेळीं केळकरांच्या हॉटेलांत बदामी हलवा होतो. इतर ठिकाणाप्रमाणें तो तांबड्या खळीचा लगदा असत नाहीं. तर पारदर्शक, तपकिरी रंगाचे चौकोन तुपानें चमकत असतात. यावेळीं कॉटन फ्यूचर आंकड्याचीं माणसें तेथें जमतात. वंडाचार्य तेथून उठला त्यावेळीं त्याच्या मनांत, कोणाकडून हलव्याची एक प्लेट उकळावी हाच एक कावेबाज शिकारी हेतु होता. आतां आगगाडीचा खडखडाट थांबला, विषाची वेदनाहि विझली. आतां राहिली ती हावरी जीभ, अजूनहि ईर्ष्येनें तें दुबळें शरीर जगवण्याची गवतमुळासारखी हट्टी इच्छा.

हें सारें पाहिलें असल्यामुळें वंडाचार्याकडे पहातांच आतां आपला थोडा वेळ गमतींत जाणार याची त्यांना खात्री वाटली. वंडाचार्य आंग चोरून वर आला, आणि कधीं नाहीं तें शेवटच्या खुर्चीवर बसला.

"हं काय खबर वंडाचार्य, काय नवीन!" डॉक्टरांनीं विचारलें.

"कांहीं नाहीं. काम होतं जरासं. पण इतरांचं होऊं द्या," वंडाचार्य चाचरत म्हणाला, "मला घाई नाहीं."

डॉक्टरांना आश्चर्य वाटलें, पण ते कांहीं बोलले नाहींत. मास्तर, काळे, थोडे निराश झाले. खालीं मान घालून बोटांची उघडझांप करत असलेल्या वंडाचार्यांचा जणुं त्यानें त्यांना फशीं पाडल्याप्रमाणें त्यांना रागहि आला. त्यांचें वर्तमानपत्रें चाळलीं, व ते दोघेहि निघून गेले. मध्यंतरी आलेल्या तीनचार पेशंटना डॉक्टरांनीं औषध दिलें, व ते गेल्यावर ते वंडाचार्याकडे वळले, "हं आतां बोला, काय हवं तुम्हांला?" ते म्हणाले.

"नवीन म्हणजे असं डॉक्टर,..." तेवढ्या अंतरावरूनच वंडाचार्य म्हणाला. तो डॉक्टरांकडे पहायचं टाळत होता. "कालपासून फार धाप लागायला लागली आहे. कांहीं वेळां एकदम पाय कापतात. काल रात्रीं तर छातींत दुखत होतं. तेव्हां त्यावर कांही तरी औषध पाहिजे."

"हें काय?" डॉक्टर हंसून म्हणाले, "तेंच पाहिजे होतें ना तुम्हांला? हार्टची किल्ली सरत आली आहे. आतां विष नको, आगगाडी नको."

वंडाचार्य खालीं पाहूं लागला. त्याचा खालचा जाड ओठ थरथरूं लागला, व त्यानें मूठ घट्ट आवळली.

"आतां तसलं कांहीं नाहीं डॉक्टर. आतां जगायचं औषध पाहिजे." तो म्हणाला.

डॉक्टरांनीं कंपाउण्डरला खूण करून तीन नंबरचे मिक्चर द्यायला सांगितलें. वंडाचार्याकडे बाटली नव्हती. कंपाउण्डरनें एक जुनी बाटली काढली, व तिच्यात लालसर रंगाचे औषध घालून वंडाचार्याकडे दिली.

"सकाळ, दुपार, सायंकाळ तीनदां घ्या," जांभई देत डॉक्टर म्हणाले. आजूबाजूला इतर लोक असल्याखेरीज वंडाचार्याशीं बोलायला गंमत नाहीं हें त्यांना माहीत होतें. ते उठले, व वंडाचार्यहि जायला निघाला.

"दोनचार दिवसांत बरं वाटेल, नाहीं डॉक्टर?" वंडाचार्यानें भीतभीत विचारलें.

हा जगण्याची उत्सुकता असलेला वंडाचार्य डॉक्टरांना नवीन होता. त्यानें औषधाची बाटली जपून अगदीं आंगाजवळ धरली होती. आणि आपल्या प्रश्नाला काय उत्तर येणार, याची त्याच्या चेहऱ्यावर काळजी दिसत होती.

"काय वंडाचार्य, प्रकृतीची विशेष काळजी घ्यायला लागलात? काय कुठं कामबीम लागलं कीं काय?" त्याच्या पोटांत बोट खुपसून डॉक्टरांनीं विचारलें.

"तुम्हींच कुठं लावून दिलंत तरच काम या जन्मांत," मान हलवत वंडाचार्य म्हणाला, "तें कांहीं नाहीं पण आतां जगलं पाहिजे, धडपडलं पाहिजे. काल तिनं मला सांगितलं. बायको आता गरोदर आहे."

भारत सरकारकडून रजिस्टर्ड केलेलें.

पांढरे डाग



तुमच्या शरीरावरील पांढऱ्या डागांची काळजी घेत आहां काय?

आमचें प्रसिद्ध औषध सन १९३५ पासून चालू आहे. या दीर्घकालामध्यें हजारों लोकांनीं याचा अनुभव घेऊन गुण कळविलेलें पांढऱ्या कोडाचें गुणकारी औषध. आपणहि याचा फायदा घ्यावा. औषधाची किंमत ६ रुपये पोस्ट खर्च १ रुपया. माहिती पत्रकें मागवा. मोफत पाठवूं. नकली वैद्यापासून सावध रहावें.

वैद्य बी. आर. बोरकर, आयुर्वेद भुवन (दीपा)

मु. पो. मंगरूळपीर, जिल्हा अकोला [महाराष्ट्र]








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कुणी तरी कडकडून प्रहार केल्याप्रमाणें डॉक्टर चमकले, कमरेवर हात ठेवत मागें सरकले. इतक्या वर्षांनंतर? त्या लठ्ठ बाईला! आणि हा वंडाचार्य? याचं हार्ट तर अगदीं चिंधी होऊन गेलें आहे. तें ऐकून त्यांना थोडा मत्सरहि वाटला. त्यांना स्वतःला तरीच वर्षे मूल नव्हतें. पण नशीब तरी पहा, तें सरळ त्यांनीं बांधलेल्या नव्या घरावरून पुढें गेले, व त्यानें या धडल् वंडाचार्यांच्या घरावर हळदीचा पंजा उठवला! पण मत्सराची भावना आली, तशीच गेली त्यांना एकदम शरमल्याप्रमाणें, अपराधी वाटलें.

"बरं पण, तीन नंबरचं मिक्श्चर दिलंत वंडाचार्यांना?" त्यांनीं कंपाउण्डरला विचारलें.

"हां, त्याला आपण तेंच मिक्श्चर देतों नेहमीं. नाहीं तरी फुकट पेशंटच आहे तो." आंतून बापट म्हणाले.

"उद्यां तो आला, कीं त्याला निराळं प्रिस्क्रिप्शन द्यायला हवं." ते म्हणाले. परंतु नंतर बराच वेळ सुतळीनें बांधलेल्या वहाणांनीं पावलें काळजीपूर्वक टाकत, औषधाची बाटली जपून नेणारा वंडाचार्य त्यांच्या मनांत त्याच त्या पायऱ्या उतरत राहिला. तीन नंबरचें मिक्श्चर म्हणजे कसल्या तरी द्राक्षोमाल्टमध्यें घातलेलें फक्त पाणी होतें.

वंडाचार्य पायऱ्या उतरून चालूं लागला तों नेमक्या खालच्या पायरीला ठेंचाळला, आणि एका वहाणेची सुतळी तुटली. त्यानें ती जोडण्याचा थोडा प्रयत्न केला, पण तें साधलें नाहीं. मग त्यानें विचार करून दोन्ही वहाणा उचलल्या, व त्या कोटाच्या ऐसपैस खिशांत घालून तो अनवाणी चालूं लागला. आतां ऊन वाटूं लागलें, व रुमालांत उघडा राहिलेला बिस्किटाएवढा डोक्याचा भाग त्यांत भाजल्यासारखा होऊं लागला. वंडाचार्यानें धडपड या बोटांनीं तो झांकला, परंतु लगेच दुसऱ्या ठिकाणीं नवाच भाग उघडा पडला, तेव्हां त्यानें तो प्रयत्न सोडला. खालचा डांबरी रस्ताहि आतां तापलेल्या लोखंडी पट्टीसारखा वाटूं लागला.

वंडाचार्याला आतां गळल्यासारखें वाटूं लागलें. आपण एकच कप चहा घेतला आहे, एव्हाना दोनतीन ठिकाणीं तरी शिरा, पुरीभाजी व्हायला पाहिजे होती, म्हणजे आपणाला इतकें दमल्यासारखे वाटलें नसतें असें त्याला एकदां वाटलें. पण आतां जिभेची रिवरिव कमी झाली होती. उलट आतां घरीं जाऊन तासभर स्वस्थ आडवें व्हावें असें त्याला वाटूं लागलें. डोळे किंचित् जळजळूं लागले होते, आणि त्यामुळें आजूबाजूच्या घरांच्या कडा कुणी तरी लाल खडूनें गिरवल्याप्रमाणें दिसत होत्या.

"ओ हो हो, धडल वंडाचार्य, अगदीं तुमचीच वाट पहात होतों बरं," धुरकटलेल्या निळ्या प्रकाशांतून कुणी तरी म्हटलें, व त्याच्या खांद्यावर हात ठेवला. वंडाचार्यानें डोकें हलवून डोळे साफ करून घेतले व पाहिलें. लालभडक कोटटोपीचा, लालचेहऱ्याचा कुणी तरी माणूस समोर उभा होता. कोण हा? पण आवाज ओळखीचा वाटतो. हा गणपतराव मदलूर असावा.

"तुमचीच वाट पहात होतो, आज होऊन जाऊं द्या तुमची धडल तोफ." मदलूर म्हणाले. "मारुतीच्या देवळांत सदानंदस्वामींचं प्रवचन आहे अद्वैतावर. तेव्हां चार सहा ठिकाणीं या तुमची धडल तोफ उडवून."

वंडाचार्य अजून मनाच्या कापूसवच्चांत चाचपडत होता. मदलूर आपलीच वाट पहात होते? कुठें? सकाळीं आपली कुठें तरी भेट झाली होती असें वाटतें. हो, श्रीकृष्णजवळ.



उत्तम फलाच्या अपेक्षेला 'साधना' हवीच!

छपाईच्या बाबतींतहि तेंच आहे.

गेलीं कित्येक वर्षे सर्व तऱ्हेच्या छपाईसाठीं आम्हींहि अशीच साधना केली; म्हणूनच आमचे आश्रयदाते म्हणतात, कीं 'साधना' म्हणजे कोणत्याहि तऱ्हेची उत्कृष्ट छपाई!!

ही दिवाळी आमच्या सर्व आश्रयदात्यांस सुखासमाधानाची जावो!....

साधना आर्ट प्रिन्टर्स

११/A कॉमर्स हाउस, बेसमेंट
१४० मेडोज स्ट्रीट, फोर्ट, मुंबई – १

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# लिस्टरीन ॲन्टीसेप्टिक

## तुमच्या रोजच्या संरक्षणाचे प्रतिक

तोंडातल्या ओलाव्यामुळें आणि उष्णते मुळे रोगाचे जंतू उत्पन्न होतात व जेवण झाल्यानंतर दातांमध्ये जे अन्नाचे कण राहतात ते तर जंतूना निमंत्रणच देतात. तेव्हां एक चांगले ॲन्टीसेप्टिक द्रव जंतूचा नाश करून तोंड व जीभ स्वच्छ ठेवतें. लिस्टरीन हें एक उत्तम ॲन्टीसेप्टिक असल्याने तें तोंड स्वच्छ ठेवतें. सुखी जीवनासाठी लिस्टरीन ॲन्टीसेप्टिकचा उपयोग करणे आवश्यक आहे.





लिस्टरीन वापरण्याने सर्दी खोकला अगर गळ्याची दुखणी होत नाहींत हें सिद्ध झालें आहे. आपली प्रकृति उत्तम ठेवण्यासाठीं लिस्टरीन ॲन्टीसेप्टिकच्या रोज दोनदा गुळण्या करणे जरूर आहे. सुखी जीवनासाठी लिस्टरीन ॲन्टीसेप्टिकचा रोज उपयोग करणे आवश्यक आहे.




रोज जेवणानंतर लिस्टरीनच्या गुळण्या केल्यानें तोंड तर स्वच्छ होईलच आणि श्वासही स्वच्छ बनेल. पान तंबाखू खाणाऱ्यांना लिस्टरीन ॲन्टीसेप्टिकच्या गुळण्या करणें अतिशय आवश्यक आहे. तें वापरल्याने तोंड आणि दांत स्वच्छ राहील सुखी जीवनासाठी लिस्टरीन ॲन्टीसेप्टिकचा उपयोग करणे आवश्यक आहे.

तोंडातील जंतू नष्ट करण्यासाठीं लिस्टरीन ॲन्टीसेप्टिकच्या गुळण्याकरण्याची रोज सवय ठेवा. लिस्टरीन ॲन्टीसेप्टिक एक अत्यंत उपयोगी आणि खात्रीचें ॲन्टीसेप्टिक आहे. आजपासूनच आपल्या कुटुंबातील माणसांना लिस्टरीन ॲन्टीसेप्टिक द्वारा संरक्षण द्या. लिस्टरीन ॲन्टीसेप्टिक ३, ७, अगर १४ औसांच्या बाटल्यांमधून मिळूं शकेल

**रोज लिस्टरीन वापरणे**
**ही एक चांगली सवय आहे...**

वॉरनर लॅम्बर्ट फार्मास्युटिकल कंपनी
(निर्मिती दायित्वसहित यु. एस. ए. संस्थापित)

WL 1360 MAR








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

उसळ, मसाल्याचा वास. हो. गणपतराव मदलूर. पण खालीं रस्त्यावर पाय मात्र चटचट भाजत आहेत.

"सर्वानंदस्वामीची ? अद्वैतावर ?" मान हलवत बंडाचार्य म्हणाला. पण त्याला आतां घरीं जायचें होतें. पायांनीं त्याला एकदम जोरानें फिरवल्याप्रमाणें तो जाण्यासाठीं वळला.

"थांबा हो," मदलूरांनीं त्याचा हात धरुन त्याला थांबवलें, "देवळांत संध्याकाळीं घरांतून जाजम आणून टाकायचं बरं."

"जाजम. देवळांत." जणुं स्वतःशींच पुटपुटल्याप्रमाणें बंडाचार्य म्हणाला. मागून खेचल्याप्रमाणें मदलूर एकदम दूर गेले. दोन्ही बाजूंनीं घरें दचकल्याप्रमाणें एकदम मागें सरकलीं. रुंद रुंद, आंधळ्या प्रकाशानें भरलेला रस्ता. त्यांत कुठें तरी आपलें घर रुतून बसलें आहे. पितळी कुलूप लावलेलें, स्वयंपाकघरांत गळणारें पण आडवें पसरायला अंथरूण असलेलें. पायांत घोटाळणारा मध्येंच उष्ण चावणारा काळा तापलेला रस्ता थोडा थोडा बाजूला करत बंडाचार्य आपल्या गल्लींत आला.

एकदम चारसहा आवाज धडल् धडल् म्हणू लागले. मध्येंच कुत्र्याचें ओरडणेंहि ऐकूं आलें. पण हें सारें फार दुरुन आल्याप्रमाणें वाटलें. भोंवतालच्या पुसट प्रकाशावर पडून ते आवाज खालीं घरंगळले. आतां बंडाचार्यांचे पाय मरगळल्यासारखे झाले होते. घर अजून लांब आहे. त्याशिवाय राधाबाईकडून किल्ली आणायची आहे. ती झिजून गेल्यामुळें सात आठ वेळां फिरवल्याशिवाय कुलूप निघत नाहीं. मग एक मोठा सोपा. मग भिंतीशेजारी अंथरुण; मऊ गरम, सारें शरीर सोशिकपणें सहन करणारें शिवाय उशालाहि रुंद उशी. पण घर लांब आहे. आतां तर' वेताळाचें देऊळ आलें. येथून घर बावीस घरें आहे. बवीस.

बंडाचार्य एकदम मटकन वेताळाच्या कट्टयावर बसला. दोनचार पोरें भोंवतीं जमलीं. धडल् धडल् म्हणून थोडा वेळ ओरडली, कंटाळून निघून गेलीं. एक कुत्रें मात्र बटबटीत आंलसर डोळे घेऊन तसेंच उभे राहिलें. "हाच्छ !" म्हणत बंडाचार्यांनें हात हलवला, पण त्याचे ओठ आवाज न करतां फक्त हलले. देवळाच्या कट्टयावर दुसऱ्या बाजूला पांचसात जण पत्ते खेळत बसले होते. त्यांपैकीं एकानें ओरडून विचारलें, "काय धडल्, आज बायकोनं दरवाजा आपटला कीं काय नाकावर ?"



## माहेराची जळवंती

राजा बढे

माहेराची जळवंती कशी वळणानं वाहे
पाय निघेना ग तिचा मागें मुरडून पाहे

दोही तटांवरी रानजांभळीची गर्द छाया
वाळूंतून झुळझुळे तिची निळी निळी काया

सुवासिनी शिरविती गुणीं गुंफियली गौर
जाइ खाली तरंगत जित्या फुलांचा संभार

झिरमिरी पालवीत कवडसे चांदण्याचे
घातले ग वाळूवरी मऊ चंदेरी गालिचे

सासूरवाशिणी सूना कुळवंताच्या ग लेकी
गळ्यात घालुनी गळे खेळतात एकीबेकी

एकमेकीला सांगती अनुभव खराखोटा
शेजेच्याही गुपिताला हळू ऐके पानवठा

डौल पहा कंबरेचा चालतांना नारीजात
घागरीची गळसरी तिचा गोरा गोरा हात

नितंबाची हालचाल कटि झळकते जळ
दुजा डोईवरी हात जरा सरली चुंबळ

भिजलेली नागवेल बिंब तरळतें तटीं
लाज राखायाला झोंबे वसन तें अंगलटीं

झाला बाई नदीकाठ साऱ्या गांवाचा आरसा
गावजीवना विसावा तिचा एक भरवंसा

बंडाचार्य कांहीं बोलला नाहीं. सारें आंग खालून हळूहळू पातळ होत आहे असें त्याला वाटूं लागलें. त्यानें देवळाच्या ओबडधोबड भिंतीला दुखणाऱ्या पाठीचा कणा टेकवला, व पाय लांब पसरले. धडल् धडल्. धडल्. कोणीतरी जवळच ओरडलें. तो आवाज आंगावर पडला, आंग भिजवत छातींत उतरला, व तेथें तो थेंबाथेंबानें गळूं लागल्याप्रमाणें तेथून तोच बारीक पोकळ आवाज ऐकूं येऊं लागला. धडल् धडल्...

"आज बंडाचार्य बायकोला सिनेमाला घेऊन जाणार आहे," हा सातप्पाचा आवाज. "सती सावित्री सिनेमा लागलाय कालपासून."

सगळेजण खालीं पडून पडून हंसले. गोपाळ दुकानदारानें एक पान खालीं टाकलें, व खिदळतच तो पट गोळा करूं लागला. पण सातप्पानें त्यावर झडप घातली. "अहो बाजीराव, राजा माझा आहे. लागलात कीं पट घ्यायला ऐटींत !" तो म्हणाला.

"मला वाटलं, राजा शंकऱ्याचा आहे. म्हणून मी एक्का ठेवून घेतला हातांत." बावरून गोपाळ म्हणाला. तो एक्का घेऊन आतां पुढें काय करायचें याबद्दल शंकऱ्या पटकळ बोलला. "म्हणे मला वाटलं ! तुला वाटलं तूं दिल्लीचा बादशहा आहेस." पच्चकन थुंकत शंकऱ्या म्हणाला.

"हे कुठलं अवदशी धडल् येऊन बसलं कुणास ठाऊक ! त्यामुळें डावावरचं लक्ष गेलं आमचं !" बंडाचार्यांकडे पहात गोपाळ कुरकुरला.






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

फक्त संकटकाळींच
धोक्याची साखळी ओढावी

गाडींत चढण्यापूर्वी
उतारूंना प्रथम उतरूं द्या.

गाडींतील भिकारी आणि
फेरीवाले यांना उत्तेजन देऊं नका.

पिक दाण्यांमध्येंच थुंका

आपले अवजड सामान
ब्रेक व्हॅन मध्येंच बुक करा

दीपावली - शुभेच्छा

येणारें वर्ष आपणांस सुखाचें आणि भरभराटीचें जावो अशी इच्छा प्रकट करीत
असतानांच आपण प्रवास करते वेळीं आपला प्रवास आनंदी आणि सुखकर होवो
अशी आम्ही इच्छा करतों. असें करतांना आपला आणि
आपल्या सहप्रवाशांचा अनुभव रेल्वे प्रवास करीत
असतांना अधिक आनंदी आणि सुखकर होण्यासाठीं
आपणांस कांहीं करावयाच्या आणि टाळावयाच्या गोष्टींची
आठवण आम्ही करून देऊं इच्छितों.

INDIAN RAILWAYS

मध्य आणि पश्चिम रेल्वे

MARATHI



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

घडल्. घडल्. घडल्. घरें आतां किंचित् कलतीं होतात. दिव्याचा खांब कुणी तरी मुद्दाम वळवून ठेवला आहे. बाजीराव, राजा माझा आहे. सर्वानंदस्वामींचें अद्वैतावर प्रवचन आहे; स्वामी हातांत अगदीं इस्पिकचा एक्का घेऊन बसला आहे; स्टेशनवर नवें कोरें इंजिन आहे; बंडाचार्यानें औषधाची बाटली हातांत घट्ट धरली, व तिचें बूच काढायचा प्रयत्न केला. पण मळगळलेलीं बोटें स्थिर होईनात. त्यानें बाटली काळजीपूर्वक दुसऱ्या खिशांत ठेवली. खिशांतील वहाणा त्यानें चाचपून पाहिल्या. घर, अंथरुण अद्याप वीस घरें लांब आहे. हुकूम आहे बदाम.

बुडाले, बुडाले, आमचे चार पट झाले' शंकऱ्या, तूं नुसता नंदीबैल आहेस बघ. तुला किलवर खेळायला काय झालं होतं? घडल् घडल् मध्येंच कुत्रें भुंकलें. रस्त्यावरुन मोटर बिन शेपटीच्या मोठ्या मांजरांप्रमाणें अस्पष्ट प्रकाशात तोंड खुपसून खुपसत नाहींशी होते. उसळीला मसाल्याचा वास होता, देवळात जाजम घालायला हवें, घडल् घडल्, आज संध्याकाळीं मारुतीच्या देवळात सर्वानंदांचें अद्वैतावर प्रवचन आहे, ऐका हो. लडदू, त्या एक्क्याची सुरळी कर...

बंडाचार्यांनें बाटलीवर बाहेरुन हात धरला व हात उशाला घेत तो दुसऱ्या कुशीवर आडवा झाला. त्या खिशांतील वहाणा प्रथम आगाला रुतल्या, पण नंतर ती कळ मेली. बंडाचार्याला एकदम जुन्या, जीर्ण वर्षांपूर्वीची आठवण झाली. इनामदारांकडे जेवायला जातांना वडिलांना जानवेंच मिळेना. सदरा काढतांना तें कुठें पडलें कुणास ठाऊक. सगळ्यांची धावपळ झाली, सामानाचा उपसा पडला. अखेरीस साखरपुडक्याचा दोऱ्याचें जानवें करुन तें जेवायला गेले. घरमालकानें भाड्यासाठीं सारें सामान बाहेर काढलें, त्यावेळीं त्यानें पोथ्या, कागद वाऱ्यावर फेकले, ते पतंगाप्रमाणें तरंगून तरंगून गल्लीभर पसरले. मग कंदील हातांत घेऊन आई, दादा रात्रभर ते गोळा करत होते एकदां आईनें चुकून चिंचे ऐवजीं शिकेकाईचीं बोंडें घालून आमटी केली, ती सगळ्यांनीं अगदीं भुरकून भुरकून खाऊन पातेलें रिकामें केलें. पण शेवटीं शिकेकाई पाहिल्यावर मात्र सगळ्यांना मळमळल्यासारखें वाटूं लागलें! बंडाचार्य एकदम हसूं लागला, व हंसण्यानें त्याच्या डोळ्यांत पाणी आलें. नंतर त्याला एकदम धाकटी बहीण पद्मा आठवली. ती पांच वर्षांची असतांना वीरभद्राच्या जत्रेंत हरवली. कुठें गेली कुणास ठाऊक! हातांत काडीला लावलेला साखरेचा कोंबडा, चिकट तोंड, गोऱ्या तोंडावर येणाऱ्या भाबड झिप्या; त्याचा सदरा सारखा ओढणारी. तिचा कुठें पत्ताच लागला नाहीं. बंडाचार्याला तिच्या आठवणीनें रडूं आवरलें नाहीं. त्यानें हातानें तोंड घट्ट दाबून धरलें व आवाज दाबत तो स्वतःशींच हुंदके देऊं लागला.

पत्त्यांना खेळ संपला व सगळेजण समोरच्या तालमीकडे निघाले. शंकऱ्यानें कांबळें झटकलें व खांद्यावर टाकलें. जातांना त्यानें बंडाचार्याला पायानें डिवचलें, व म्हटलें, "ए घडल्, जा आतां घरीं, आणि पोटांत भर कांहींतरी."

बंडाचार्य तेथल्या तेथें हलला, पण तो कांहीं बोलला नाही त्याच्या साऱ्या शरीरभर हलकीशी लाट पसरत आली होती; आणि डोळ्यांतील आगहि संपली होती. काचेच्या बोलसर गोट्याप्रमाणें डोळे घेऊन तो आतां चक्क सूर्याकडे पहात पडला होता.

सगळीं माणसें गेलीं, पण तें कुत्रें तेथेंच उभें होतें. बंडाचार्य आडवा झाला होता, ती त्याची नेहमींची जागा होती. बंडाचार्याला पाहून ते वसावसा दोनदां ओरडलें. हिः हिः असा नाकानें आवाज करत तें दोनतीन ठिकाणीं अजूबाजूला हुंगलें, आणि आतां हा आडवा झालेला म्हणून काय हलणार! अशा आविर्भावानें अंग हलवत तें गटाराकडेनें निघून गेलें. • • •

## लांडगा आणि बगळा

## ही—साफ नीति




एक लांडगा अनिष्ट परिस्थितींत सांपडला होता. अधाशीपणानें खातांना त्याच्या तोंडांत हाड अडकल्यामुळें त्याचा प्राण कासाविस होत होता. जवळून जाणाऱ्या कनवाळू बगळ्याला त्या लांडग्यानें बोलावून सांगितलें कीं, आपल्या घशांतलें हाडूक बगळ्यानें काढल्यास त्याची कीर्ति दिगंत पसरवून त्याशिवाय त्याच्या सेवेचें चीजही यथासांग करीन. लष्कराच्या भाकऱ्या भाजण्यास सदैव सिद्ध असणारा तो बगळा गळ्यांतलें हाडूक काढण्यास उत्साहानें पुढें सरला. अनेक प्राकृतिक अडीअडचणींतून त्यानें आपल्या परिणामकारक कर्तृत्वानें कार्यसिद्धी केली व मोठ्या आशेनें लांडग्याकडे पाहिलें. आपला घसा मोकळा होतांच लांडगा हिंस्रपणें हंसून म्हणाला, "हे कृशग्रीवा! माझ्या घशांत घातलेली तुझी मान मी सुरक्षित ठेवली हेंच तुझें बक्षीस समजून मुकाट्यानें चालूं लाग. नाहीतर माझ्या तीक्ष्ण दातांचा प्रसाद तुला देईन."



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




प्लेटो सेट
एक अभिनव
भेट



आपले आवडते प्लेटो फाऊंटन पेन आणि प्लेटो बॉल पॉईंट पेन ...हा सेट आतां चित्ताकर्षक पेटीतून मिळूं लागला आहे. प्लेटो पेन आपण वापरताच, पण ही छानदार पेटी आपण पाहिलीत काय !

कोणत्याही शुभप्रसंगी भेट म्हणून देण्यास अगदीं योग्य अशीच ही भेटवस्तू आहे.

plato
प्लेटो प्रेझेन्टेशन सेट




म्हात्रे पेन अँड प्लॅस्टीक इंडस्ट्रीज प्रा. लि.
प्लेटो फाउंटन पेन आणि बॉल पॉईंट पेन, इतर प्रकारची फाउंटन पेन्स, तसेच फाउंटन पेनची निब्स् आणि सुटे भाग यांचे निर्माते
सोल डिस्ट्रीब्युटर्स : बेस्ट फाऊंटन पेन डेपो
७९ देवकरण मॅन्शन, प्रिन्सेस स्ट्रीट, मुंबई २

Shilpi MP. 130 Mar







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट






अहा वाटतें प्रसन्न ताजें, तार्जेतवानें, प्रसन्न ताजें ! लाइफबॉय स्नानाच्या उल्हासाची हीच मौज ! आणि विशेष म्हणजे हें स्नान करतांना लाइफबॉयनें आंगावरच्या मळधाणींतले जंतू धुवून जातात नी कसें स्वच्छ, निरामय वाटतें ! लाइफबॉयनें घरांतील सर्वांना निकोप प्रकृतीचा आनंद घेतां येतो.

**लाइफबॉय** ज्याचे घरीं, आरोग्य तेथें वास करी!

L. 33-X52 MA

हिंदुस्तान लीव्हरचें उत्पादन










अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

## माझें खाद्य जीवनं

(पान ३५ वरून) नंबर दिले आहेत. हे नंबर तिथल्या चवींच्या गुणानुक्रमानें दिले नसून टेबलावरच्या चादरी—काटेचमचे—वेटरचा गंभीरपणा—मॅनेजरचा सूट—आंतली कृत्रिम थंडी आणि अनेक दिवे लावून केलेला अंधार ह्या कारणानें दिला आहे. खाणाऱ्यानें सावध रहावें! आपल्याला आरोग्यापेक्षांहि खिसा.कीट संभाळायचें आहे. टेबलावरच्या त्या चकचकीत सुऱ्यांनीं लोणी कापलें जात नाहीं. पण खिसे मात्र सफाई कापले जातात. खरीं हॉटेलें म्हणजे जिथें माणसें-माशा आणि 'पोऱ्या फडका मार' ही आरोळी सुखानें एकत्र नांदतात तीं! विशेषतः 'पोऱ्या फडका मार' आणि 'दोनिस्संव' ह्यापैकीं पहिल्याचा खर्ज आणि दुसऱ्याचे तारसप्तक एक 'हार्मनी' साधून जातें तें हॉटेल! तिथला बटाटवडा—नुसती जीभ—झणझणणारे कान आणि डोळेच काय पंचेंद्रियांची खबर घेऊन जातो! इथल्या वेटरला टिप दिली तर त्याला गिऱ्हाइक खुळें वाटतें! त्या मोठ्या हॉटेलांतून वेटरला केवळ टिप घेण्यासाठीं नेमलेलें असतें! त्यांतून आपण देशी भाषांतून बोलणारे असलों कीं खेळ खलास! हीं असलीं मोठीं हॉटेलें किंवा खाणावळी ह्या जेवणाच्या जागाच नव्हेत. मोठ्या हॉटेलांत फॅशन् म्हणून आणि खाणावळींत अविवाहित किंवा कुटुंब माहेरीं म्हणून जायचें असतें! विशेषतः 'अमुक भोजनालय—तमुक विहार' वगैरे नांवाच्या खाणावळींना तर अर्थच नाहीं. हे म्हणजे माणसांचे पेट्रोलपंप! टाकींत एक लिटर पेट्रोल टाकल्यासारखीं हीं जेवणें! मग ती राइसप्लेट असो नाहींतर 'भरपेट' असो! उदरभरण म्हणजे भोजन



दहिंवडा म्हटलें कीं मला गोसावडा म्हटल्यासारखें वाटतें—

नव्हे! ह्या खाणावळींत अपवाद म्हणजे आत्मारामाची, राजारामाची, गंगारामाची—भागवताची—निमकराची अशी ज्या कोणी स्वतः स्वैपाकाची साधना केली आहे त्यांनीं चालवलेल्या खाणावळी! ह्या परंपरेची स्फूर्तिदेवता सखूबाई! (ईश्वर मृतात्म्यास शांति देवो!) तिथें आस्था आली! दाजी रेग्याला गाबोळी आवडते आणि अंता नेरुरकराला सोलाच्या कढींत मिठाची एक कणी जास्त लागते हें इथें स्मरलें जातें! गुळवणीमास्तरांना भाताची खरपुडी काढून ठेवण्यांत येते. आणि ग्यासिसचा त्रास सुरू झाल्यापासून आप्पा जोशासाठीं ताकाच्या वाटींत हिंगाची चिमूट पडते. पण इथल्या पदार्थांना आवर्जून जाऊन खावेत असे गुण नाहींत! तिथें घरच्या सारखें वाटतें तें जेवणाचा चवीमुळें नव्हे तर आत्मारामबापू किंवा निमकर काकाच्या आपुलकीमुळें! असल्या खाणावळींतलें जेवण तिथल्या चविष्ट गप्पांनीं रंगतें! कारण मालकांना अनेक गोष्टींत मत असतें. गम्य असण्याचा संबंध नाहीं. कधीं काळीं तिथें केशवराव भोसले जेवून गेल्यामुळें 'तसा गवयी झाला नाहीं आणि होणार नाहीं' हें त्यांचें मत माणसें खाल्ल्या मानेनें ऐकतात. शिवाय उधारी बंद आहे ही पाटी फक्त भिंतीची शोभा वाढवण्यासाठीं असते!

कधीं कधीं कुठल्या कोपऱ्यांत पडलेलीं हॉटेलें भलताच धक्का देऊन जातात! मुगभाटांत एके काळीं चंपाचें हॉटेल होतें. चंपा हें पुरुषाचें नांव आहे हा खुलासा प्रथम करावा हें बरें! तिथल्यासारखी पिवळी बटर बिस्किटें जगांत मिळत नसावींत! रॉकेलच्या डब्यांतून भरलेलीं हीं बिस्किटें माझ्या लहानपणीं रुपया शेकडा होतीं! हें बिस्किट चहाच्या कपांत असें कांहीं फुगून येत असे कीं हंटलेपामरनें चंपाच्या पायाशीं बसून तें शिकवें! भिस्कुटांची चव बिस्किटांना आली नाहीं. सुरती बटरचें नांव झालें पण बटर बिस्किटें सावंतवाडीचीं! तिथल्या लाकडी खेळण्यांहूनहि चांगलीं!

### माझ्या कांहीं श्रद्धा!

परमेश्वरकृपेला पूर्वसंचिताची जोड मिळाल्यामुळें माझा जन्म एका मत्स्याहारी कुटुंबांत झाला! आमच्या घरांत परमेश्वराच्या ह्या प्रथमावताराचें मोठ्या प्रेमानें भजनपूजन सेवन व्हायचें. मला गुलाबांच्या फुलाला काटे असतात हें कळण्यापूर्वी करलींतले काटे कसे पचवावे तें कळायला लागलें! पोटांत काटे भरून तृप्तीचा ढेकर देणारे आम्ही मत्स्याहारीच! माझ्या एका मत्स्यगोत्री कविमित्राची तर अंतिम इच्छा आपली समाधी समुद्रांत बांधावी अशी आहे. 'ज्या माशांच्यावर मी आजन्म जगलों त्यांनीं निदान एक दिवस तरी माझ्यावर जगावें!' हें त्यानें मला एकदां काटे चुकवीत बांगडा खातांना ऐकवलें होतें. मी मात्र असा पक्ष-

We wish our esteemed Clients a happy Dipawali
Chhaya
MILK BAR & RESTAURANT
ALLI CHAMBERS, TAMARIND LANE
MEDOWS STREET, FORT, BOMBAY 1
Phone : 253580

होमिओपाथिक औषधें व पुस्तकें
खात्रीलायक होमिओपाथिक व बाराक्षार (बायोकेमिक) औषधें तसेंच साखरेच्या गोळ्या, बाटल्या, बुचें व डॉक्टरांना आवश्यक असणाऱ्या इतर वस्तु मिळण्याचें पश्चिम भारतांतील प्रमुख ठिकाण :-
पुस्तकें :- इंग्लिश – हिंदी – मराठी प्रकाशनें
जास्त माहितीकरितां लिहा :—
रॉय आणि कंपनी
१७६ प्रिन्सेस स्ट्रीट, मुंबई २





अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पाती राहिलों नाहीं. माझ्या देहावर साऱ्या चराचर सृष्टीचा अधिकार आहे. कारण मी ह्या सर्वांभूतीं खाद्य पाहिलें !

मी शाकाहाराचा भोक्ता आहे तसाच स्वाहाकाराचा ! मला तळलेलें निषिद्ध नाहीं— पोळलेलें नाहीं. लाटलेलें (दुसऱ्याचें नव्हें— पोळपाटावर) नाहीं—वाटलेलें नाहीं. ऊन-ऊन भात-वरण-लिंबू-वांग्याचें भरीत बाजरीची भाकरी-चटणी चांगलें ताक हा मेनू मला जितका प्रिय तितकीच 'तिरफळ' घालून गेलेली लालभडक वांगड्याची आमटी भात आणि खोबरेल तेलाचें बोट लावलेला पापड, सोलाची कढी ! मात्र दुसऱ्या मेनूनंतर नुकत्याच फोडलेल्या नारळाची करतळी हवी आणि पहिल्या मेनूनंतर पान हवें. भारतीय संस्कृतीबद्दलचा माझा आदर दर सणामागल्या पक्वान्नांतून (तादात्म्य होऊन) सांडतो ! होळीच्या पोळीची चव रामनवमीला नाहीं. रामनवमीचा सुंठवडा कृष्णजन्माला पटत नाहीं. बुंदीचा लाडू दिवाळीला चाखतो तसा दसऱ्याला चाखून पहावा ! आणि भुसभुशीत मोतीचुर बुंदीच्या लाडवावर माझी श्रद्धा नाहीं. मुगाळाच्या आणि बुंदीच्या लाडवांनीं दातांची खोलवर चौकशी केली पाहिजे ! अनारशावर आणि चिरोट्यावर मात्र माझी अजिबात भक्ति नाहीं. अनारशाला कांहीं 'कॅरेक्टर'च नाहीं. अनारशामागें कोणतीच संस्कृति उभी नाहीं ! आणि चिरोटा ? कुण्या पुस्तकी सुगरणीचा घरीं करायला घेतलेल्या खाऱ्या बिस्किटांचा साचा मीठ घालायला विसरून बिघडला आणि तें पीठ थापून त्याच्यावर साखरपेरणीची मखलाशी करून बिस्किटाऐवजी चिरोटा म्हणून तिनें नवऱ्याला बनवलें.

खाद्यांचं देखील एक खानदान आहे. ह्या खानदानाचा ते पदार्थ तिखट गोड—किंवा आंबट तुरट असण्याशीं कांहीं संबंध नाहीं. चकलीला खानदान नाहीं. ती उपरी आहे. तिच्याभोवतीं वातावरण नाहीं. ती खुसखुशीत असो—अरळ झालेली असो पण तिला आपला असा स्वभाव नाहीं. नुसतीच तुकडेमोड आहे. पण कडबोळ्याला मात्र कूळ आहे ! उद्यां पदार्थांच्या जातीच करावयाच्या ठरवल्या तर कडबोळें हें देशस्थ वैष्णव कुळीचें कानडी उच्चारानें मराठी बोलणारें आहे म्हणावें लागेल. तर चकली आंतरजातीय विवाहांतून जन्मलेलें अपत्य आहे. कारवारकडे कडबोळ्याचेच दोन नळसे कमी करून मुदी करतात. कारवारींत मुदी म्हणजे आंगठी ! चकली भानगडगल्लींतली तशी चिवडाहि. पण चिवड्यांत अठरापगड गोष्टी असून त्याच्या भोवतीं मित्रमंडळीच्या अड्ड्याचें कुंपण आहे. मात्र चिवडा हा एकट्यानें खाण्याचा पदार्थ नव्हे ! चिवड्याची चव खाणाऱ्यांच्या संख्येनें गुणलें असतां वाढते ! पण चिवड्यां-तला अत्यंत चविष्ट भाग तळाशीं उरलेलें तिखटमीठ इतरांची नजर चुकवून तर्जनीनें चेपून ती जिभेवर दाबल्यावर कळतो ! ह्याला धैर्य लागतें ! चिवड्याचें मूळ स्वरूप म्हणजे भत्ता ! ह्याला मजूर चळवळीच्या प्रथम चरणांत लेनिनमिश्कर म्हणत असत ! म्हणजे भत्याचें लेनिनमिश्कर भोवतीं मार्क्सवादी गप्पा सुरू झाल्या की होत असे ! कुरमुरे, डाळ, दाणे, कांदा, बारीक शेव, कोथिंबीर, मिरच्या आणि उखड्यावरच्या गप्पा ! चिवड्याची गंगोत्री चारचौघांत जो ओतला की 'अरे बापरे एवढं हें कोण संपवणार' असा सार्वजनिक उद्गार निघून ज्याचा शेवट रिकाम्या कागदाखालीं पडलेला शेंगदाणा हळूच उचलून तोंडांत टाकण्यावर होतो तो खरा भत्ता !

## स्फोटक चवीचे कांहीं मासले

जगांतली उत्तम सुखें फुकट्यांत मिळतात हें सूत्र जातीच्या खाणाऱ्यांनाच कळालें ! उकडलेल्या

elegant
and
sturdy......
Model 180R
Model 93
Pat. Lic. No. 58926/56.
"Bentex"
watches · straps · bracelets
A wide range of Straps and Bracelets to suit any taste.
Sole Agents :
Bentex SALES CORP.
BENTEX BLDG., BOMBAY 7.
Mfs : COLLINS & CO., BOMBAY 7
AVAILABLE AT ALL WATCH DEALERS.
BSC-R17A



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

गांवरान शेंगा हें याचें उत्कृष्ट उदाहरण! कॉलेजांत पत्त्यांच्या अड्डा बसला कीं क्लबांत मणभर शेंगा आणून उकडत लावलेल्या असायच्या! भोंवतालच्या वध्यांकडे क्लबांतून आळीपाळीनें त्या शेंगा उपसून आणण्याचें काम असे! पण शेंग खावी फक्त गावरान! मी खुद्द जपानांत जाऊन जपानी शेंगा खाल्ल्या. त्या शेंगांना एखाद्या गोऱ्यापान पण फोफशा बाईसारखें "तें" म्हणतात तें आकर्षण नाहीं! गांवरान शेंगेच्या चवीला माळावरच्या शिडशिडीत पण जवानीच्या तेजांत तळपणाऱ्या काळ्यासावळ्या गोफणवालीचें 'इट्ट' आहे! पहिल्या चार शेंगांत तोंड खवळतें! मन म्हणत असतें आतां पुरे! नको त्या दिशेला पाहूं! पण इथें मनावर जीभ पट्टा फिरवून जाते! आपण शेंगा खातों तसे चिनी लोक खारवलेल्या कलिंगडाच्या बिया दातांतल्या दातांत उघडून खातात आणि पुटुक्कन् फोलपटे टाकतात! मी दोनतीन बियांत जीभ चावली! शेंगा उकडतां उकडतां त्या मातीच्या पाण्याशीं आणि मिठाशीं मुरतात! मग सालावरची माती-मीठ—ती साल आणि आंतला दाणा यांचा असा कांहीं चवदार मेळ बसतो कीं ती भुईमुगाची शेंग भुई आणि मूग ह्यांचें अद्वैत होऊन पोटीं जाते! शेंगा दुपारीं उकडत लावाव्या आणि उकडल्यावर तशाच ठेवून संध्याकाळीं खाव्या! पूर्वी मुंबईला सिनेमांत 'खारी सेंग' मिळे! आतां त्याची जागा वेफर्सनीं आणि पॉपकॉर्न नामक लाहीनें घेतली! एका जुन्या पैशांत—हातभर उंचीच्या त्या तिकोणी नळकांड्यांत बारा ते चौदा 'खाऱ्या शेंगा भरणारी कसबी मंडळी गेली कुठें? बाकी भाजलेल्या शेंगा ह्या नेहमी दुःखांत शेवट करून जातात! शेवटली शेंग ही नेहमी थूः थूः करायला लावते! चिवड्यांत सालासकट शेंगदाणे टाकल्यावर पिवळ्या चिवड्यांत जी शेंगेच्या लाल सालीची आणि किंचित् तळून पोपटी केलेल्या मिरचीची रंगसंगती जमते ती मजा शेंगदाणे सोलून पडले की जाते! सोलून केलेल्या भाजल्या शेंगदाण्याचा चैनीच्या खाण्याशीं संबंध नाहीं उपाशी खाण्याशीं आहे! शेंगदाणा कुटून फक्त त्याची चटणी चांगली होते! आणि हें कूट फक्त सोलापूरच्याच लोकांना जमतें असें माझें ठाम मत आहे. शेंगदाण्याची चटणी महाराष्ट्रांत सर्वत्र होते पण तिला स्फोटकपणा फक्त सोलापुरींच! सोलापुरी चिवडा ही मात्र एक निवळ जाहिरातबाजी आहे!



## गर्द झाडी

••••••••••••••

सौ. अंजली ठकार

गर्द झाडी...  
तोकड्या वाटा...टोंकदार कडे—झोंकदार  
घाट...  
खारीसारखी चपळ गाडी  
—कुणी कुणाची सय घेऊन धावते आहे  
यांत क्वचित् माझीहि लय लागते आहे.  
सांवळी खाडी...  
उंच माड—बटा झावळ्यांच्या विरकटणारे  
कोंवळीं शहाळीं पिऊन थंड  
आवळे जावळे लांब किनारे...  
वळवाच्या झडीची क्षणिक वर्दळ  
त्यांत रंगणारी प्रीतीची कर्दळ  
—कुणी कुणाचे जपलेले अन् भाव भोळे  
पाहून क्वचित् टपटपतात माझेहि डोळे  
झुलती होडी...  
कुणी कुणाला घालते कोडीं...  
बुजरा चंद्र...साजरे आकाश...  
चांदण्यांचा घोसदार गजरा...  
गुलजार लाटांचा नखरेल मुजरा  
रगेल वाऱ्याची पहाडी तान  
ऐकून क्वचित् लवते खालीं माझीहि  
मान...  
मात्र हुजूर—  
मंजूर बाई...  
साक्ष आहेत दिशा दाही  
इतकी वेडी कुणासाठींच झालें नाहीं...

### हे ते तीन छत्रे

चिवडा सोलापूरपेक्षां कोल्हापूरचा! छत्रे यांचा! महाराष्ट्रांवर ह्या तीन छत्र्यांचे अनंत उपकार आहेत. एक चिवडेवाले—दुसरे सर्कसवाले आणि तिसरे केरुनाना गणिती! उपकार उतरत्या श्रेणीनें घ्यावे! कारण चिवडेवाल्या छत्र्यांनीं कोल्हापुरच्या 'रम'ला जी हाणझणित साथ दिली ती असंख्य उघडे शेमले आणि कांहीं चोरट्या झिरमिळ्या अस्मानांत पोहोंचवून आली. सर्कसवाल्या छत्र्यांनीं वाघसिंह सांभाळले यापेक्षां रहिमतखांसारख्या भूगंधर्वाला पाळलें हे त्यांचे खरे उपकार! शेवटले गणिती असल्यामुळें त्यांना माझा केवळ अज्ञानापोटीं आलेला नम्र प्रणाम!

बाकी शेंगदाणा ही वस्तू मात्र केवळ दुय्यम भूमिका करणाऱ्या नटासारखी नाहीं. 'गुडदाणीं'त तिला स्वतंत्र अस्तित्व आहे. 'गुडदाणी' हें पुण्याचें वैशिष्ट्य आहे. विशेषतः राजगिऱ्याची चिक्की आणि गुडदाणी ही बाहुलीच्या हौदापुढें ग्लोबसिनेमाजवळ रात्रीचा शो सुटल्यावर पेट्रोमॅक्सची बत्ती पेटवून लखलखाट केलेल्या हातगाडीवाल्याकडून घ्यायला हवी! हा प्रकार दिवसाउजेडी खाण्याचा नव्हे! (आणि तो प्रदेशहि दिवसाउजेडी जाण्याचा नव्हे!) मुंबईत चिक्की विकतात—पण ती खरी नव्हे आणि लोणावळ्याची चिक्की ही तर केवळ कागदी करामत आहे. ती घेतल्याचा आनंद ती रंगीबेरंगी कागदी पुडी सोडल्यावर लगेच मावळतो! शिवाय पिस्त्याची चिकी काजूची चिक्की हा चिक्कीचा अपमान आहे. चिक्कीत जाऊन बसणें हें मुळीं पिस्त्याचें आणि काजूचें कामच नव्हे! हें म्हणजे नेहमीं जार्जेटांत वावरणाऱ्या सिनेमा नटीनें ग्रामीण पिक्चरमध्यें नऊ वारी लुगड्यांतून आणि कुंकवाच्या आडव्या चिरीतून पाटलाच्या पोरीची उसनी लाज मागून आणण्यापैकीं आहे.—नदीकाठीं गुडघाभर पाण्यांत कळशी बुडवतांना वाकली की चटकन् केसांच्या कृत्रिम लाटा जाणून बुजून ढळवलेल्या पदरामागली शहरी शोभा दाखवून जातात! चिक्की हें गांवरान काम आहे! चिक्की आणि शेवेचा लाडू हा प्याकबंद संस्कृतींत बसत नाहीं! चिक्की हें ज्यन्तेचं खाणं आहे! तिचं पिस्त्याशीं आणि काजूशीं सूत जमत नाहीं! पिस्ता हा स्वागतसमितीचा दिखाऊ सदस्य—शेंगदाणा मांडवांत राबणारा स्वयंसेवक! काजू मात्र वरच्या आणि मध्यम वर्गातला! तो जरासा बदामाच्या कुळांतला! म्हटलं तर सात्विक म्हटलं तर चल्की! मटणांत बदाम चालतो. काजू नाहीं. दुधांत बदाम चालतो—काजू नाहीं. काजूचा लाडू ही मात्र खरी मालवणी करामत! देशावर ज्योतिबाच्या जत्रेंत शेवेचा लाडू खावा आणि कोकणांतल्या उत्सवाला साखरेंतला काजू आणि खाजें खावें! कोकणांत मात्र शेंगदाणा हा उपासालाच! त्याला स्वतंत्र स्थान अजिबात नाहीं! हिंदींत शेंगदाण्याला चीनी बदाम






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

म्हणतात. शेंगदाण्याचा संपूर्ण अधःपात पाहायचा असेल तर टामेटोच्या कोशिंबिरींत! देशी शेंगदाण्याचें कूट आणि विदेशी टामेटोचा रक्तपात मिसळून ही कोशिंबीर होते! ह्यांत टामेटो मरतो आणि शेंगदाणा निष्कारण कुटला जातो! शेंगदाण्याचें खरें व्यक्तिमत्त्व चिवड्यांत उजळून येतें! पण कौशल्य योग्य योजनेंत आहे. बाकी ह्या बिचाऱ्याच्या नशिबीं गुण असून एकट्यानें मानानें जगणें कमी! कधीं गुळाशीं सोयरीक तर कधीं तिखटाशीं सलगी! कधीं चिवड्याचा आप्त म्हणून तर कधीं आळवाच्या फतफत्यांत! हा कुणाना कुणाचा पाठीराखा म्हणून येतो! भाजलेले शेंगदाणे बशींत घालून खातखात वर्तमानपत्रीं लिखाण चांगलें जमतें म्हणतात! काजू, बदाम वगैरे मंडळी स्वतःचें अस्तित्व टिकवून असतात. इतरांशीं मिसळत नाहींत असें नाहीं पण आपली मिजास ठेवून! विशेषतः एखादा बदाम आपली कडवट स्मृति कायमची ठेवून जातो! त्यातून शिरा-आटीव दूध-रबडी हलवा वगैरे वरच्या वर्गात यांचं बसणं उठणं? तसा बदाम हा मुळांत शाकाहारी खानदानाशीं संगनमत करणारा! वृत्तीनें सात्विक. काजू जरा तामसी! कारण घराणें दारू गाळणाऱ्यांचें! त्यामुळें अधिक विषयासक्त! तरीहि मुगाच्या आमटींत भाव खाऊन जातो! काजूची उसळ नांवाचा प्रकार मात्र अगदींच येडपट! असल गझलकवालीवाल्याला 'धांवरे रामराया' म्हणायला लावावें तशांपैकीं! उसळ ही हरभरे, मटकी, मटार आणि कुळीथ ह्यांचीच!

## कांहीं इस्लामी कुलोत्पन्न

सुक्या फळांची सगळ्यांत गरीब जात शेंगदाणा आणि अति मिजासी अवलाद म्हणजे पिस्ता! ह्याच्या नांवांतच पेशावरी तुरम्याची ऐट आहे! ह्याची नुसती हिरवी पखरण भाव खाऊन जाते! मात्र मुसलमानी संस्कृतींत हा अधिक रमतो! तिकडलाच आहे तो! आतां श्रीखंड-बासुंदीवर त्याला पसरतात पण तें त्याचें काम नव्हे! पिस्त्याची पखरण पहावी इराणी फिरनीवर. त्या मुलायम सफेद पिवळ्याशीं ह्याची हिरवी ऐट अशी उठून दिसते कीं— पिवळ्या जर्द शलवार कमीजवर हिरवी मखमली ओढणी घेऊन पहुडलेल्या काबूलकन्येची बाहेरच्या हिरव्याच्या आंत कधींकधीं याद यावी! हा गुलाबकळीच्या पाकळ्यांची झांक घेऊन मिरवतो! पिस्ता हा मोठा इष्किलस आशिक आहे! पण मराठी प्रांतांत हा पाहुणा. एकतर महागडा आणि दुसरें म्हणजे आपल्या पदार्थांशीं कुठें जमवून घेत नाहीं! काजू मसाल्याच्या वांग्यांत सुद्धां बसतो. पिस्त्याला टाकायचा कुठें? तसा बदामदेखील आपला आपण जमवून घेतलाय म्हणून. पण हेहि उत्तरेकडचेच. खानदान इस्लामीच! कधीं वाटींत पडलेच मिळत तर त्यांचा शेवट सत्यनारायणाच्या शिऱ्यांत व्हायचा. (हा शिरा सत्यनारायण होऊन गेल्यावर दुसऱ्या दिवशीं अधिक चांगला लागतो! पहिल्या दिवशीं नुसताच प्रसाद असतो. पण दुसऱ्या दिवशीं आतले केळें अधिक पिकून मुरलें कीं त्यांतलें सोवळें प्रसादपण जाऊन तो माणसांत येतो!)

पिस्ता-बदाम ह्यांच्याच घरांतला जरदाळू! हा लेकाचा सदैव उधारींत व्यापार केलेल्या बनियाच्या चेहऱ्याचा! वास्तविक ह्याचें तरुण रूपडें इतकें आकर्षक आहे कीं सुकल्यावर 'त्याच देहाचें का हे वार्धक्य?' असा प्रश्न पडतो!...सर्व गुण असून एखाद्याला नशीब नसावें तसें ह्या जर्दाळूचें आहे! हा पिवळा म्हणून जर्द आणि 'आलू' हे नांव उत्तरेंत कुठल्याहि फळाला मिळतें! पण मराठी जर्दाळू म्हटलें कीं कमनशिबी असा अर्थ असावासा वाटतें. वास्तविक हा गोड, तसा ह्याला स्वाद आहे—आंतल्या बीमध्यें बदामाहून स्वादिष्ट गीर असतो पण ह्या फळाचा कांही जम बसला नाहीं! हौसेनें कोणी जर्दाळू घेऊन खाल्ल्याचें मला स्मरत नाहीं! त्यामानानें सुका अंजिर म्हातारपणीं देखील दिमाखांत असतो! ताज्या केळ्याची कांति नसली तरी सुकेळें कांहीं गरीब वाटत नाहीं. (हे खाण्यापेक्षां मला केळीच्या सोपांतलें ह्याचें प्याकिंगच अधिक आवडतें!) ह्या सुक्या मेव्यांत लोक 'चिलगोजा' हा

## एकीचें बळ   ही अगदीं ईसाप नीति



एका कुटुंबांतील बालगोपाळ नेहमीं हक्कांसाठीं झुंजत असत. कुटुंबप्रमुखानें नीतीचा, तादात्म्याचा आणि कौटुंबिक एकात्मतेच्या गोष्टी सांगून बाबापुता करून पाहिलें पण त्याचा परिणाम न होतां दिवसेंदिवस उपसर्ग वाढूं लागला. अखेर त्यानें वेळूवनांतून एक काठ्यांचा जुडगा आणून कौटुंबिक मजलस जमवली व तो जुडगा प्रत्येक सानथोर झुंजार पुत्रांच्या हातीं देऊन आपापलं शक्ति अजमावण्यास सांगितलं. प्रयत्न करूनही कुणाला तो मोडणें नव्हे तर साधें वांकवणेंही जमेना. नंतर कुटुंबप्रमुखानें काठ्या सुट्या करून प्रत्येकाला एक एक देऊन तिच्यावर वक्रप्रयोग करण्यास सांगितलं. आपापल्या कुवतीनुसार प्रत्येक झुंजार पुत्रानें कमी अधिक वेळांत त्या काठ्यांचे तुकडे केले. कुटुंबप्रमुखानें ह्या प्रात्यक्षिकाद्वारें कौटुंबिक एकात्मतेचें महत्त्व त्या सुपुत्रांस पटवून देऊन एकमेकांच्या पायांत काठ्या घालण्याचा उपक्रम सोडून देण्याची विनंति केली.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

कुरतडत बसतात कोण जाणे ! हा एक अत्यंत तापदायक प्रकार आहे. ज्या सुक्या मेव्यानें यत्किंचितहि सुखवलें नाहीं असा हा मात्र चिलगोजा ! एरवीं अक्रोड फोडायला वेळच्या वेळीं हातीं कांहीं न लागून देखील अक्रोड फोडायचा तो काश्मिरी अडकित्ता एकदां सांपडण्याची जिकीर संपून अक्रोड खाल्ला की ताप विसरला जातो ! काट्यानें काटा काढतात तसा अक्रोडानें आक्रोड फोडावा दोहोंपैकीं आपल्याला जो फुटावा असें वाटत असतें तो फुटत नाहीं. पण एक फुटतो !

## 'मासळीचा स्वाद दुणा'

पण अस्सल खवैयाच्या हिशेबीं सुकामेवा ही एक आपली फसवाफसवी आहे. खाण्यांतसुद्धां अन्न म्हणून खाणें आरोग्याला बरें म्हणून खाणें आणि खाण्याच्या आनंदासाटीं खाणें असे तीन प्रकार आहेत. त्यांचें श्रेष्ठत्व उलट्या अनुक्रमानें आहे ! भात किंवा गहूं हे देह टिकवण्यासाटीं भरायचें जळण आहे. पण तें जळणदेखील काय गंमत करून जातें ! आजच्या जिरग्या तांदळाचा भात आणि तुरीच्या डाळीचें वरण रसरशित ताजे लिंबू आणि लोणकढें तूप हें कांहीं जळण नव्हें ! जो भात खदखदूं लागला म्हणजे प्रियकराचें प्रेयसी वरचें लक्ष उडून आमोद सुनास होतें त्याला काय पोषक अन्न ह्या वैद्यकीय कोष्टकांत कोंबायचें ! घराचें घरपण स्वैपाकघरांतून येणाऱ्या ह्या वासावर सिद्ध होतें ! इथें सारी सात्त्विकता ताटांत वरणाचें पीतांबर चढवून येते ! मात्र ही


विवाहेच्छु स्थळें
सारस्वत ब्राह्मण

१) B. E. वय २९, पगार रु. ४५०
२) INTER ARTS, वय २५, पगार रु. २५०
३) B. A., वय २६, पगार रु. २००
४) मॅट्रिक, वय ३१, पगार रु. २७५
५) मॅट्रिक, वय ४०, पगार रु. ५००

अशा प्रकारच्या स्थळांसाटीं वैयक्तिक प्रयत्न केला जातो. प्रथमवरांचीं नांवें विनामूल्य नोंदतों. पंचेचाळीस पैशांचीं तिकिटें पाटवून माहितीपत्रक मागवा.

सौ. आशाताई कुलकर्णी
३१६ ए, हेमराजवाडी, टाकुरद्वार नाका, मुंबई २





लौकरच 'भेळेसह चौपाटी राहिलीच पाहिजे !' ही चळवळ करावी लागणार असें दिसतें

फक्त दिवसा मानवणारी सात्विकता ! सकाळचें जेवण शाकाहारी असावें आणि रात्रीचें रंगीत संगीत ! ह्याला अपवाद म्हणजे रविवार दुपार ! त्या दिवशीं मात्र मासळीचा स्वाद दुणा हवाच ! रोजच्याच मासळीला रविवारीं दुपारीं असा आगळा स्वाद कां यावा हें एक कोडें आहे ! फुटाणे शुक्रवारीं लागतात तसे इतर वारीं लागत नाहींत आणि पेढा दत्ताला साक्षी ठेवून खावा ! अगदी तीन जिभा फुटाव्या तसा गोड लागतो !

## उदरभरण नोहे–एक रंगीत मैफल...

बाकी भोजनाचें ताट हें देखील एखाद्या चित्रांतल्यासारखें रससंगती साधून जावें ! पहिला भात मूद—स्वरूप असावा. वरण-भाताबरोबर डाळिंब्या असाव्यात. बाकी वाल खावे कायस्थांनीं ! असें बिरडें अन्यत्र विरळा ! बटाटा जसा मुंबईला झावबाची वाडी ते भ ईजीवनजी लेन ह्या परिसरांत 'गोडी बटाटीचा रस' होऊन शिजतो तशी वालाची डाळ कायस्थाबरींच शिजते. अन्यत्र नाहीं. आधुनिक जमान्यांत जातीय दृष्टि वाईट खरीच ! पण जीभ जर योग्य जातीच्या वळणानें वळेल तर भोजन हें उदरभरण न रहातां एक रंगीत मैफिल होऊन जाईल ! पुष्कळदां मला केवळ ह्या खाद्यविशेषांच्या परंपरागत संरक्षणासाटीं जाती टिकाव्यात असें वाटतें ! उद्यां सगळ्यांचेंच खाणेंपिणें सारखें झालें की महाडच्या सोड्यांचे कालवण खायला जायचें कुठें ? कोल्हापुरच्या पाणकोंबडीनें सद्गतीसाठीं कुठल्या सवळेकऱ्याकडे पाह्यचें ? भेजा आणि कलेजा तळायचा नाय असें मटनप्लेट हाउसवाल्यांनीं ठरवलें कीं खेळ खलास ! आंतरजातीय विवाह व्हावेत पण उभयपक्षीं खाद्यस्वातंत्र्याच्या करारावर सह्या होऊन ! अगदीं कळाहीन जेवण पहायचें असेल तर नवश्रीमंताच्या घरच्या पार्टीला दिल्लीला जावें ! एक तर पंगत नाहीं. आणि टेबलावर पायरेक्स डिशेसमध्यें तेच पदार्थ ! तोच निस्तेज मसाला घातलेली मुर्गी—तीच कळाहीन बिर्यानी—तीच ती फरशीवरची निःस्वाद भाजी-त्याच टमाटो-मुळे कांदे आणि बीटच्या चकत्या-तीच मटणबॉल्सची करी—त्याच पुऱ्या-तीच फिक्कट पंडुरोगी चटणी आणि तेच दहीवडे ! अत्यंत संस्कृतिशून्य जेवण ! आपणच ओढायचें आणि आपणच गिळायचें ! ज्या कोंबडीच्या आणि आपल्या पहिल्या ओटीभेटींत डोळे पाणावत नाहींत ती कोंबडी खाण्याऐवजीं दुध्या-भोपळा खाल्लेला काय वाईट ! जो बोकड जातां जातां जिभेला चटका लावून जात नाहीं त्याचा निष्कारण बळी कां द्यायचा ? पाश्चात्यांचें हें नुसतेंच अन्न उकडणें म्हणजे आधुनिकता असें समजण्याच्या ह्या काळांत भारतीय खाद्यें आपलीं सांस्कृतिक पातळी (आणि जाडी) गमावून बसताहेत ! दहिवडा हा काय रात्रीच्या जेवणाबरोबर खायचा पदार्थ आहे ? मला दहिवडा हा शब्द मोठ्यानें म्हणायला देखील आवडत नाहीं. गोसावडा म्हटल्यासारखें वाटतें.

खाणें सात्त्विक असो वा तामसी आपापला रंग घेऊन-ढंग घेऊन ऐट घेऊन–चैन घेऊन नव्हें कुळशील घेऊन आलें पाहिजे ! मुरगीची एकादी टांग हातीं धरली की कळलें पाहिजे की हिचें खानदान मऱ्हाठी आहे की मुसलमानी ! जातीच्या खाणाऱ्याला कुठलीहि जात सारखी ! किंबहुना खूप जाती आहेत आणि त्यांची सैंपाकघरें आणि पाकपद्धती 'पाक' राहिलीं पाहिजेत असें न भितां सांगण्याचें धैर्य फक्त खवैयालाच आहे ! जातिवंत गवैयाप्रमाणें आम्ही खवैयाचीं घराणीं मानतो ! मऱ्हाटे चर्चाबहाद्दर म्हणून आम्हांला आदर खराच पण मिर्चीबहाद्दर म्हणून अधिक ! कारण मिरची हा भारतीय पाककलेचा आत्मा आहे ! आम्हांला कुठल्याच मिरच्या झोंबत नाहींत. कारण आम्ही न भितां हातानें कांदे सोलतो ! मिरच्या झोंबणें आणि नाकानें कांदे सोलणें हें धुवट शिष्टांचें काम ! आम्हां खवैयांचें नव्हे !

## वांगड्याला–तिर्फळ कोंवडीला–मसाला

एकच मुर्गी पण बहुधा वदन्ती ! तिचें पंजाबी तंदूर स्वरूप हें मात्र बड्या ख्यालासारखें मुर्गी खावी तंदूरस्वरूप ! आणि ती देखील दिल्लींतल्या आलीशान हाटेलांत नव्हे ! तंदूर मुर्गी तिथें रंग जमवते हें खरें. पण खरा तंदूरी मुर्गा ! पंजाबच्या शिखाच्या छातीएवढ्या रुंद रस्त्याकांठच्या मोटर अड्ड्याशीं गाडी थांबवावी.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

आणि 'हट्टी'च्या दारच्या रांजणा इतक्याच आडमाप सरदारजी मालकाला—'सतश्री अकाल' करावा आणि की गल है—असें विचारीत तंदूर मुर्गा मागवून ' त्वाड्डा ज्वाब नहीं सरदाराऽ" म्हणत सुरवात करावी! घासा घासागणिक आयुष्य वर्षावर्षांनी पुढें गेल्यासारखें वाटतें! मग पनीरमटर मागवून 'प्राटा' बसवावा! माणसें दिल्लीला जाऊन कुतुबमिनार आणि राष्ट्रपति-भवन ह्या सामान्य माणसांस रहाण्यास सर्वस्वीं अयोग्य अशा जागा पहातात आणि 'प्राटा गल्लींत' जाऊन तळहातावर गरम पराठा आणि छोले खात नाहींत! दिल्लींत जाण्याच्या लायकीच्या दोनच गल्ल्या एक पराठा गल्ली आणि शेजारची छोले गल्ली! नाक्यावरच्या एखाद्या कर्तारसिंगाकडून लस्सीचा जाम संपवावा आणि दिल्ली पाहिली म्हणून परतावें! वेळ असलाच तर शंकरमार्केटच्या फुटपाथावर 'वर्रा' खावा! याला शीख कबाबहि म्हणतात. सळ्यावर भाजलेला हा 'वर्रा' ही एक खैबरी खासियत आहे. हा झाला पंजाबी ढंग! वरचा काश्मिरी; पण त्या खाण्याला ही पंजाबी मस्ती नाहीं! बीसबीस वाटणीचें जेवण कधीं नाजुक कधीं बेभान! कमळाचे देठ खाण्यासाठीं वापरावे काश्मिरी पंडितांनींच! पण ह्या जेवणांत मूळ मुर्गीचा किंवा बोकडाला मसाल्यांत फारच लपवण्यांत येतें! जेवणांत मसाला झणझणावा. पण कसा? शराबी डोळ्यांत सुरमा दिसावा तसा! मूळचे डोळे उजळून गेले पाहिजेत! डोळ्यापेक्षां सुरम्याची ऐट वाढतां कामा नये! नुसता सुरमाच डोळ्यांत भरला की नजरबंदी व्हायची कशी?

मसाल्याचें असेंच आहे. मसाल्यानें मसालिताचे गुण उजळून न्यावे. मुर्गीचें मुर्गीपण टिकवणारा मसाला हवा. तिर्फळानें बांगड्यांचा आब राखून झणझणावें. एरवीं हल्लींच्या सतारीच्या साथीच्या तबल्यासारखें व्हायचें! तबलीयाचें धोरण अगदींच कातडीबचावू नसावें पण त्यानें तबल्याच्या वादीनें सतारिया बडवूं नये. मसाला ही एक उत्कृष्ट साथ आहे. मूळ चीजेची सम साधून बाकीची डौलदार करामत हवी. नाहींतर पेशावरी कोरमा होतो. मसाल्याच्या ढिगाखालीं मेल्या कोंबडीला गुदमरून टाकण्यांत काय शहाणपणा आहे?

गाण्याप्रमाणें खाण्यांत देखील ध्रुपदधमारापासून ते छक्कड–झगड्यापर्यंत सर्व प्रकार आहेत. नित्याचें भोजन हें ध्रुपदधमारासारखें; ताठ स्वर आणि मात्रांची आल्टापालट. त्यांत फारसा चवचालपणा उपयोगाचा नाहीं. पण खरा मझा आहे इतरा छंदीं!

### भेळेला भैय्याचाच हात हवा

चौपाटीवर ज्यानें नुसतीच हवा खाल्ली त्यानें चौपाटी पाहिली पण अनुभवली नाहीं. चौपाटीवरच्या भेळ ह्या चीजेनें चौपाटीवरचें चौपाटीपण सिद्ध केलें आहे. मुंबईवरच्या सिंधपंजाब आक्रमणानंतर हळूहळू भेळेचें उच्चाटन होऊन भेळेला च्याट करूं पहात आहे. चौपाटीवर अग्रयावततरंगती उपाहारगृहें करण्याचा घाट घातला जात आहे. लवकरच भेळेसह चौपाटी राहिलीच पाहिजे अशी चळवळ करावी लागणार आहे. भेल–पुडी–रगडा-टिक्की वगैरे मंडळींची हकालपट्टी होऊं देतां कामा नये. वास्तविक त्या समुद्रकिनाऱ्यावर ज्या दिवशीं पहिला भेळवाला उतरला त्या दिवसापासूनच त्या किनाऱ्याची चौपाटी झाली आहे. भेळपुडी-पाणीपुडी ह्यांत पुरीचा उच्चार पुडी असाच झाला पाहिजे. पाणीपुडी ही सदैव उभ्यानेंच खाल्ली पाहिजे. भेळ वाळूंत बसून आणि कागदावर! टेबलावर बसून भेळ खाणें आणि ती सुद्धा बशींत




अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# दिवाळी

आजच्या प्रमाणेंच भावी काळांतहि दिवाळीचा आनंद निश्चितपणें उपभोगतां येईल अशी सोय करण्याची हीच वेळ. आपल्या कुटुंबियांच्या निरंतर सुखासाठीं आणि कल्याणासाठीं आजच शिल्लक टाकण्यास सुरुवात करा. आजच विमा पॉलिसी घेऊन आपली पत्नी आणि मुलें यांना कोणत्याहि परिस्थितींत कसलीहि ददात पडणार नाहीं याची व्यवस्था करा आणि निश्चिंत व्हा.



लाइफ इन्शुअरन्स कॉर्पोरेशन ऑफ इन्डिया

ASP/LIC/SP-28 MAR








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

घालून चमच्यानें म्हणजे सूटबूट आणि फेल्टहॅट घालून सत्यनारायणाच्या पूजेला बसण्यासारखें आहे. कांहीं अविचारी गृहिणी घरीं भेळ करतात. भेळ म्हणजे चणे कुरमुरे-कोथिंबीर आणि खजुराची चटणी यांचें मिश्रण हीच त्यांची कल्पना! भेळेला भय्याचाच हात हवा आणि तोदेखील चौपाटीवरच्या! चौपाटीबाहेरच्या नामवंत भेळवाल्यांची आम्हीं खूप नांवें ऐकलीं आहेत. त्यांची भेळ खाण्याचा प्रयत्नहि केला आहे. पण चौपाटीवरच्या त्या अनामिक भय्यांच्या हातच्या वाळूच्या कणाचीहि त्याला सर नाहीं असें आमचें स्पष्ट मत आहे! भेळ आणि भजीं ह्या स्वैंपाकघरांत करण्याच्या गोष्टीच नव्हे! कुचीपुडी, कथाकली किंवा दक्षिण देशींच्या कुठल्याहि चित्रपटांत नायक ह्या तीन्ही भूमिकांना योग्य दिसणारा असा हा मनुष्य विशेष संध्याकाळीं साडेचारच्या सुमारास क्षुधाशांतिगृहाच्या पायरीशीं बसून कढईत घाणा सोडतांना आसमंतात जो परिमल दरवळत असे तो दरवळ आपल्या स्वैंपाकघरांतून कधीं आला आहे का? प्रामाणिक आणि निर्भय पत्नींनीं हें जाहीर कबूल करावें! हीं कांदा-बटाटा मिस्स् भजीं भारतांत मुंबईशिवाय अन्य मिळत नाहींत. मिळालींच तर ह्या घराण्याची तालीम घेऊन गेलेला तो शिष्य असला पाहिजे!...क्षुधाशांतिगृहाचीं आरोग्यभुवनें होण्यापूर्वीच्या काळांतलीं हीं भजीं आहेत. पुढें भज्यांची गुजराती 'भजिया' झालीं. आणि मग कांदे आणि बटाटे ह्यांच्या जोडीला केळे मिरची वगैरेचे शह मिळूं लागले. पुढें त्यांचे बेंगरूळ 'पकोडे'हि झाले. आरोग्यभुवनवाल्यांनीं तेवढ्यांत मसलाशी करून बटाटापुरी नामक पदार्थ आणला. हा प्रकारहि खमंग खरा पण भज्यांचा इरसालपणा त्यांत नाहीं. 'तळणें' हें क्रियापद साजून दिसलें फक्त 'भजीं' ह्या कार्याबरोबर दुसरा आला तो बटाटावडा! हा शब्द शुद्धलेनाच्या उन्मादांत कांहीं लोक बटाटेवडा असा लिहितात. पण बटाटेवडा हा सुग्रणींच्या पुस्तकी स्वैंपाकघरांतला! खरा बटाटवडा! उगीच लावणीला लावण्यगीत म्हणण्याचा शिष्टपणा करण्यासारखें हें आहे. लसणाची चटणी आणि बटाटवडा आणि लहू कपांतला तो ताम्रवर्णी चहा हें पांचसवापांचच्या सुमाराला खाण्याचें प्रकरण आहे. ज्याला चावट खाणें म्हणून हिणवलें गेलें आहे, त्या खाण्याचा स्थळ—काळाशीं फार संबंध आहे. दुपारच्या चहाला बटाटवडा उपयोगी नाहीं. रेडियोवर पांचाच्या सुमाराला आरडणारा गायक भीमपलास किंवा मुल्तानी गाऊं लागला की बटाटवडा मागवावा. हीच वेळ भज्यांची. पण भजीं सूर्यास्तापर्यंत चालतात. पट्टीचे भजीं खाणारे गरम भज्यापेक्षां थंडावलेलीं भजीं पसंत करतात! अर्थात् हा रुचिभेदाचा प्रश्न आहे. चिवड्यांत ज्याप्रमाणें तळींचें तिखटमीठ त्याप्रमाणें भज्यांत परातींत उरलेलीं भज्यांचीं लेंकरें! त्यांनाहि एक स्वतंत्र स्थान आहे. बाकी पात्रा—खमण—ढोकळा वगैरे प्रकार जेवढ्यास तेवढेच पण ते सुद्धां 'आर्य' शब्दानें सुरू होणाऱ्या खाणावळींतच खावे! याला एकमेव अपवाद म्हणजे पिलाहाउस जवळचें रामभरोसे! तिथें एकेकाळीं कुंधियुं नामक सुरती प्रकार उत्तम मिळत असे. भेळेची रुची भेळवाल्याच्या स्वच्छतेच्या व्यस्त प्रमाणांत वाढते! आणि म्हणून स्वच्छ हॉटेलमध्यें भेळ खाववत नाहीं! फडांतली बाई हळदीकुंकू वाटायला उभी राहिल्यासारखी वाटते! भज्यांचेंहि तेंच आहे! हॉटेल जितकें कळकट तितकी तिथल्या भज्यांची क्वालिटी उत्तम हें मानून तिथें डोळे मिटून भजीं खावीं! स्वच्छतेचा निकष भजकाचा घाणा बिघडवतो! भजीं खावीं पावसाळ्याच्या दिवसांत!

### ते दिवस!...तीं 'सात्रां'ते 'हीट'

हल्लीं मला सुशिक्षित वर्गाचें भजीं खाण्याकडे दुर्लक्ष होत चाललेलें दिसतें. कारण इडली (ड पूर्ण) आणि दॉसाये (दॉ जरा दीर्घ) ह्या दाक्षिणात्य जुळ्या भावंडांनीं बरीच दंगामस्ती

**सिंह आणि तीन बैल** **ही-थाप नीति**



प्रबळ वनराजाच्या आक्रमक वृत्तीला सामना देण्यासाठी तीन स्वतंत्र बैलांनीं एकत्र येऊन संघ स्थापन केला व नेहमीं कुरणांत चरतांना एकत्रित रहायचें असें ठरवलें त्यांच्या ह्या एकजुटीमुळें त्यांच्या स्वतंत्र कमकुवतपणाला सामर्थ्य प्राप्त झालेलें पाहून जेव्हां सिंहाचे कांहीं चालेना. तेव्हां त्यानें गनिमी काव्यानें त्यांची एकजूट फोडण्याचे प्रयत्न सुरू केले. प्रथम त्यानें एकेकाची आमपशुसभेंत जाहिर स्तुती करून पाहिली. ह्या बारेमाप स्तुतीमुळें हुरळून गेलेल्या प्रत्येक वृषभश्रेष्ठीला नंतर त्यानें आपल्या कुहरांत सामुदायिक मेजवानीस स्वतंत्र निमंत्रण देऊन त्यावेळीं उरलेल्या दोघां बैलांची नालस्ती व अुद्दमनरकता विदित केली. कुणाच्या शिंगाचे कुणाच्या वशिंडाचे कुणाच्या खुरांचे तर कुणाच्या डौलदार चालीचें वैशिष्ट्य, ऐतिहासिक महत्व आणि सांस्कृतिक दर्जा रसपरिप्लुत वाणीनें सांगतानी वनराजानें इतर दोघांच्या हीन दर्जाशीं ह्या संघटनेनें कसा संकर होतो तेंही ठसवलें. ह्या शिष्टिमायांचे बीज कर्णोपकर्णी भिनतांच वृषभ संघटनेचे तीनतेरा होऊन लाथाळी सुरू झाली. पुढें ते तीन वृषभ कुरणांत वेळींभवेळीं एकटे चरूं लागले असतां सिंहानें एकेकावर झडप घालून आपली क्षुधा परिपूर्ण केली. व पक्षविसर्जन नैसर्गिकरीत्या घडवून आणलें.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

चालवली आहे. पण इडली ही गुंटकलच्या दक्षिणेलाच जाऊन खल्ली पाहिजे. भेळ जशी कागदावर तशी इडली केळीच्या पानावरच जमते. ही सकाळीं साडेआठाच्या आंत संपवण्याची चीज आहे. इडलीच्या घरंदाज मंगळुरी अवताराला 'सान्न' म्हणतात; आकारभिन्नत्वामुळें कारवारच्या बाजूस तिचा 'हीट' होतो. नारळाचा गोड रस आणि हीट ही जोडी कारवारकडे. श्रीखंडपुरीच्या तोंडांत मारून जाते. ह्याच वंशांत 'येराप्पा' जन्मला ह्याचा यल्लाप्पा हा मराठी अपभ्रंश झाला आहे. परंतु इडली किंवा डॉसाये यांचा सात्त्विकता हा स्थायीभाव आहे. भज्यांना जी एक तिरकस शृंगाराची बैठक आहे ती ह्या दाक्षिणात्य मंडळींना नाहीं. इडली-सांभार म्हटल्यावर मायसोर चंदनी अगरबत्तीचा वास नाकाशीं दरवळतो आणि डोळ्यापुढून सिद्धारूढ ते नित्यानंदस्वामीपर्यंत पाचपन्नास स्वामी चमकून जातात! भज्यांचा खाण्याप्रमाणें मारण्याशींहि संबंध आहे. परंतु आजकाल ही दुसरी प्रथा नष्ट होत चालली आहे.

चावट खाणें ह्या सदरांत भजीं, चिवडा, भेळ, पाणीपुडी हे मानाचे मानकरी आहेत. तसे मग इतर असंख्य पदार्थ आहेत. पण लाडू हा जसा पहिला मानकरी त्याचप्रमाणें खाण्यांतल्या चावटपणाची परंपरा एका अर्थी भज्यापासून सुरू होते. ह्या मंडळींतच 'मिसळ' नांवाची चीज आली. वास्तविक ही मिसळ म्हणजे भेळेची धाकटी बहीण पण ही कानामागून येऊन अधिक तिखट झाली. आणि हॉटेलांत प्रतिष्ठा पावली. पण उत्तम मिसळ ही पुण्याची! आणि तिच्या जोडीनें कोल्हापूरला गंगारामबापूंच्या हातची? आणि नाटकधंद्यांत अण्णा किर्लोस्करांचें जें स्थान तेंच मिसळींत माटेकराचें! आणि बापू म्हणजे देवल! माटेकराची मिसळ होती म्हणून नव्या पुलाचें महत्त्व वाढलें. अण्णांनीं नाटक संगीत केलें. छत्र्यांनीं चिवडा संगीत केला. पण चिवडा झणझणला तो गोदातीरीं मकाजीचा! ह्या चिवड्याची लुत्फच निराळा. शिळ्या भज्याला सर्वांत वरचें स्थान देण्याचें कार्य मिसळीनें केलें! दहींमिसळ ही मात्र मिसळीची अधोगति आहे! दह्यानें मिसळीचा अंगभूत सुगंध आणि स्वाद बिघडवला!

## सोलाची कढी ही माशांची पाठराखीण ...

खाणें ह्या विषयांत अराजक माजवणारी दुसरी गोष्ट म्हणजे पाककलेवरचीं पुस्तकें! पुस्तकांतलें नोटेशन वाचून गाणें शिकण्याचा प्रयत्न करण्याइतकें हें बावळटपणाचें आहे. पाककला ही गुरुमुखांतून आली पाहिजे. आधीं वरण, भात, भाकरी डाळवांगं, साधें मटण, बटाट्याचा रस्सा वगैरे साधेसाधे राग जमले पाहिजेत. लग्न होईपर्यंत बॅडमिंटन् खेळून त्यानंतर एकदम बायकांच्या मासिकांतलीं शेवटलीं पानें वाचून पान मांडतां येत नाहीं. ही तालीम आजी-आत्या-मामी वगैरें कडून घ्यावी लागते. पाव इंच आलें आणि दोन मिलिमिटर मिरच्यांचे तुकडे, पांच औंस अमूक आणि दोन तोळे तमूक अशा चाली पाठ करून जेवण तयार होत नाहीं. त्याला म्हणजे 'बरं एवढं डाळीचं पीठ घ्यावं-एवढीशी चिंच-उगीच थोडं आलं—' असली संथा मिळावी लागते. आणि मग 'बरं एवढं'— किंवा 'उगीच जरासं' ह्याचे अर्थ अंगांत भिनतात. हात नेमका पडतो. शिवाय 'नवा पदार्थ' हा नवा राग म्हणतात तसा फसवा आहे. ही जुन्याची निष्कारण मोडतोड आहे. अमका पदार्थ मधल्या वेळीं खायला चांगला हें वाक्य फजूल आहे. हें तो घड्याळाचें कामच नोहें. पोहे खाण्याचा मूड जमावा लागतो. तिखट सांजा 'हवा' ह्या भावनेचें वातावरण तयार होतें. काल रात्रीं डाळींत मुळा पडला होता कीं नाहीं याचें स्मरण ठेवून मुळ्याची कोशिंबीर टाळायची असते. इथें जाणिवा जिवंत हव्या! पान नंबर तेवीस आणि पदार्थ नंबर चोवीस ह्याला कांहीं अर्थच नाहीं. खाण्यांतले स्थायीभाव हाडीमाशीं पक्के भिनतात तेव्हांच अन्य विभाव-सहचरी नि व्यभिचारी भावांची जाणीव होते. सोलाची कढी ही माशांची पाठराखीण होऊन यावी लागते आणि ह्या साऱ्या खाण्याची एक लय जमावी लागते. पहिला भात-चपाती, पुन्हा माश्याच्या आमटीबरोबरचा भात आणि नंतर सोलाची कढी ह्यांतील प्रत्येक चीजेला किती वेळ द्यावा हें कळावें लागतें. हें पुस्तकांतून कसें कळणार? त्याला नित्य निरीक्षण आणि तोंडाबरोबर डोळे उघडे ठेवून केलेलें विविध भक्षण हवें.

## हाय! गेले ते दिवस

फारा वर्षांपूर्वी नळबाजारांत जुनी आरामखुर्ची विकत घेण्यासाठीं हिंडत असतांना गल्ली चुकून कुठल्या तरी रस्त्याला मी लागलों आणि हिंडतांहिंडतां आलों एका चांदभाईच्या भटारखान्यासमोर! तिथल्या बांकड्यावरून बसून खाल्लेल्या सामोशानें त्या सामोशाबरोबर मीहि विरघळलों! असाच एकदां चिंचपोकळीला मी कांदाबटाटा पातळभाजी आणि पाव खाऊन गेलों आहें! पावाचे सिलेस् बुडवण्यापेक्षां पातळ भाजींत पाव हातानें तोडून भिजवावा! पॅरिसमधें 'बूयावेस' नांवाचा एक स्पॅनिश प्रकार खातांना मला चिंचपोकळीच्या त्या हॉटेलची आठवण झाली! तिथें गणपती उत्सवांत




अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

एका मेळ्यांत मी पेटी वाजवायला गेलों होतों. पद नंबर एक ते पद नंबर सोळा वाजवून भलतीच भूक लागली होती. पूर्वी हॉटेलांना अकराचा नियम नव्हता. रात्रीं एकच्या सुमाराला ती पातळभाजी अशी कांहीं कांदा-बटाटालसूण आणि त्यांत वारंवार मिसळलेलें पाणी ह्यांत अशी कांहीं एकजीव झाली होती कीं त्या पातळभाजीवरून मी ते पॅरिसचें 'बूस्या वेसे' ओवाळून फेकून दिलें असतें! पाव आणि पातळ भाजी मिळून मी एक आण्यांत चैन केली ती एक हजार फ्रॅंक टाकून जमली नाहीं! शिवाय मेळ्यांतला पेटीवाला म्हणून हॉटेल मालकांनीं माझ्यासाटीं पुन्हां एकदां फोनोला चावी मारून 'ब्रिजलाला गडे' वाजवलें होतें! शिरवळच्या मोटार अड्ड्यावर फार प्राचीन काळीं एक 'डायवरांचे पेशल हाटेल' होतें. तिथें दोन आण्याला गरम भाकरी आणि मटणाचा रस्सा आणि दह्यांत घातलेला कांदा मिळे! बोरीबंदरांवर करीमकडे खिमा मिळत असे. जॉर्ज रेस्टारंट-मध्यें फिरनी मिळे. वेलणकरांकडे कंद! पार्ल्यांत पावनगडकरांचा चिलेरी--चिवडा! कोल्हापुरला दगडू बाळाकडला पेढा! नर्सोबाच्या वाडीला कवठाची बर्फी, नाना चौकांतल्या पुलाच्या पायथ्याशीं असलेल्या आद्यदाक्षिणात्याकडे आंबोळी—ह्याला डॉसाई म्हणत नसत! केळकरांकडे बटाटापुरी आणि केळ्याचीं भजीं! कूपरकडे धनसाक! पीअर्सचा पाव! किंवा कुठल्याहि युद्धपूर्व इराण्याकडे पावणा आणि ब्रूनमस्का! हा सकाळीं पहिल्या चहाबरोबरच खाल्ला तर त्याची किंमत कळत असे! आय-डियलचें पॅटिम्! आणि मेरवानकडे मावानी केक! दवाबाजारांत कचोरी! माहीम बाजारच्या नाक्यावरच्या हाटेलांत पाया! हा बाहेरच्या बाकड्यावर बसून पुढल्या संगमरवरी शिळेच्या टेबलावरच खावा लागतो!

### खाण्यांतलें कांहीं ऐतिहासिक...

खाण्याचा आसनाशीं फार संबंध आहे. पाटावरचें जेवण चांगलें आणि टेबलावरचें वाईट असा क्षुद्र विचार जातीच्या खाणाऱ्याला नसावेत! कांहीं गोष्टी तर चालतचालत खाण्याच्या आहेत. उदाहरणार्थ, चणेवाटाणे! हे कधींहि बसून खाऊं नये! उसाचें कांडें चालताचालतां तोडीत जावें! भेळ बसून खावी —पण पाणीपुडी आणि भेलपुडी उभ्यानें! भाजलेले शेंगदाणे वाटींत घालून एखादें पुस्तक वाचतां वाचतां पडल्या पडल्या खावे! मिठाई शक्य तितकी खाऊं नयेच—पण खावचीच झाल्यास खुर्चीवर बसून खाऊं नये! विलायती-वर बसून खावी.

खाण्याचा आसनाशीं तसा बासनाशींहि संबंध आहे. मत्स्यगोत्राचें दगडी भांड्याशींच सूत जमतें! आंबरस हा चांदीच्या वाटींतूनखावा! शिरा द्रोणांत! वरणभात तूप हे वेत केळीच्या पानावर, भेळ चक्क कागदावर! ॲल्यूमिनियमच्या डेकचींत पुलाव जमतो पण खातांना डिश हवी! ताक कल्हईच्या वाटींतून प्यावें पण करावें मात्र चिनीमातीच्या भांड्यांत! दूध मातीच्या लोटींत आणि पावड्या शिजवाव्या मडक्यांत! आइस्क्रीम वडाच्या पानावर उत्तम लागतें हें ज्यानें भय्याकडे चर्रर्र असा आवाज करीत कापलें गेलेलें आइस्क्रीम खाल्लें आहे त्यालाच पटेल!

शाकाहारी मंडळींना शाकान्न आणि शाक्तान्न जोडीजोडीनें कसें नांदतें हें कळणार नाहीं! तुरीच्या डाळीच्या सांबाऱ्याबरोबर भाजलेल्या सुक्या बांगड्याचा तुकडा काय विलक्षण साथ जमवून जातो! मटारींत कोलंबी आणि वांग्यांत


# विंटेर

कच्च्यावस्तूंत निसर्ग; हवेंत चावणारी थंडी; पर्णहीन झाडें; ओढ्याच्या शेकोटी भोवतीं जमून हात लांब करून अंगात ऊब घेऊन माणसें सुखावत आहेत.





तेंच उबेचें सुख तुम्हांला रॅटोज फॅब्रीकच्या टिकाऊपणाविषयीं प्रसिद्ध असलेल्या सैरा रगांनी मिळतें. आईच्या ऊबदार मिठीत बाळाला जें सुख मिळतें तेंच सुख तुम्हांला इथें मिळेल.

## सैरा रग्ज



चौकशी करा :

**द इंदोर मालवा युनायटेड मिल्स लि.**

मिल प्रिमायसिस, इंदोर (म. भा.)

रजि० ऑफिस : सक्सेरिया चेंबर्स, मेडोज् स्ट्रीट, मुंबई








अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

सोडे ! व्हिस्की-सोडा आणि वांगें-सोडा ह्या जोडींत श्रेष्ठ-कनिष्ठ ठरविणें कठीण आहे ! काळ्या वाटाण्याची किंवा मसूरची मसालेदार आमटी असली तर उगीच जोडीला कोलंबी किंवा ताजें बोंबील तळून पहावे ! स्वर्ग ताटांत येतो ! मटणांत बटाटा घरच्यासारखा येऊन बसतो ! पण कोंबडी एरवीं स्वतः शाकाहारी असली तरी पकवल्यावर तिला पालेभाजीचा सहवास चालत नाहीं. तीच गत हरभऱ्याची ! हरभरे आणि मासे यांचें जमत नाहीं. म्हणून पिठल्याच्या जोडीला मासेमटण चालत नाहींत. मसूर ही जातीनें शाकाहारी असली तरी वृत्तीनें सामिष ! नागपुरी वडाभात हा पुढें अख्खी दुगार झोपायला मोकळी असली तर खावा. आणि डाळबाट्या इंदूरी प्रकारांत बाटे हुकबून नुसती डळ ओरपतां आली तर पहावी. हरभऱ्याच्या डाळीच्या आमटीला तसें खास व्यक्तित्व नाहीं पण पुरणपोळीच्या प्रसंगीं ती जेव्हां 'कटांत' सामील होते त्यावेळीं कधीं कधीं पोळीच्या तोंडांत मारून जाते ! डाळीचा सर्वांत मोठा अपमान 'आंबटवरण' नामक पुणेरी प्रकारांत होतो ! द्विदलांत वाल हे श्रेष्ठ खरेंच पण गोव्यांतली 'फॅजांव' नामक चवळी वालाचा नक्षा उतरवून जाते ! बाकी कोबी-फ्लावर-नवल्कोल-आलकोल वगैरे विदेशी


व्हिस्की-सोडा श्रेष्ठ कि वांगे-सोडा श्रेष्ठ ?
असा प्रश्न पडतो.

मंडळी आतां इथें आसन स्थिरावून आहेत. कोबी-फ्लावर हे नवीन होते, त्यावेळीं फार ऐटींत होते. पण आतां मात्र कोबीचा पार बटाटा झाला. फ्लॉवर अजूनहि ऐटींत आहेत. हेहि कोलंबीबरोबर रंगांत येतात. भेंडी तव्यावरून ताटावर यावी. आणि शेवग्याच्या शेंगाचें नांव झाले असलें तरी डाळींत किंवा पिटल्यांतच त्यांनीं रहावें ! पण शेवग्याच्या कोवळ्या पालवीची आणि फुलांची भाजी मात्र लाजवाब असते ! तीच गत कोवळ्या बांबूची ! कोवळा बांबू ही चिनी-जपान्यांची मिरास नव्हे. गोव्यापासून खालीं मंगळूरपर्यंत "किल्ल" ह्या नांवानें तो खाल्ला जातो ! केळफुलाची भाजी चांगली जमली हें ती खाल्ल्यावर येणाऱ्या शिंकांवरून ओळखायचें असतें. बाकी सुरण, फरसबी कच्चीं केळीं, दुध्या आणि लाल भोपळा हीं केवळ ताटभरतीसाठीं असतात. लाल भोपळ्याच्या वेलीवरचीं कोवळीं पानें—पिवळीं फुलें आणि कोवळे देठ यांच्या भाजीच्या नुसत्या आठवणीनें कारवार-अंकोला भाग तरारून उठतो ! पुणेरी आणि तत्सम जेवण हे 'आमटी' ह्या प्रकारांत अत्यंत अनभिज्ञ ! त्यांना 'उडीद-मेथी' म्हणजे काय हें समजावून सांगणें म्हणजे व्हिस्की आणि पियूष (ही एक श्रीखंडाची धुवून काढलेली पातळ आवृत्ती !) ह्यांतला फरक समजावून सांगण्यापैकीं आहे. कढीची करी झाली हें सर्वांना ठाऊक आहे. 'उपकरी' म्हणजे काय तें कळायला मंगळूरपर्यंत जाणें शक्य नसल्यास मुंबईतल्या तालमकी वाडींत जाऊन यायला हवें ! बटाट्याच्या सुक्या पातळ-थलथलीत अशा प्रकारांचें विष्णुसहस्रनाम होईल. पण बटाट्याची सुकी भाजी केली गिरगांवांतल्या कुळकर्ण्यांनीच ! फार पूर्वी मुंबईची सकाळ ही 'जाडॅ अ मीट' झालें रे झालें कीं 'कांदी बट्टाटीय' ह्या आरोळीनें संपायची ! त्या बटाटीवाल्याकडे 'संसार बटाटे' नांवाचा आवळ्याएवढा बटाटा मिळे ! तो हल्लींचे शेतकरी पेरीत नसावे ! त्या गोळीबंद बटाट्याचा एक 'आख्खा बटाटा' नामक रस्सा होई ! आणि त्याचाच 'सॉंग्' नांवाचा तिखट-आंबट मंगळूरी प्रकार असे ! बटाटा ह्या गृहस्थाची कारकीर्द 'आख्खा बटाटा' 'सॉंग्' आणि कुळकर्णीकृत भाजी एवढ्या तीहींत संपला तरी तो चिरंजीव झाला असता !

•

## कांदा—एक चिंतन

बाकी मुंबईला जसा बटाटा कळला तसा पुण्याला कळलाच नाहीं. चक्क त्याला मधेच चिरून त्याचा उपयोग उदबत्त्या टोचायला केला ! हें म्हणजे कट्यारीच्या टोकाचा उपयोग दांत कोरायला करण्यापैकीं आहे. किंवा तलवारीनें शेपूची भाजी चिरण्यासारखें ! कंदमुळांत बटाटा फार श्रेष्ठ ! रताळें अगदींच वारकरी पंथांतलें ! आणि मुळा शिजतांना जवळ जाऊं नये ! मुळा कच्चाच खावा ! किंवा डाळींत फेकावा ! बटाट्याचा सावत्र भाऊ म्हणजे कांदा ! हा चिरतांना डोळे पाणावून जातो. पण वेडा गुणी ! शिष्टांनीं ह्याला धर्मबाह्य केला ! पण उद्यां जेवणांतून कांदा गेला की राहिलें काय ? भाकर ताजी अथवा शिळी आणि कांदा हें तर मराठा वीरांचें पूर्णान्न ! मला वाटतें शंभर मावळे कांदा खाऊन अंगावर धावल्यावर नुसत्या त्यांच्या मुखश्वासगंधानें मोगली फौजा चौखूर उधळल्या असतील ! वास्तविक बाटलेला मुसलमान जास्त कांदा खातो म्हणतात. म्हणजे कांदा उभयपक्षीं प्रिय होता ! कांद्याला उर्दूतला 'प्याज' हा मोठा मोहक शब्द आहे. बटाट्याला मात्र आलू हा शब्द शोभत नाहीं. 'बटाटा' म्हटल्यावर जे एक टग्याचें चित्र डोळ्यापुढें उभे रहातें तें आलू शब्दानें रहात नाहीं. कांदा चिरण्याचें सुद्धां कसब आहे. कोण-त्याशा संगीत घराण्याचे उस्ताद कांदा जाईच्या पाकळ्या सारखे चिरत म्हणतात ! डोळे मिटून चिरायची ही एवढी एकच वस्तु ! चिरायला अति अवघड असा प्रकार म्हणजे फणस ! हाताचीं बोटें खोबरेल तेलांत भिजवून घ्यावीं तेव्हां कुठें फणस चिरला जातो ! कच्च्या फणसाला कोंकणांत कुयरी म्हणतात. ह्या कुयरीची टेंचून आणि उकडलेले काळे वाटाणे घालून लसणाची झोंकदार फोडणी देऊन केलेली भाजी आणि पेज हा अस्सल कोंकणी थाट ! काळे वाटाणे उकडल्यावर तांदळाच्या कण्या घालून केलेल्या आंबाडीच्या भाजींत देखील काय चपखल जाऊन


फौंटनपेन करितां स्पेशल...
गोल्डन इंक
पाव आण्यांत १० दौती होणारी
गोल्डन शाई
ट्रेड  मार्क
गौतम शाई
ट्रेड  मार्क
नाग छाप शाई
गोल्ड शाई
वापरा !
गोल्डन इंक मॅ. कं. जळगांव पू. खा.






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

बसतात ! ही भाजी काल रात्रीं करावी आणि आज सकाळी ताज्या भाकरीबरोबर तिळेल तेलाची धार ओतून खावी ही घाटी मस्ती ! भाकरीला मिरचीची सोबत हवी. मग ती लसणाच्या ठेच्यांतून असो वा मटणांतून ! गरम भाकरी-संगे गूळतूप चालतें पण तें पोरंबाळांचें खाणें ! मिशीला पीळ भरल्यावर भाकरीबरोबर गुळचट कांहीं आलें की मिशीचा पीळच उलगडत जातो ! लसणाचा ठेचा हा तर बहात्तर रोगावर इलाज आहे ! ठेचा ठेवलेल्या भांड्यावरचें झाकण निघालें कीं ओसरीवर वासाची वर्दी गेली पाहिजे कीं धुवा हातपाय ! त्याला ठेचा म्हण-तात ! काळें तिळकूट असेल तर कांदा चिरून पडावा लागतो ! आणि शेंगदाण्याचें कूट असलें तर हिरवी मिरची पुढल्या दोन दातांनीं तोडीत भाकर मोडावी लागते ! भाकर खाणें—जाणून-समजून खाणें हें गोडीगुलाबीचें कामच नव्हे ! ती खाल्ल्यावर ग्लासांतून पाणी पिऊन भागत नाहीं गडवा तोंडाला लावावा लागतो. भाकर पोटांत गेली आणि गडवा एकदांचा रिकामा झाला कीं लगेच पोटाकडून ढेकरेची पावती आलीच ! मग पान जमवून दोन पिका टाकल्या की आडवं व्हायला मात्र डेरेदार आंब्याचा बुंधा असावा आणि आंथरायला कांबळं असावं ! भाकर आणि लसणाचा ठेंचा ही शिमिटाच्या घरांत खाण्याची गोष्टच नव्हे ! हुरडा जसा वर आकाश आणि खालीं चौफेर शेती ह्याच वातावरणांत खायचा-उसाचा रस जसा गुऱ्हाळावर प्यायचा—गाबुळल्या चिंचा जशा स्वतः तोडून तोंडांत टाकायच्या तशी भाकरी ही झाडाखालीं बसून खायची वस्तू आहे. महाराष्ट्र मुख्यतः भातखाऊ किंवा भाकरखाऊ ! पोळी-चपाती ही कांहीं खास आपली नसावी ! कारण मराठी जीव भातभाकरींत जसा रमून गेल्यासारखा वाटतो तसा कांहीं पोळींत वाटत नाहीं. कोकणांत तर रेशनिंगनंतर पोळ्या आल्या ! कारण मऱ्हाटी वाक्प्रचारांतदेखील डाळभात--भाकरतुकडा मीठभाकर असे प्रकार आहेत तसे 'चपाती खाऊन जा—' वगैरे नाहींत. सामान्यतः पोळीचा अर्थ तर पुरण-पोळी असा आहे. पुरी देखील आपली नसावी. श्रीखंड आपलें पण श्रीखंड-पुरी ही आपण नंतर जमवलेली जोडी आहे. गोड पदार्थांत शिरापुरी हा एक भयंकर प्रकार आहे. इतकी निर्बुद्ध जोडी वरिष्ठ सरकारी अधिकाऱ्यांच्या घरांत देखील सांपडणार नाहीं. त्यांतला तो शिराहि तूप खाऊन माजलेला आणि पुरीहि उगीचच फुगलेली ! शिरापुरीचा बेत म्हणण्या-पेक्षां शिरापुरीचा कट म्हणणें योग्य होईल. हे म्हणजे बासुंदींत वनपाव बुडवून खाण्याइतकें बावळटपणाचें आहे ! शिरापुरी ही अगदीं मासलेवाईक पेशवाई पोकळ ऐट आहे !

### ...आणि ही कांहीं ठसकेदार मंडळी

बाळबोध खाण्यांतहि कांहीं ठसकेदार मंडळी आहेत ! पैकी मेतकूट आणि खरें साजुक लोण-कढें-अगदीं घरीं हळदींच्या पानांत कढवलेलें तूप हवें. डांगरहि वेळींप्रसंगीं रंग जमवतें ! साबुदाण्याची खिचडी ह्या एकाच कारणास्तव मला उपास मान्य आहे आणि ऋषींच्या कुळा-इतकाच अगम्य भाज्या घातलेली ती भाजी असते म्हणून ऋषिपंचमी मंजूर आहे ! रताळीं चुलींत भाजून खावीं. एरवीं रताळ्याचें मला 'शकरकंद' हें हिंदी नांव आवडतें. बंगाली मिठाई ही बंगाली नांवासारखी—नांवापुरतीच खावी ! एरवी रोशोगुल्ला हाच स्थायी भाव ! मग त्याचा 'शोंदेश' होवो नाहींतर 'रोशमोलाय्' असो; बंगाल्यांना दूध दिसलें की प्यावें असें न वाटतां फाडावें असें कां वाटतें देव जाणे ! गुजरभोजन मात्र डाव-खोरें ! ताटांतल्या उजव्या बाजूच्या पदार्थांपेक्षां डाव्या बाजूचे 'आचार' चांगले असतात. पंजाबी माणूस अक्षरशः हातावरच्या पोटाचा ! खटियावर उजव्या हातांत छोले आणि डाव्या हातांत पराठा (उच्चारीं प्राठा !) घेऊन खातो. आणि मद्रासी जेवणाला तर कोपरापासून नमस्कार करावा लागतो. सारमचा ओघळ प्रकोष्ठाच्या मागल्या बाजूनें कोपराला येऊन भिडण्याच्या आंत हातांतला भाताचा चेंडू तोंडांत दडपून जिभेनें तो ओघळ वाटेंत पकडण्याचा द्राविडी प्राणायाम जमला तरच मद्राशी जेवण जमतें ! आणि ही सर्कस चालू असतांना बोलणें थांबवतां कामा नये ! टिफिन् कॅरियरच्या चार भांड्यापैकीं तीन

## आंबट द्राक्षें

## हि-साब नीति




एक भुकेलेला खादाड वृद्ध शृगाल एका फळबागेत गेला. तिथें वाटेंत मिळतील तीं फळें गट्ट करून तो पुढें मार्ग आक्रमित असतां त्याला एक मधुर व टचटचीत रसदार द्राक्षांची वेल मांडवावर दिसली. कोल्हा अनेकवेळा मांडवाखालून गेला होता पण कनातीवरची द्राक्षें काढणें त्याला सुलभ होईना. त्यानें कोलांटउड्या मारल्या, गडबडां लोळण्याचा उपक्रम केला. आकांडतांडवहा केलें. पण नैष्ठिक उपवासाच्या पुण्यफलाकडे त्याला कांहींच प्राप्त झालें नाहीं. अखेर कोणी बघत नाहीं व कांहीं लाभत नाहीं म्हणून तो निराशेनें परतला. कोणी जाणकारानें हें पाहून पृच्छा करतांच 'मांडवावर चढणाऱ्या ढोंगळ्यापासून त्या आंबट द्राक्षवेलीचें रक्षण व्हावें म्हणून आपली निस्वार्थी सेवा चालली होती' असें त्या बसक्या गालफडाच्या कोल्ह्यानें जाहीर केलें.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

भांड्यांत भात एका भांड्यांत अर्धा लिटर सारं, वरच्या झाकणांतल्या डबींत लोणचें आणि कागदांत चापडम्! द्रविड देशांत मिठाईत कापूर कां घालतात कळत नाहीं! कोणीतरी मला कापूर हा आरोग्याला बरा असें त्याचें कारण सांगितलें! उद्यां एखादी आरोग्यप्रेमी गृहिणी हें ऐकून कोकमाच्या सारांत पोटॅशियम परमॅंगनेट न घालो! भोजन ह्या विषयांत विशेष खोलांत न शिरलेला प्रान्त म्हणजे बिहार! सानूचें पीठ हा तिथल्या भोजनांतला स्थायी भाव! बिहारी मंडळी भाताचा ढीग उपसतात! त्यांच्यापुढें दाक्षिणात्यांचें भात खाणें म्हणजे अगदींच भातुकलींतलें! बिहारी लोक नुसत्या पोह्यालाच चिवडा म्हणतात. आणि युक्तप्रांती हिंदु हे दूध व दुधाचे पदार्थ या पलीकडे फारसे पहात नाहींत. बंगाल्यांनीं दूध फाडावें आणि ह्यांनी आटवावें! रबडी हा पदार्थ दोन चमच्यावर ज्याला पोटांत ढकलतां येतो त्याला कांहींहि पोटांत भरतां येईल. मथुरेची रबडी ही कशी दिसते हें मी अजूनहि पाहूं शकलों नाहीं. त्या भांड्यावर सहस्रावधि मक्षिकांचा कुंभमेळा जमलेला असतो. हलवाई हा मुख्यतः माक्षिकापालन करतो. मला वाटत माशा हाकण्यासाटीं 'तो सारखा हात हलवत असतो म्हणूनच त्याला हलवाई म्हणत असावेत. उत्तरेंत हलवाई आणि सौराष्ट्रांत फरसाणवाला! शेवगाठिया भाव-नगरच्याच! अमदाबादची 'जलेलीने पापडी! सुरती सुत्तरफेणी! आणि बदामी हलवा खास मुंबईतल्या 'बूढा काका' चा! तांबड्या कागदांत अनंत कागद गुंडाळून कागदाइतकाच पातळ असा खरा माहिमी हलवा मिळे तो गेला. तो माहिमी हलवा ही त्या हलव्याची भ्रष्ट नक्कल आहे!

दिल्लीच्या घंटेवाल्याची मिठाई शहाजहान बादशहाच्या दरबारीं जात असे एवढें ऐतिहासिक महत्व ध्यानांत घेऊन खायची! पण मिठाईवाल्याचें नांव जरा भरघोस असावें! मुसल्मानी मिटाईचा गव्हाचें सत्व हा स्थायीभाव त्याच्यावरील बदामपिस्त्याची पेरणी आणि गुलाबपाण्याचा शिडकावा हा महत्त्वाचा तर हिंदू मिटाईचा 'खवा' हा आत्मा! मुसलमानी मिटाईदेखील रंगानें छटेल. आणि ढंगानें मस्त-तर हिंदू मिठाई अगदीं प्रसादाइतकी पवित्र आणि जराशी मट्ठ! रबडीचा द्रोण पुढ्यांत घेऊन ओरपणारा एखादा रामदुलारे साध्या वे चोक किती ह्या प्रश्नाचें उत्तर देईलसें वाटत नाहीं. पण लखनौच्या बाजारांतले पिस्त्याचें पुरण भरलेली मलईची मुलायम पट्टी उडवणारा आशिकअली वे चौक किती ह्या प्रश्नाचें उत्तर नऊ असें देईल पण अशा थाटांत कीं त्या थाटांतच त्याला खरें अंकगणित कळलें आहे हें उमजावें! कारण त्या मिटाईला त्याच्या पोटीं अनेक नमकीन आधार आहेत! कोफ्ता कोर्मा ह्यांच्या हाजम्य साटीं म्हणून तो एखादी दूध की लोटी ठेवून देतो! रामदुलारे नुसर्तीच रबडी खातात! मिर्चीचा स्पर्श घडू न देतां केवळ दूध व दुधाचे पदार्थ खाणाऱ्या लोकांच्या बुद्धिमत्तेबद्दल मी सदैव साशक असतो!

परमेश्वरानें समुद्रांत मासे कांहीं मत्स्यालयांची शोभा वाढवी म्हणून केले नाहींत! कोंबड्या आणि कोंबडे काय पहाटेचा गजर म्हणून जगांत आले नाहींत! मिरची काय फक्त पोप-टाचें खाणें म्हणून केलें नाहीं! माणसानें काल्र्यापासून कुल्र्यापर्यंत आणि भेंड्या-पासून मेंढ्यापर्यंत आपली निवड करावी




अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

माझें खाद्यजीवन ह्या विविध प्रकारांनीं समृद्ध झालें आहे. परवांच मला कांहीं कारणानें डॉक्टरांचे पाय धरावे लागले! वास्तविक मी अगदींच अडलों होतों असें नव्हे! पण कोण्या गाफिल अवस्थेंत मी उगीचच 'चेक अप' करायला म्हणून डॉक्टर-कडे गेलों! आणि एका जागीं दोन बरे म्हणून दोघांकडे गेलों. एकानें गोड वर्ज्य करा म्हणून सांगितलें• आणि दुसऱ्यानें तिखट! मी पहिल्याचें ऐकून गोड वर्ज्य न करून तिखट स्वीकारले आणि दुसऱ्याचें मान्य करून तिखट वर्ज्य करुन गोडहि चालू ठेवलें! माझ्या न बिघडलेल्या प्रकृतींत भलतीच सुधारणा आहे असें दोघांचेंहि मत पडलें.

### मीं आणि आंबा...

मला माझी प्रकृति बिघडल्याचें निदान चटकन् होतें! चौपाटीवर जाऊन सुद्धां भेळ न खातां ज्या दिवशीं मी परत येईन त्या दिवशीं मी म्हणेन कीं आतां वय झालें, जपलें पाहिजे! आणि मग कदाचित् मला फलाहार करावा असेंहि वाटूं लागेल. आतां फळें खाल्लीं पाहिजेत असें वाटायला लागलें कीं वय होत आलें असें मानायला हरकत नाहीं. मोसमांत आंबे सोडले तर फळ ह्या गोष्टीशीं माझें जमलें नाहीं. त्याची नावड आहे असें नव्हे. आंब्यांत आंबा हापूसचा म्हणून मी खातों. पण मला सर्वांत आंबा आवडतो तो कारवारचा काळा इशाडद! त्या खालोखाल गोव्याचा माणकुराद. लंगडा-दशेरी हे उत्तर भारतीय लोक ठीक आहेत एवढेंच. फर्नांद कधींमधीं. पण आंब्याच्या आमरसापेक्षां आंब्यांच्या बारक्या घोटांचें 'सासव' हा प्रकार मात्र खायला कारवारी घरांतच गेलें पाहिजे. तीच गत कैरीच्या कारवारी लोण-च्याची! गोव्याचें रसबाळें केळें सोडलें तर केळ्यांत खायचें तें काय? शिकरण ही तर आयत्या वेळीं उपटलेल्या पाव्हण्याची बोळवा-बोळव आहे. संत्रीं नागपूरचीं आणि तीं देखील मोसमांत फारतर एक दोन दां! द्राक्षांत फकडीं बिनबियांचीं! सफरचंद केवळ ऐट म्हणून खायचें. अंजीर पुण्याला गेलोंच आहों म्हणून! शितापळ हें मात्र माझ्या आवडीचें! पेरुशीं माझें जमत नाहीं. बोरें आणि जांभळें शाळेंत असताना खाल्लीं तशीं पुन्हां लागलीं नाहींत. आणि पोपया हा फळांतला खाणावळीं-तल्या आमरसांत केवळ तोतया म्हणूनच उपयोगी! मोसंबी शक्य तितकी घरांत येऊं



लसणीच्या फोडणीची आंबाडीची भाजी स्वर्गांत कोठली? कांदा लसूण देवांच्या नशिबीं नाहीं?

नये याची मी खबरदारी घेतों. कारण त्या फळाचा आजाराशीं संबंध आहे. चिकू ही फ्रूटसॅलड नामक फळांचा चिखल करतात त्यांत केवळ रंग जमवण्याच्या लायकीचा! सफर-चंदाचेच नासपाती, बब्बूगोशा वगैरे चुलत-घराण्यांतले भाऊबंद आहेत. त्यांनाहि मी टाळतों. थोडक्यांत म्हणजे फळें आणि आरोग्य ह्या गोष्टींचें असें कांहीं नातें जमलें आहे कीं खाण्याच्या मैफलींत ही मंडळी केवळ आपला शिष्टपणा घेऊन मिरवतात.

—अजूनहि स्वयंपाकघरांतून लसणीच्या फोड-णीची पळी कशांत तरी जाऊन चुरचुरली—पाट्यावरच्या चटणीचा वास घुमला, चुलींतल्या राखेंत वांगडा बुसला, दाराशीं कणसें भाजणा-राची शेगडी पेटली—आंबेमोहराचा उकळता सुगंध दरवळला कीं आत्मा आणि कुडी हातांत हात घालून रिंगण धरतात! सारें ब्रह्म अन्न ब्रह्म होऊन विनटतें! आतां पळांचीं युगें होतात.

### इथें बुद्ध चुकला!

—माझी सुखाची कल्पना एकच आहे... आदल्या रात्रीं चार साडेचार वाजेपर्यंत गाण्याची मैफल रंगलेली असावी·सकाळीं दहा वाजतां उठून दोन वेळां चहा झालेला असावा...हवा वेताची गार असावी... हातांतली एखादी लेखकावरून जीव ओवाळून टाकावा अशी कादंबरी संपत आणलेली असावी...ती वाचून शेवटलें पान उलटतां उलटतां बारा साडेबारा व्हावे—आणि आंतून तव्यावर पडलेल्या सरंग्याचा तुकड्यानें साद घातल्यासारखा स्वाद घालावा—दोन मिनिटांत आंघोळ उरकेपर्यंत पानें मांडलीं जावीं आणि क्षणार्धांत आंबेमोहोर भाताच्या वाफेनें ताट खुलून यावें—यथेच्छ भोजन व्हावें—मस्त पान जमावें—इब्राहिमी जर्दा तोंडांत गिळता व्हावा. गार पाणी प्यावें आणि संध्याकाळीं पांच वाजेपर्यंत कुणींहि झोपेंतून उठवूं नये! कधीं कधीं देवाजी करुणा करतो आणि हें असें घडतेंहि! त्या दिवशीं मी इतका आनंदांत असतों कीं संध्याकाळीं बायकोबरोबर इमानी आणि सालस नवऱ्यासारखा फिरायला देखील जातों; आणि विश्वास ठेवा अगर ठेवूं नका तिला वेणी देखील घेऊन देतों! बुद्धाला ही सुखाची किल्ली सांपडती तर तो निर्वाणाच्या मागें लागला नसता! बोधिवृक्ष कधीं घरांतल्या तर कधीं बाजारच्या चुलीजवळ आहे हें शुद्धो-दनाचा मुलगा असूनहि त्याला कळलें नाहीं. कसें कळावें? त्या बिचाऱ्यानें सेकंड लॅंग्वेज् पाली घेतली होती आणि ओदन म्हणजे भात संस्कृ-तांत आहे पालींत नसावें! तें कळतें तर भाताचा ढीग आणि बांगड्याची आमटी ओर-पीत तो 'मत्स्यं शरणं गच्छामि' म्हणत म्हणत निर्वाणाप्रत पोहोंचला असता!

दाराशीं आलेल्या यमदूताच्या नाकांत जर झणझणीत लसणीची फोडणी गेली तर तो खाणारावरचा आपला हात निश्चित् खाण्यावर नेईल. स्वर्गांत अमृत असेल पण लसणाची फोडणी दिलेली अंबाडीची भाजी कुठुन असणार? कांदालसूण खाण्याचें भाग्य देवांच्या नशिबीं नाहीं! • • •




अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# ही अमूल्य देणगी

*शुभप्रसंगीं देणगी देण्याचा प्रसंग प्रत्येकाच्या आयुष्यांत कधीं ना कधी येतोच. अशा प्रसंगीं पोस्ट ऑफिस सेव्हिंग्ज देणगी कूपनें भेट द्या. इतर देणग्यामध्यें आणि या देणगीमध्यें फरक असा कीं, ही देणगी उत्तरोत्तर वृद्धिंगत होत जाते. ५, १०, ५०, १०० आणि १००० रुपये किंमतीचीं ही देणगी कूपनें पोस्ट ऑफिसांत मिळतात आणि नंतर त्याबद्दल १२ वर्षें मुदतीचीं राष्ट्रीय योजना बचत सर्टिफिकेटें मिळतात. या सर्टिफिकेटांवर आकर्षक दरानें प्राप्तिकरमुक्त व्याज मिळतें.*

पो स्ट ऑ फि स से व्हिं ग्ज दे ण गी कू प नें




**शुभप्रसंगीं द्यावयाची शुभभेट**












मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

आणि तसं कुठं तिचं लक्ष लक्ष्मीकडे गेलं पाखरासारखं अंग चोरून पोर कोपऱ्यांत उभी होती. डोळ्यांत आक्रान्ताची भीति. शरीर थरथरत होतं. अंगावर परकरच, पातळ सुटलं होतं. ब्लाऊजची बटणं अर्धवट सुटलेलीं—आणि लक्ष्मीला याचा पत्ता नव्हता.

# उबळी पेटते तेव्हां

श्रीराम कामत

अन्नपूर्णाबाईचा एक टराव होता. कांहीं झालं आणि कसंही असलं तरी वर्षाकाठीं आपल्या माणसांकडे निदान एखादी चक्कर मारायचीच.

खरं म्हणजे, तसं आपलं म्हणायला उभ्या दुनियेंत म्हातारीला दुसरं कोणी नव्हतं. आणि म्हणूनच कीं काय अख्ख्या गांवावरच ती अधिकार सांगून राहिली होती. हा तिचा दावा तसा चूक नव्हता. कपाळच फुटकं, म्हणून अन्नपूर्णाबाईचं तें तसं झालं. आणि तेव्हांपासून स्वयंपाकपाणी करून याच्या ना त्याच्या घरींच ती दिवस काढीत आली होती. गांवांत लोकं ही गोष्ट विसरली नव्हतीं. आणि समजा एखादा विसरलाच, तर म्हातारीनं खडसावून विचारलं असतं, "माझ्या हातच्या अन्नावर वाढलास, लहानाचा मोठा झालास आणि तसा ह्या बाईलाच विसरलास होय रे मेल्या!"

गांवाबाहेर अगदीं एकीकडे, नव्या रस्त्यावर भगवंतराव बाबांचा बंगला होता. बंगला म्हणायला—बाकी चाळच! कर्तबगारीचं आयुष्य पोष्टांत, रेल्वेंत, का अशाच कुठंतरी, सरकारकारणीं कामी आलं आणि आतां पेन्शनींत निघाले तशी आटापिटी करून त्यांनीं शिल्की कमाईतून ही इमारत उठवली होती. मागं लोकं कांहीं बोलली तरी भगवंतराव मात्र स्वतःच्या व्यवहार-ज्ञानावर निहायत खुष होते. आजूबाजूला त्यांचं लक्ष नव्हतं. कारणच काय?

आणि इतक्या दूर, कुठल्या कुठं उन्हातान्हांतून पायीं रखडत अन्नपूर्णाबाई एक दिवस भगवंतरावाच्या दारावर दत्त म्हणून उभी टाकली.

भरदुपार. रविवारचं खास उशीरां झालेलं जेवण. भरल्या पोटीं वाम कुशीवर भगवंतराव सुस्त घोरत होते. आणि तरीही लक्ष्मी या करनकरी सासऱ्याचे पाय चेपत बसली होती. पांडुरंग घरांत असलाच, तर आंत कांहीं कामांत असावा.

बाहेर दाराची कडी केव्हांपासून वाजत होती. आणि भगवंताच्या नांवाचा शंख चालला


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

होता. पण कसचं काय न् कसचं काय? भगवंतरावांना जाग नव्हती. आणि जागी असूनही लक्ष्मी जागची हलत नव्हती. तिला मुळीं ऐकूंच येत नव्हतं. बाहेर इतर बिन्हाडांना मात्र मोफत करमणूक मिळाली होती. तर्क आणि कुतर्कांना वेछूट वाचा फुटत होती. माथ्यावरल्या पदराच्या या म्हातारीला भ्यायचं त्यांना कारण नव्हतं. आणि लाजायचं तर त्याहून कारण नव्हतं.

एव्हढं मात्र खरं, भगवंतरावांच्या बाजूनं कोणी सुद्धां नव्हतं. एकजात सगळे भाडेकरू त्यांच्यावर नाराज होते. आणि फक्त नाराजच नव्हते तर वेळकाळ साधून ते तसले गलिच्छ आरोप करण्याइतकी त्यांची ही चीड वाचाळ होती.

ऐकून गप्प बसणारी अन्नपूर्णाबाई नव्हती. बारा घरचं पाणी प्यालेली बाई. उभा जन्म लोकांकडे तिनं रांधलं होतं, वाढलं होतं, त्यांचीं खरकटीं काढलीं होतीं. हातांतली काठी उगारून म्हातारी चक्क लोकांच्या अंगावरच आली, "छीः छीः! मेल्यांनो, काय बोलतां रे?"

"आजीबाई, अहो खरं आहे! आणि तेंच बोलतां." गॅलरींत कुणीसं मान उंचावून सांगितलं.

"हात मेल्या! एकदां सोडून देतें. पुन्हां बोललास तर याद राख. खेटरांनीं थोबाड सुजवीन. म्हटलं अन्नपूर्णाबाई आहे ही—अन्नपूर्णाबाई. माहीत नसेल तर गांवांत लोकांना विचार."

आणि तेवढ्यांत पांडुरंग दार न उघडता तर भगवंतरावांच्या चाळींतील त्या इब्लीस मंडळीला तिची अधिक ओळख झाली असती.

अन्नपूर्णाबाईला समोर दारांत बघून पांडुरंग म्हणाला "पुयणाजी तूं?

तोंड तसंच उघडं टाकून तो बघत राहिला. आनंद झाला कीं तसं उघड्या तोंडानं बघत रहायची पांडुरंगाला खोड होती. आणि बोलतांना मग तो अधिकच अडखळायचा.

त्याची पुरणाजी रागांतच होती. उसळून तिनं विचारलं, "म्हातारीला दारांत तिष्ठत टाकून कुठं मसणांत मेला होतास रे?"

"हो–होय, होय!" आंत का–कामांत होतों. "पांडुरंगानं सिधा जाब दिला. आपलं काम केलं. आतां या बोलण्याचा अर्थ लोकांनीं हवा तसा घ्यावा.

"म्हंजे? घरांत तूं कामं करतोस तर! आणि त्या—तुझ्या भावजया? मखरांत पुजून तर ठेवीत नाहीं ना त्यांना?" म्हातारीचा रोखठोक सवाल.

"त–त–त्या हिंथं नाहींत." पांडुरंगाचं अडखळत उत्तर.

"हिथं नाहींत?" असं कायससं पुटपुटत अन्नपूर्णाबाई आंत शिरली. आणि तसं क्षणाचीही फुरसद न करतां पांडुरंगानं दार लावून घेतलं.

"माहेरींच गेल्यात का काय रे?" म्हातारीची चौकशी सुरू झाली, "बाळंतपणा?"

"ना–नाही, पू–पूयणजी." पांडुरंगाची जीभ जाम अडखळूं लागली. "आ–आम्ही वे–वेगये झायोत."

"मेल्या, नीट तरी बोल. काय झालं म्हणालास?"

"वा–वा–वाटाणे." मोठ्या कष्टानं त्यानं शब्द पूर्ण केला आणि बोलतां येत नव्हतं तें विचारा हावभावांनीं स्पष्ट करूं बघत होता.

पण अन्नपूर्णाबाईचं लक्षच नव्हतं. ती म्हणाली, "वाटाणे? पांडुरंगा, तुझं मात्र वाटोळं झालं."

"वा–वाटोयं नाही. वा–वाटाऽ ऽ"

त्याला अर्ध्यावर तोडत म्हातारीनं म्हटलं. "पुरे कर बाबा! तुझं तत-पप सवडीनं ऐकतें मग. वड्या–बिन्या–"

"त–ते येगाय ना-नाहीत. आतां या घरांत नाहींत त-ते."

"गेले असतील बाबांना मिळा मारायला." तिनं नावसंतीनं म्हटलं.

आणि तसा पांडुरंग लाजला. उगाच कावराबावरा झाला. केस खाज-वीत इकडेतिकडे बघूं लागला.

"बाप तरी आहे का घरांत?"

पांडुरंगानं होकारार्थी मान हलवली. आणि फसाफसा पाय वासत अजागळासारखा तो आंतल्या खोलीकडे वळला.

अन्नपूर्णाबाईनं दारांतूनच साद घातली, "भगवंता—"

आणि ती दारांतच थांबली. म्हणजे तो प्रकार तिला नवीन होता. तिला कळेना. आंत जावं, न जावं पेंच पडला. चलबिचल झाली. फोडणी करपली, भात विरजला कीं व्हायचं तसं. जनाची नाहीं, मनाची लाज झाली. लक्ष्मीला म्हातारी ओळखत नव्हती. भगवंतरावांच्या घरांत तिला अन्नपूर्णाबाईनं पूर्वी कधींच पाहिलं नव्हतं.

राधाबाइचा एकलाईफसाईज फोटो फ्रेम करुन टांगला होता. भगवं-ताचं भाग्य दुणावून भरल्या कुंकवानं साध्वी गेली होती. पांच-सात वर्षं झालीं असतील. आषाढ नवमीला या फोटोला घातलेला हार सुकला होता, बाजूला लोंबत होता. कपाळीचं कुंकू पसरलं होतं, पुसून गेलं होतं. आणि भास देखील असेल—अन्नपूर्णाबाईला वाटलं—तिच्याकडे बघून वहिनी हंसल्या. समाधानानं, प्रसन्नपणं. वहिनींचा स्वभावच तो. होतं तें गोड करुन राहिली. मिळालं त्यांत सुख मानून घेतलं. नसल्याची हांव धरली नाहीं. प्राक्तनांतील भल्याबुऱ्या भोगांचा राग केला नाहीं. नाहीं, कधींही नाहीं. सगळं कसं समजून घेतलं, सहन केलं, मायेनं जतन केलं. पुढं दिवस बरे आले तरी राधाबाईचा स्वभाव होता तोच राहिला. आतां भगवंतराव स्वतःच्या पुरुषार्थाच्या बाता मारतोय खरा —मारूं देत! नाहीं तरी तोच त्याचा पुरुषार्थ! तें काय तें अन्नपूर्णा-बाईला माहीत होतं. होय, हें सगळं त्या पतिव्रतेच्या पुण्याईचं फळ! हा मेला भगवंता विसरला असेल! पण म्हातारी विसरली नव्हती, विसरूं शकत नव्हती. आणि ती अजून जिवंत होती. आणि तिच्या जिभेला तर हाडच नव्हतं.

कपाळावर हात मारून घेत म्हातारी ओरडली, "रांडेच्यानो, काय चालवलंयत हें?"

बाप जागा होईल या धास्तीनं पांडुरंग काकुळतीनं विनवूं लागला, "हू—हू प-पूयणाजी. ब-ब बाबा—"

"मेला तुझा बा. नांव नको काढूंस त्याचं." तिचा पारा चढत होता. "त्याशिवाय हे असले चाळे सुचतात माणसाला? आतां पेन्शनींत निघाले रावसाहेब आणि तशा दास आणि दासया हव्या झाल्यात हो अंग रगडायला. पांडुरंगा, कोण रे ही सटवी? मेल्यानो, एकापेक्षां एक तिघेजण कर्दनकाळ तुम्ही–या बयेला या घरांत कां थारा दिलांत?"

"पूयणाजी, ब-बायको आहे ती." पांडुरंग बोलला.

"अगोबाई म्हंजे, भगवंतानं लगीनसुद्धां केलं म्हणतोस! लगीन–हिच्याशीं. ही तर अशी काळतोंडी म्हारीण. अरे, आपल्या जातीची तरी आहे ना? आधीं विचारतें—आणि तूं न बये, ध्यानांत ठेव. ही अन्नपूर्णा तुला मानत नाहीं. माझ्या हिशोबीं भगवंताची बायको एकच-ती–ती मेली."

ज्या कर्माला पांडुरंग भीत होता तेंच झालं. म्हातारीच्या गहजबानं


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

भगवंतराव जागे झाले. तिरसटपणं त्यांनी विचारलं, "पांड्या, कोण रे ?"

यावर जाब दिला अन्नपूर्णाबाईनं. आणि खर्ज्या आवाजांत, "मी अन्नपूर्णा. आहे ओळख? का विसरला—विसरलास ?"

ओळख असावी आणि म्हणूनच भगवंतराव ताडकन् उठले, "बोडके तूं?"

"जळ्ळं तुझं तोंड मेल्या ! बोडकी म्हणायला लहान नाहीं राहिलास भगवंता तूं."

"म्हातारचळ लागलाय मला. माझीं दोन शहाणीं पोरंसुद्धां हेंच म्हणतात." आणि भगवंतराव खोः खोः हंसत सुटले.

"तें दिसतंच आहे. नाहींपेक्षां ही मोलकरीण—"

"ती मोलकरीण नाहीं. माझी सून आहे. या पांड्याची बायको."

"अरे माझ्या कर्मा!" अन्नपूर्णाबाईनं फाडफाड स्वतःच्या थोबाडींत मारून घेतल्या. बोलूं नये तें बोललें रे भगवंता."

"तुझा स्वभावच तो."

"मला तरी काय माहीत? कळवलं आहेस तूं? तुझ्या या पांडुरंगाचं बोलणं त्याचं त्याला देखील कळत नाहीं. आतां हिनं--तुझ्या सुनेनं तरी बोलायचं—"

"ती बोलणार नाहीं."

अन्नपूर्णाबाईनं उसासा सोडला. म्हटलं, "राधाबाई जित्ती हवी होती आज."

"ती असती तर हें लचांडच नव्हतं. ती गेली. आमचाहि आतां नेम काय व्हा? तर आतां या पांड्याचं पुढं कसं? मोठाच प्रश्न--" आणि तसं त्यांचं लक्ष पांडुरंगाकडे गेलं.

भगवंतरावांचा एक कायदा होता. पोरांसमोर या असल्या गोष्टींची वाच्यता करायची नाहीं. खरं म्हणजे, पांडुरंगाला हें कळायला हवं होतं कीं आपल्या संबंधानं गोष्टी चालल्या आहेत, तेव्हा इथं आतां आपलं काम नाहीं. बाकी कसाहि असला तरी तसा धोरणी होता पांडुरंग. पण आज त्याला काय झालं होतं कोण जाणे! कदाचित् पूरणाजीला बघून स्वारीचं चित्त ठिकाणावर नसावं! कारण कांहीं असलं तरी कटीवर हात घेऊन वेटा समचरणीं तोंड उघडं टाकून उभा होता.

हें बघून भगवंतरावांचं मस्तक फिरलं. कुत्र्याला हुडत् करावं तसे हात झाडत ते ओरडले, "पांड्या नीघ. तिथं उभा राहूं नकोस."

बिचारा! एवढंसं तोंड करून गेला. चेहऱ्यावर प्रश्नचिन्हं आणि तीं भिरभिरत होतीं. नजर गोंधळलेली आणि ती माशीसारखी गिरगिरत होती.

"एखाद्याला त्याच्या बायकोसमोर हिडीस फिडीस करूं नये, भगवंता. अशानं माणसाची किंमत रहात नाहीं." अन्नपूर्णाबाईनं मत दिलं.

माणसाची किंमत--आं! किंमत असेल ती मिळते. कमी किंवा अधिक. ज्याच्या त्याच्या लायकीप्रमाणं. आतां या रांधपिणीला हें काय न् कसं सांगायचं? आणि सांगून कळलं तर बरं! वायफळ बडबड भगवंतरावांच्या व्यवहारी स्वभावाला बिलकुल नापसंत होती.

"तेव्हां बोडके सांगायचं काय—तर ही माझी सून, लक्ष्मी." त्यांनीं रुबाबांत म्हटलं.

"एकदां ऐकलें, खूप झालें. आणखी कितीदा सांगणार आहेस रे? आणि केव्हांधर बघतें आहे—तुझी ही सून गौर कशी फतकल मारून आहे. वडिलधारी माणसं आम्ही. कांहीं विचारपूस, अगत्य? का सासऱ्याचे पाय धरून बसलं कीं सगळं झालं? हूंः! दुसऱ्या सुना नाहींत? पण रीतीला कशा? शिस्त काय?" म्हातारीनं तोंड सोडलं.

"अग, पण त्या त्यांच्या नवऱ्यांच्या बायका." भगवंतराव मोठ्यानं हंसले. तशा त्यांच्या फटफटीत हिरड्या दिसल्या. गालफडं हलूं लागलीं. "ही आहे माझी सून. मी लावीन ती रीत आणि घालीन ती शिस्त काय?"

डोंबल तुझं!— असं बोलायचं अन्नपूर्णाबाईच्या मनांत होतं. पण तिला हंसूंच कोसळलं. झपाटल्यासारखा होऊन हा भगवंता एकाएकीं मर्कटचेष्टा करूं लागला, हातवारे करीत सुटला. लक्ष्मीकडे बघून चक्क वांकोल्या दावूं लागला—आणि तें बघून म्हातारी हंसून हंसून मुडदा झाली.

आणि गंमत अशी, बाहुल चित्रागत निश्चल बसून होती पोर, भगवंतरावांची ही लक्ष्मी. पण आतां ब्रह्मांडाचं कोडं उलगडावं असं तेज फांकलं तिच्या तोंडावर. डोळे टकमक बोलके झाले. आणि एकटक अन्नपूर्णाबाईवर खिळून राहिले खोल, खोल अंतर्मनांत नव्हती ती ओळख पटली आणि ही सय दाटत गेली. आणि मग कवठी चाफ्याची कळी फुलावी असे लक्ष्मीचे ओंठ विलग झाले. ती खुदकन् हंसली. गोड, निर्व्याज, मनमोकळं. आणि मग पोर लाजेली, गोरीमोरी झाली. तशी उठलीच ती. लगबग पदर सावरत बाजूला झाली. खालमानेनं, शालीनतेनं. आणि—आणि अन्नपूर्णाबाई बघतच उभी आहे, तर तिच्या पायावर लक्ष्मीनं डोकं ठेवलं. पाय धूळ कपाळाला लावीत ती उठली.

म्हणजे अन्नपूर्णाबाईचा कंठसुद्धां दाटून आला, ऊर भरून आला. उशीरां का होईना पण तिच्या लक्षांत आलं. मनाच्या मनांत म्हातारी मीठ होऊन विरघळली.

जड आवाजांत तिनं विचारलं, "भगवंता, तुझी ही सून—"

"मुकी आहे—बहिरी आहे." भगवंतरावांनीं तिचं वाक्य पुरं केलं.

अन्नपूर्णाबाईनं जड निःश्वास सोडला. तिचा स्वर आणखीन पीळवटला. जाड घोगऱ्या आवाजांत ठाम श्रध्देनं तिनं आशीर्वाद दिला, "पोरी अष्टपुत्रा—"

पण भगवंतरावांनीं तिला अर्ध्यावरच तोडलं, "हा आशीर्वाद नको."

"आं! जळ्ळं तुझं तोंड!"

दिवाळी
व नवें वर्ष
सर्वांस
सुखाचें जावो
श्री आरोंदा केमिकल वर्क्स, मुंबई ४.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"तो तसा, ही अशी. यांच्या पोरांचं लटांबर तूं संभाळणार होय ग बोडके!"

सरळ साधा सवाल! विचारणाऱ्याला काळीजच नव्हतं. नाहींतरी या अशा बोलण्यावर गप्प बसणं बरं. तेंच शहाणपणाचं होतं...

नाहींतर भगवंता हा असाच! जळत्या सरणावर भाकर बडवून खाईल. एखाद्यानं विचारलंच तर आणीक वर म्हणेल, "पोट भरतं आहे ना? झालं तर! व्यवहार आहे हा—व्यवहार, काय?" हा असला व्यवहार करीत आलाय् चांडाळ. उभ्या जन्मांत दुसरं कांहीं केलंच नाहीं. फक्त तेवढाच एक व्यवहार–आणि व्यवहारच!

एक व्यवहार म्हणून या अर्धवट पांडुरंगाचं एका मुकीशीं लग्न करून दिलन् त्याचं, आणि आतां पुढचा व्यवहार म्हणून त्यांना मूलबाळ होऊं न देण्यासाठीं डोळ्यांत तेल घालून पहारा करीत होता. नको तें आधीं करून बसला. जिवंतपणीं आपल्या हातानं आपल्या इस्टेटीच्या वांटण्या करून मोकळा झाला. इन्कमटॅक्स का काय भरावं लागतं, त्यांत सूट मिळावी म्हणून हा खटाटोप. आणि मग पांडुरंगावरून भावजयांत धुसपूस चाललेली कानीं आली तसा चवताळला आणि मुलीच्या तपासाला लागला. त्यांतसुद्धां एकूण व्यवहारच पाहिला त्यानं. चारचौघींसारखी सरळ सून नको होती. थोटी, लंगडी, पांगळी, आंधळी करतां करतां अखेर ही मुकी पोर पसंतीला उतरली.—कर्म तिचं, कर्म पांडुरंगाचं! दोन्ही एकदमच ओढवलीं. आणि म्हणूनच भावकीला नवरा, वेतोबाला बायको आणि या भगवंतरावांना त्यांची सून मिळाली.

अन्नपूर्णाबाईचा फेरा या खेपेला जरा लांबला होता. दीडदोन वर्षांनीं येत होती म्हातारी. दरम्यान केवढी ऊलथापालथ झाली होती. पार सगळंच्या सगळं उलट न् पालट झालं होतं. कसं भरलेलं, गजबजतं घर. आठवण व्हायची फक्त एकच—राधाबाईची. त्याच घरांत ईन, मीन आणि बरोबर तीन माणसं आज वावरत होतीं. एक मुकी, दुसरा अर्धवट आणि तिसरा हा भगवंतराव—त्याची अक्कल तर उभ्या दुनियेनं ओवाळून टाकलेली.

आपल्याशींच अन्नपूर्णाबाई फडफडत, जळफळत होती. या मेल्याचं, म्हणजे भगवंतरावांचं, चऱ्हाट कधीं संपतयसं झालं होतं तिला. झालं होतं काय— तिला बोलतां येत नव्हतं. बरं बोलण्याचा प्रश्न नव्हताच. ती वाईटच बोलणार होती. चांगला झाडणार होती भगवंताला. मागचं पुढचं कांहीं कांहीं म्हणून शिल्लक ठेवणार नव्हती. पण गंमत अशी तिचा नाइलाज होता. तिचं तिलासुद्धां कबूल करावं लागत होतं कीं वाटतं खरं, पण त्याचं वागणं सरळ आहे, व्यवहाराला धरून आहे. म्हटलं तर बरोबरसुद्धां आहे.

आणि हीच गोष्ट म्हातारीला खटकत होती. वाटत होतं बरोबर, पण बरं मात्र वाटत नव्हतं. अर्थात कुठं कांहींतरी चूक होती. आणि तेव्हां सगळंच चुकत होतं, भलतंच होत होतं! हा तर सरळ नरकाकडेच चालला होता. पण एकटा नाहीं. बरोबर घरच्या चारचौघांना घेऊन. छीः! मोठा पराक्रमच करून राहिला होता? म्हणून ही हरएक बाब मेल्यानं चोपडींत नोंदवून ठेवली होती. आणि निर्लज्ज असा, आपल्या कर्मांचा पाढा आपला आपणच वाचून दाखवीत होता. आणि तोसुद्धां तिला–अन्नपूर्णेला. जसं तिला कांहीं माहीत नव्हतं. या भगवंताला जशी कांहीं ती ओळखत नव्हती. पोरांच्या शिक्षणावर प्रत्येकीं किती भूर्दंड पडला, त्यांच्या लग्नकार्यासाठीं काय पदरमोड झाली, लेकीच्या आणि सुनांच्या बाळंतपणावर, तसंच बायकोच्या आजारीपणासाठीं आणि नंतर










अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




नव्या वर्षाचे स्वागत!

नव्या वर्षाचे स्वागत करण्याचा आनंद कांहीं आगळाच असतो.
वस्त्रालंकार आपण नेहमीच खरेदी करतो. परंतु
नूतन वर्षानिमित्ताने करावयाच्या आधुनिक वस्त्रालंकाराच्या
खरेदीत कांहीं विशेष आनंद असतो. तो आपला आनंद
द्विगुणित करण्याची संधी सालोसाल आम्हांस देत आलाच आहात,
तशीच या नूतन वर्षानिमित्तानेही द्याल अशी खात्री आहे.

त्रिंबक, मोरेश्वर आणि कंपनी

वेस्टर्न इंडिया हाऊस समोर, लक्ष्मी रोड, पुणें–२

शाखा:- श्री गजानन क्लॉथ स्टोअर्स,
युनायटेड वेस्टर्न बँक बिल्डिंग, लक्ष्मी रोड, पुणें-२

उत्तरक्रियेला झालेल्या खर्चाची तपशीलवार जंत्री—इतकंच काय, वडलांच्या स्मरणार्थ जळ्ळया त्या सरणाला दिलेली देणगीसुद्धां भगवंतरावांनीं त्या काळ्या चोपडींत नोंद करून ठेवली होती. आणि ही चोपडी बड्या बंदोबस्तानं तिजोरींत ठेवून दिली होती. असं एकदम चोख काम होतं! म्हणजे पुढंमागं कटकट नको. विसरला तर? जगबूड यादची—वियची! घ्या काय?

ऐकलं, खूप ऐकून घेतलं आणि जेव्हां संपेचना तेव्हां म्हातारीनं विचारलं, "भगवंता, अरे मला काय करायच्यात या गोष्टी? नसता ताप!"

भगवंतरावांनीं जाब केला, "म्हटलं मी तूं काय कर म्हणून. काय करायचं तें मीं केलंच आहे. पण माझं काम हें असं एकदम चोख असतं, काय?"

"होय बाबा! नाहीं तरी कसं म्हणूं?"

"आणि बोडके तूं नाहीं म्हटलंस म्हणून मी ऐकून घेईन होय? अग, प्रत्यक्ष बापाला बाप नाहीं म्हटला मीं. तोंडावर चक्क सांगितलं, दादा लोकांवर विश्वास टाकून व्यवहार केलांत. मोठीच चूक. याचं प्रायश्चित्त तुमचं तुम्हांलाच भोगलं पाहिजे."

"देवमाणूस म्हणून साहेबांनी लोकांवर विश्वास टाकला. आणि आपण मात्र जन्मांतून उठले. कोर्टांत नादार झाल्यावर शरम शरम होऊन साहेबांनीं जी हाय खाल्ली ती—" अन्नपूर्णाबाई पूर्वीच्या आठवणींत बुडून गेली.

"आतां सांगूं नये, पण माझीच सजेशन—सूचना होती ती. मींच म्हटलं, आतां कोर्टांत जा आणि नादारी जाहीर करा दादा."

"मेल्या तूं?" म्हातारी तिरसट स्वरांत ओरडली.

"होय मीच. तुला काय वाटतं, ही अक्कल आमच्या दादांना होती? तुमचीं देवमाणसं हीं! व्यवहाराला नालायक, बिलकुल कामाचीं नाहींत. काय?"

"खरं तुझं. म्हणूनच जग चाललं आहे रे भगवंता!"

भगवंतरावांना ती स्तुतीच वाटली. उत्तेजित आवाजांत ते म्हणाले, "पण फक्त सूचना करून आम्ही स्वस्थ बसलों नाहीं बोडके. नोटीस देऊन बापाचा संबंध आधीं जाहीरपणं तोडून टाकला. ही अक्कलहुषारी तेव्हां केली म्हणून आज हे दिवस बघतों आहे. नाहींतर आमच्या इतर आज्ञाधारक बंधूंची जी अवस्था झाली तीच आमची होती. दोन टाइम जेवणाला सुद्धां महाग होतों—काय?"

"कशाला सांगतोयस? अन्नपूर्णेला आहे माहीत तुझा पराक्रम."

आणि तरीहि भगवंतरावांनीं सांगितलंच, "पराक्रम नाही. सरळ, साधा व्यवहार. काय? आणि तो केला नसता तर दादांच्या नांवें स्मशानासाठीं पांचशें एक रुपयांची देणगी कांहीं मी देऊं शकत नव्हतों."

बोलतां बोलतां एकदम आठवण होऊन भगवंतराव उठले. कोटटोपी घालून बाजारांत जाण्यासाठीं बाहेर पडले. आणि पुन्हा दारावरून मागं फिरले. जवळ येऊन खालच्या आवाजांत त्यांनीं अन्नपूर्णाबाईला सूचना दिली, "लक्ष ठेव जरा. या दोघांना फार जवळ येऊं देत नाहीं मी. पांड्याचा भरवसा नाहीं ग."

कितीतरी वेळ अन्नपूर्णाबाई तशीच एका जागीं बसून होती. तिथून उठावंसं वाटत नव्हतं. अवसानच गळल्यासारखं झालं होतं. सगळं कसं थंड थंड आणि जडजड वाटूं लागलं होतं म्हातारीला. उकिरडा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

नुसता ! खरकट्याचा आंबट वास आणि वर वळवळणारे जीव. छीः ! तिला उबग आली, ढवळून आलं पोटांत. कदाचा कदाांत जळ्ळा कांहीं अर्थ नव्हता !

आणि उशीरानं का होईना तिच्या लक्षांत आलं. पांडुरंग केव्हांचा तिचे पाय दाबत बसला होता. ध्यानांत आलं आणि तसं म्हातारीला भडभडून आलं.

"पांडुरंगा तूं ?" तिनं विचारलं.

"होय पूयणाजी. म्हातायी झायीस तूं. त-तुझे पाय दुखत असतीव."

'होय रे पोरा ! भारी फूट लागते. पण तुला कसं कळलं."

"आमाया कयतं—सगयं कयतं." पांडुरंग उत्साहानं सांगूं लागला, "आमचे पायदेखीय असेच दुखतात कीं ग."

"आणि मेल्या बायकोकडून दाबून घेत असशील ?" म्हातारीनं चेष्टेनं म्हटलं.

"हुडुत ! तिया नाहीं सांगत. मीच केयोसीन चोयत बसतों." आणि मग काय वाटलं देव जाणें. पांडुरंगानं खालीं मान घातली. जाम वर उचलेनाच.

अन्नपूर्णाबाई मायेनं त्याच्या पाठीवरून हात फिरवूं लागली. म्हणाली, "पांडुरंगा, सगळं जग बदललं. तूं मात्र होता तसाच राहिलास पोरा."

"योकं खुया म्हणतात मया, पूयणाजी."

"जळ्ळीं लोकं !"

"मी काय खुया आहे ?"

"तूं लक्षच देऊं नकोस."

"बायाासुद्धां म्हणतात." पांडुरंगानं तक्रार केली, "म्हणतात—"

"काय ?"

"असंच आणि तसंच. जाऊं दे ! पूयणाजी, माझं काम आहे—कयशीय ?"

पांडुरंगानं अशा आवाजांत विचारलं, अन्नपूर्णाबाईला रहावेनाच. उमाळा आला. उचंबळून म्हातारीनं त्याला जवळ ओढला, पोटाशीं धरला, तिच्या डोळ्यांत टिपं आलीं. कंठ दाटून आला. ती म्हणाली, "कां नाही ? अवश्य करीन. आणि मग मेलें तरी बेहेत्तर."

"पूयणाजी —"

"काय ?"

"पू-पूयणाजी—" पांडुरंग आतां अडखळूं लागला.

"सांग ना काय तें."

"पू पूयणाजी, त-तिया म्हणजे मा-माझ्या बायकोया हें-हें देशील ?" कासावीस होऊन त्यानं विचारलं. आणि मग लेंग्याच्या खिशांत हात घालून कांहीं तरी बाहेर काढलं. दुसरं काय ? ब्लाऊजच्या आंत घालायची एक बॉडी आणि केसांचं डोनेट. त्या वस्तू बघून अन्नपूर्णाबाई तर हंसूंच लागली

"हात् मेल्या ! हेंच होय ? वाटलं होतं हिऱ्याचीं कुडीं–बिडीं देतोस का काय बायकोला ?" तिनं चेष्टेनं म्हटलं.

"हिय्याचीं कुडी आहेत ग तिच्याजवळ. हेंच नाहीं."

"अरे पण हें दिलं कोणी ?"

"विकत घेतया आमी."

"आणि मेल्या ही बॉडी एकच, रोज घालायची म्हणजे दोन तरी हव्यात ?"

"आतां हें मया माहीत ? आवडयी तय आणीन दुसयी." पांडुरंगानं उत्साहांत म्हटलं.

"आवडली तर हां !" म्हातारी कौतुकानं म्हणाली, "आवडेल, आवडेल हो. आणि पांडुरंगा तुला देखील तुझी लक्ष्मी आवडेल. बघ तरी ! अशी नटवतें तिला, ओळखणारसुद्धां नाहींस."

अन्नपूर्णाबाईच्या मनानं एकदां घेतलं कीं मग–मग तें व्हायलाच हवं. उशीर झालेलासुद्धां खपत नसे तिला. मोगरीच्या दोन वेण्या आणि एक हार घेऊन येण्यासाठीं पांडुरंगाला तिनं बाहेर पिटाळलं. लक्ष्मीला जवळीनं आपल्याजवळ बसवलें. स्वतःच्या हातानं वेणीफणी केली. डोनेटवर केसांचं चक्कर बांधलं. बॉडी कां आणि कशी घालायची तें शिकवलं. आणि लक्ष्मी तयार नव्हतीच, तरी नवा ब्लाऊज आणि पातळ म्हातारीनं तिला नीटनेटकं नेसवलं, आणि हां हां म्हणत भगवंतरावांच्या सुनेचा एकंदर अवतारच असा बदलून टाकला.

पांडुरंग बाहेरून वेण्या न हार घेऊन आला आणि उघड्या तोंडानं बघतच राहिला. काकडी आवडायची त्याला. तशीच आवडायची श्रीखंडवडी. पण–पण–बायकोला बघूनच आज त्याच्या तोंडाला पाणी सुटलं. काकडी लुसलुशीत, टच—श्रीखंडवडी आंबटगोड मस्त. पण त्याची लक्ष्मी—आतां त्याला एक कमीच कळत होतं. पण ज्यांना कळतं असं त्याला वाटत होतं त्या त्याच्या दोन्ही वहिन्यांना देखील हें कळलं नव्हतं. एकजात दोघींचं चुकलं होतं. त्याची बायको सुंदर होती—खूप, खूप सुंदर ! काकडी नको, नको श्रीखंडवडी. अहो, पदरचे पैसे काढावे लागतात.

आणि तसा अर्धवट पांडुरंगसुद्धां बावचळला. काय न् कसं बोलायचं त्याला ठाऊक नव्हतं. आणि म्हणूनच तोंडाला येईल तें तो बरळत


दोघांसाठीं आदर्श जेवणाचा डबा
मिल्स कॅरियर



उत्तर भारतीय वा दक्षिण भारतीय पद्धतीचें जेवण किंवा कोणतेहि खाद्यपदार्थ ठेवण्या-साठी जास्तींत जास्त सोईस्कर व कमींत कमी खर्चांत वजनाने हलका, दिसण्यांत आकर्षक व स्वच्छ करण्यास सोइस्कर असल्यामुळे प्रवास अथवा सहलीच्या वेळीं उपयोगी. आंत सहा वाट्या, तीन ट्रे, दोन मोठे व दोन लहान चमचे येतात.

हें *क्राऊन ॲल्युमिनियम डिलक्स मिल्स कॅरियरचें* वैशिष्ट्य होय.

जीवनलाल (१९२९) लिमिटेड

क्राऊन ॲल्युमिनियम हाऊस, २३ ब्रॅबॉर्न रोड, कलकत्ता १

पो. बॉ. ५६२ मुंबई १ पो. बॉ. १३८९ मद्रास १

राजमहेंद्री, दिल्ली, एडन.

आमच्या प्रत्येक विक्रेत्याकडे मिळेल.






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

सुटला, "ट-टॉप, टॉप काम आहे ग पूयणाजी! एकदम टॉप–काय? झक मायतात शिनेमांतया नट्या! आ-आमची बा-बायको त्यांच्य:हून ब-बेस्ट, एकदम बेस्टच काय!"

"तुझं मसणं टॉप!" अन्नपूर्णाबाईनं त्याच्या फाजील उत्साहावर थंडगार पाणी ओतलं, सांगितलं, "हिथला निघ कसा. हातपाय धुवून ये आधीं. त्या राधाबाईंच्या फोटोला तेव्हढा हार तरी घाल मेल्या. पुण्यच लागेल!"

म्हातारीचं तोंड वाजत होतं. खुणा करकरून ती शिकवीत होती आणि मुकी लक्ष्मी त्याप्रमाणं करीत होती. तितक्यांत भगवंतराव बाजारांतून आले.

म्हणजे त्यांना पसंत पडणं शक्यच नव्हतं. नाराजीनं त्यांनी विचारलं, "बोडके, तिला हें काय नाहीं तें शिकवते आहेस?"

"ओटी भरून घेतें आहे—तिच्या सासूची."

"त्याबद्दल नाहीं म्हणंत. हा—हा तिचा अवतार."

"कां रे भगवंता? डोळ्यांत खुपतो तुझ्या?" अन्नपूर्णाबाईनं चिडून विचारलं.

"अग पण गरज आहे का याची. पांड्यांची ऐपत काय? ही एक बायकोच जड आहे त्याला. त्यांत हा नसता खर्च—गरम पडणार त्याला." भगवंतरावांनी व्यवहार सांगितला.

"डोंबल तुझं! पांडुरंगाला झेपत नाही, तर मेल्या तूं कर कीं खर्च. कळलं?" म्हातारीनं फणकाऱ्यानं म्हटलं.

रात्रौ जेवणं झालीं आणि भगवंतराव आपल्या पलंगावर आडवे झाले. बोलतां बोलतां त्यांचा डोळा लागला.

बापलेक आंतल्या खोलींत आणि लक्ष्मी बाहेर दिवाणखान्यांत एकटी झोपे. मधलं दार बंद•ठेवायची सक्त ताकीद होती.

लक्ष्मीला आज अन्नपूर्णाबाईची सोबत होती. म्हातारी बिछान्यावर पडली होती. आणि पांडुरंगाशीं इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत होती. तो तिचे पाय दाबीत होता. अधाशी डोळ्यांनीं लक्ष्मीकडे बघत होता.

ती आपल्या गादीवर सरळ उताणी पडली होती. आळीपाळीनं त्यांच्याकडे बघत होती. निर्विकारपणं, किंचित् नाराजीनं. तिला झोंप येत होती. पण असं झोंपतां तर येत नव्हतं. दिवा काढायचा होता. मधल्या दाराला कडी लावायची होती. नवरा उठण्याची ती वाट• पहात होती. पण त्याचीं कांहीं लक्षणं दिसत नव्हतीं. आणि-आणि तिला कळेना, यांना झालंय् काय आज? सारखं आपलं तिच्याचकडे बघत रहायचं म्हणजे? हें असं, वेड्यासारखं–विचित्रपणं! माणूसच होती कीं ती! होय माणूसच—

अखेर अन्नपूर्णाबाईनंच 'जा, नीज आतां' म्हणून सांगितल्यावर पांडुरंग नाइलाजानं उठला. आणि तशी लक्ष्मी पण .उठली. दाराला कडी लावायची होती ना? आणि चुकूनहि असेल, तिचं कांहीं लक्ष नव्हतं. पांडुरंगाचं लक्ष फक्त तिच्यावरच होतं. आणि तरीहि तिच्यावर तो आदळला. त्याच्या या वेंधळेपणाचं लक्ष्मीला हंसू आलं. असं दुसऱ्या माणसांवर आदळणं बरं का? हंसत तिनं त्याच्याकडे पाहिलं. होय कीं! खुणावून तो तिला सांगत होता–कीं–कधीं–ईश्श! कीं दार उघडंच राहूं दे. वा:! असं कसं करतां येईल तिला? दार लावून घ्यायलाच हवं—सासऱ्याचीं बोलणीं खायचीं कोणी?

हंसत हंसत लक्ष्मीनं दार आड केलं, कडी घातली. पण कडीचा आवाज ऐकून अन्नपूर्णाबाईनं तिकडे पाहिलं. म्हातारीला काय वाटलं

SUN
व्हॅक्युम फ्लास्क
सर्वांना परिचित
आणि
आवश्यक
दिवाळी भेट
अभिष्ट चिंतन
व्हिक्टरी फ्लास्क कं. प्रा. लिमिटेड
मुंबई, कलकत्ता. दिल्ली. मद्रास
SUN





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कुणास ठाऊक! ती उठली. कडी काढून मधलं दार उघडं टाकलं आणि म्हणाली, "हात मेले, कोण खातं तुला बघतें मी. मेल्यांनो, घरच्या घरांत देखील दारं बंद करून घेतां तें काय म्हणावं तुम्हांला?"

बराच वेळ म्हातारी जागी होती. रस्त्यावरून खडखडत एखादा टांगा जात होता. दूर कुठं तरी रेल्वेचीं इंजिनं कर्कश शिट्या घालीत होत्या. बाकी सगळीकडे सामसूम होती. आणि तीच अन्नपूर्णाबाईला खायला येत होती. काळोखांत कांहीं दिसत नव्हतं. दिसत होतं तें सुद्धां काळंच होतं. मिटल्या नजरेपुढं चित्रं सरकत होतीं. आठवणीचा कोळी जाळं विणीत होता—आणि अखेर याच जाळ्यांत गुंगून म्हातारीचा डोळा लागे. रोजचंच होतं. आतां या वयांत नाहीं तरी नीज ही अशीच यायची...

आणि म्हातारी जागी झाली ती दचकूनच. डोळे उघडते तर—म्हणजे हें आहे काय, चाललंय् काय?—तिला कळेना, तर्कसुद्धां करतां येईना. डोकं फिरलं तर नव्हतं या भगवंताचं? उगाच का वेताच्या काठीनं पांडुरंगाला तो मारीत होता? बैलाला बडवतात तसं. आणि तोहि अर्धवट पोर रडत होता, ओरडत होता आणि हा असा मार खात होता.

बघितलं आणि बघवेना तिला. ती ओरडत उठली, "हात् मेल्या! भगवंता सोड त्याला." आणि धडपडत म्हातारी धांवली. भगवंतरावांच्या हाताला झोंबली.

"बोडके, मध्ये पडूं नकोस. कारण नाहीं." भगवंतरावांनीं जाब दिला.

आणि पांडुरंगसुद्धां निखाऱ्यागत धगत होता. तो म्हणाला, "पूयणाजी, बा—बाबांना नको अडवूंस मयूं दे, मयूं दे मया! तेंच बयं. योकं म्हणतात बडल्यांना खाय्यं, बा-बायकोया खाय्यं. आणि आतां पोयाच्या मागं यागया आहे तो. मेया कीं सुटतीय हे..."

यावर भगवंतराव आणखीन उसळले. म्हातारीला हिसडयानं बाजूला करून पांडुरंगावर ते तुटून पडले. वेताचे सपासप तडाके हाणीत सुटले.

'मेयों मेयों, ओयूँ ओयूं' असं तो ओरडूं लागला.

"भगवंता, जीव का घेणार आहेस त्याचा?" अन्नपूर्णाबाई पिसाट बापाला आवरूं लागली.

"मरेना. मला नाहीं पर्वा."

"तुला नसेल. पण मी विचारतें, तुझ्या सुनेचं हें असं माझ्यासारखं करणार आहेस?" अन्नपूर्णाबाईनं खडसावून विचारलं.

आणि तसं कुठं तिचं लक्ष लक्ष्मीकडे गेलं. पाखरासारखं अंग चोरून पोर कोपऱ्यात उभी होती. तोंड फटफटीत, डोळ्यांत आकान्ताची भीति शरीर थरथरत होतं. अंगावर परकरच, पातळ सुटलं होतं. ब्लाऊजचीं बटणं अर्धवट सुटलेलीं—आणि लक्ष्मीला याचा पत्ता नव्हता. शुद्धच नव्हती. पोर भयानं वेडी झाली होती. केसांच्या झिंग्या ओरबाडत रडत होती.

कुणी न सांगतां एकूण प्रकार अन्नपूर्णाबाईच्या ध्यानांत आला. आणि तसं कोण जाणे कां म्हातारीला दुप्पट बळ आलं. भगवंतरावांचा हात धरणं आतां तिला जड गेलं नाहीं. त्यांना बाजूला केलं तिनं. बजावलं, "माझं मत भगवंता तूंच विनाकारण मध्यें पडला आहेस."

"तुला यांत काय कळतंय, बोडके."

"जें कळायला हवं तें. तुझ्या व्यवहाराला जें दिसत नाहीं तें."

"अग, अग पण—पण अशानं यांना पोरं होतील."


# आपला जीवन साथी



## बालपणांत

गरम हवेमुळें नाजुक बालकांची प्रकृति गरम होऊन सर्व अंगाची आग; डोकें, पोट, हातपायांचे तळवे गरम राहणें; अपचनाची व शौचाची रोजच्या तक्रारी, किडकिडीतपणा वगैरे हटकून दूर करणारा.



## तारुण्यांत

आधुनिक जीवनाच्या रोजच्या झगड्यानें तापणारी प्रकृती, होणारी शरिराची झीज व येणारा शारीरिक व मानसिक थकवा दूर करून उद्यांच्या झगड्यासाठीं शरीर व मन पुन्हा ताजेंतवानें करणारा.



## म्हातारपणांत

थकलेल्या भागलेल्या सर्व इंद्रियांना-विशेषत: पचनेंद्रियांना-प्रकृति नेहमी चांगली ठेवण्यासाठीं लागणारी सर्व तऱ्हेची मदत देणारा आपला जीवनसाथी.

शीतल, शक्तिवर्धक, आरोग्यदायक

# पर्ल काढा

आपण वापरा. सर्व औषध विक्रेत्याकडे मिळतो.

**पर्ल कंपनी, मुंबई-२७**







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




"होतील—होऊं देत! त्यांना जन्माला घालणारा तुझ्यासारखा फक्त व्यवहारच बघत नाहीं."

"जन्माला घालणं कठीण नाहीं, बोडके. पोसणं कठीण असतं. स्वतःचं पोट भरायची अक्कल नाही या पांड्याला—"

आणि पुढील दाराची कडी वाजल्याचा आवाज झाला म्हणून भगवंतरावांनीं दचकून पाहिलं. पण उशीर झाला होता. दार उघडून पांडुरंग एव्हांना बाहेर काळोखांत चालता झाला होता.

"जातो कुठं? मसणांत! बाहेर विचारणार आहे कोण याला?" भगवंतरावांनीं म्हटलं. आणि मग अवसान गळून तिथंच खुर्चीवर ते कोसळले. आणि तेव्हां लक्ष्मीच्या बिछान्यापाशीं पडलेल्या त्या वस्तूकडे त्यांचं लक्ष गेलं. ते उठले—उचलून ती वस्तु हातांत घेतली. उलटसुलट करून बघत राहिले.

"काय रे तें?" म्हातारीनं विचारलं.

"काय असेल तूं सांग?" त्यांनी उलट प्रश्न केला.

"काय कीं मला रांधपिणीला काय माहीत?"

"अग बोडके, पोरं होऊं नयेत म्हणून—"

"म्हणून काय?" अन्नपूर्णाबाईनं उत्सुकतेनं विचारलं.

"म्हणून वापरायची असते ही वस्तु. आतां तुला हें कसं माहीत असणार?" आणि भगवंतराव काळ्या हिरड्या दाखवीत हंसूं लागले.

"म्हंजे माझा पांडुरंग अर्धवट नाहीं तर."

"मोठा शहाणाच कीं नाहीं. अग बोडके, ही वस्तु मोफत मिळत नाहीं. चांगले पैसे मोजावे लागतात."

दुसऱ्या दिवशीं सकाळलाच अन्नपूर्णाबाईनं आपला मुक्काम हालवला. ती निघेस्तोंवर तरी पांडुरंगाचा कांहीं पत्ता नव्हता. पुढं तीनचार दिवसांनी तो लागला. रेल्वे लाईनवर, मुडकं गेलेलं धड छिन्नविछिन्न झालेलं अशा अवस्थेंत त्याचं प्रेत सांपडलं.

पण अन्नपूर्णाबाईला हें कळलं तीनचार महिन्यांनीं खुद्द भगवंतरावांनींच सांगितलं.

समोर रस्त्यांतच भेटले. त्यांचं कांहीं लक्ष नव्हतं. आपल्याच तंद्रींत होते. म्हातारीनंच हटकलं, "भगवंता, अन्नपूर्णेला ओळखलं नाहींस रे!"

तसं त्यांनी सांगितलं, "नीटसं दिसत नाहीं ग. फूल पडलंय डोळ्यांत. म्हणजे जिवंत आहेस तर तूं?"

आणि मग गोष्टी झाल्या. तेव्हा अन्नपूर्णाबाईला पांडुरंगाची ती बातमी कळली.

"बिचारी लक्ष्मी—तुझी सून रे! काय प्रसंग ओढवला पोरीवर."

"ती बिचारी? खुळी का काय? बोडके, अगदीं पक्की आहे हो ती. मुकी खरी, पण माझ्यासारख्यालाहि गप्प बसवते. आणि माझी सून राहिली नाहीं ती आतां." भगवंतरावांनीं माहिती दिली

"जळ्ळं तुझं तोंड! घराबाहेर काढलीस का काय तिला?"

भगवंतराव खो: खो: हंसत सुटले. हंसतच त्यांनीं सांगितलं, "मग लग्न करून टाकलं. आमच्या पांड्यानं रेल्वेखालीं जाऊन जीव दिला. आतां त्याच्या बायकोला काय विहिरींत लोटूं? लग्न करून टाकलं, बायको करून घेतली माझी. नाहीं तरी पैसे देऊनच मिळाली होती ती—ते पैसे काय फुकट जाऊं देईन मी..."

भगवंतरावांचं चऱ्हाट एकायला अन्नपूर्णाबाई थांबलीच नाहीं. मुकाट रस्त्याला लागली. बोलणार काय? कपाळ!

• • •




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



*स्वतःच्या दुःखाच्या कडेलोटाचें वर्णनहि संगीतांत सांगणारा रात्रंदिवस रतिरंगांत रंगलेला रंगलाल राजा—*

# अख्तरपिया

गोपालकृष्ण भोबे

जसें 'कृष्णाकांठीं कुंडल आतां पहिलें उरलें नाहीं' तसेंच नादाच्या गुंगींत, 'रहस'च्या झणत्कारांत, सुरांच्या धुंदींत आणि उत्तुंग विलासाच्या मस्तींत बुडून गेलेल्या अवधची रंगीत संगीत शान आतां किंचितहि उरली नाहीं. आतां राहिल्या आहेत त्या फक्त आटवणी. खोल जखमेच्या खुणेसारख्या. अवधचे आजचे नामधारी शाहजादे प्रदीर्घ उसासे सोडीत एक एक जुनी आठवण, त्यांत अनेक उपाख्यानें जोडून—वडिलार्जित हुक्क्यांच्या नळीचा ओठांशीं लपंडाव खेळत—घोळवून घोळवून सांगतात, तेव्हां दिवस कधीं बुडाला याची शुद्धदेखील राहात नाहीं.

शाहाजादा मिर्जा आतां विडीकाडीचें एक छोटेंसें दुकान चालवितो. आणि शाहाजादा फरेदून त्याच दुकानाच्या पायरीवर बसून साबण विकतो. मिर्जाच्या दुकानांत माल असा फारसा नाहींच; परंतु मिर्जा ज्या रुजामा अंथरलेल्या गादीवर आणि नक्षीदार फुलांची रेशमी ओढणी घातलेल्या तकियाला रेलून हुक्का पीत बसलेला असतो, त्या तिन्ही वस्तूंवरून लखनौच्या एके काळच्या वैभवाची कल्पना यावी. शाहजादा मिर्जाला गिऱ्हाइक असें फारसें नाहीं. हातांत हुक्क्याची नळी घेऊन, दुकानाच्या छताकडे नजर लावून, गतस्मृतींचें चिंतन करीत एखाद्या अजगरासारखा तो सुस्त पडलेला असतो; पण चिलमींतले निखारे विझत आले कीं त्याला फरेदूनची आठवण होते. मग तो पायरीला टेकून शाही रुबाबांत बसलेल्या फरेदूनला हांक मारून म्हणतात, "आवो मियाँ जरा हुक्का तो पिवो!" मग फरेदून मियाँ फुंकर घालून घालून निवलेले निखारे फुलवतो आणि गादीतकियाच्या स्पर्शाचें सुख घेत हुक्का पितो. मिर्जा एक हुंकार-युक्त दीर्घ निःश्वास सोडतो. आणि छतावरील नजर बिल्कुल न हालवितां म्हणतो—

"वक्त है मियाँ, कभी हमारे बाप-दादे शाही तख्तपर बैठ कर हुक्म फरमाते थे। और आज हम उन्हीं की औलाद तमाकू बेचते हैं।"

फरेदूनला महावत नाहीं. आपल्या मळकट लुंगीच्या सोग्यानें डोळ्यांतलीं आंसवें पुसत तो दर्दभरी आवाजांत उत्तरतो—

"खुदाको यही मंजूर था मिर्जा मियाँ। क्या किया जाय?"

मिर्जा आणि फरेदून. लखनौचे शेवटचे नबाब सुलतान वाजिदअलीशहाची ही औलाद. आपल्या राणी नंबर कितीचे हे मुलगे, हें खुद्द नबाबाच्या आत्म्याला देखील ठाऊक असेल कीं नाहीं खुदा जाणे. कारण नबाब वाजिदअली शाहांना कायदेशीर अशा सव्वादों राण्या होत्या. त्याशिवाय खासगी निवयाच्या अशा






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

साडेतीनशें नृत्यांगना होत्या. याहि सर्व राण्याच (खरें खोटें देव जाणे!) अर्थातच शाहांच्या शेंकड्यांनीं मोजल्या जाणाऱ्या या सर्व प्रजेनें नबाब म्हणूनच मिरवावें यांत नवल नाहीं. आज या सर्वांना सरकारकडून पेन्शन मिळतें. महिना पांचशें रुपयांपासून दोन आण्यांपर्यंत. प्रत्येकजण या पेन्शनसाठीं जीव टाकतो. आणि दिवसभर रंगांत राहून आपल्या वांट्याचे—दोन आणे कां होईना—वसूल करतो. म्हणतो—"सरकारनें हमारे बाप-दादोंसे जो कर्ज लिया था उसका सूद बहज्जत हमें मिलता है!"

अधिक करून यांतले बरेचसे शाहजादे टांगेवाले आहेत. अवधला गेल्यावर तुम्हीं एखादा टांगा ठरवा. आणि टांगा हांकणाऱ्याच्या शेजारीं बसा. हवापाण्याच्या प्रस्तावनेबरोबर सहज त्या टांगेवाल्याची चौकशी करा. तो टांगेवाला प्रथम चारुदत्तासारखा आकाशाकडे पाहून एक दीर्घ सुस्कारा सोडील आणि बोलतां बोलतां तिथलें सारें गतवैभव अशा घाटदार व रंगेल शब्दांत तुमच्या दृष्टीसमोर उभें करील, कीं क्षणभर तुम्ही स्वतःला विसरून जाल. तुम्हांला असं वाटेल, कीं एका स्वरेल नादाच्या वलयांत आपण विलीन झालेलों आहोंत. एक वलय विस्फारीत होऊन नजरेसमोरून सरकतें आहे. आणि अशीं कित्येक वलयें गेल्यावर लखनौची ती 'इंद्रसभा' आपल्याला दिसते. नखशिखांत हिऱ्यामोत्यांच्या दागिन्यांनीं मढलेल्या पंखांच्या पऱ्या, दोन रांगा करून, फुलांचे हार हातांत घेऊन चक्करदार फिरताहेत; एका बाजूला साजिंदे रंगांत येऊन साथ करताहेत; सारी सभा तटस्थ झालेली आहे. श्वास रोखले गेलेले आहेत; अशा वेळीं पऱ्यांच्या त्या समूहांतून गीताच्या रूपानें लयबद्ध अशी एक ललकार ऐकूं येते—

"जाने आलम रहस मुबारक। जुग जुग जियो सदा विराजो। अख्तरसंग सखी सहस मुबारक..........." ही ललकार झाल्यावर तबल्यावर त्रिपल्लवींतला एक सणसणीत चक्रदार वाजतो. आणि या चक्रदाराची सम गांठून मात्रेमात्रेवर पदन्यास करीत इंद्रराज प्रवेश करतात. हा इंद्रराज म्हणजेच लखनौचा बादशाह सुलतान वाजिदअली शाह उर्फ अख्तरपिया.

तबल्यावर मुखडे वाजत राहतात. समे समेला एक एक प्रमुख अप्सरा राजाच्या आजूबाजूला येऊन उभी राहते. रंभा, ऊर्वशी, मेनका यांच्या अंगावर रेलून, सुरेचे प्याल्यावर प्याले रिकामे करीत, आपल्यासमोर नाचणाऱ्या मस्तयौवना पऱ्यांना निरनिराळीं नृत्यनाटयें करायची राजा फर्माईश करतो. आणि राजानेंच रचलेलीं प्रेमगीतें गात गात आज्ञा होईपर्यंत तें उत्तान नृत्य चालूं राहातें. यानंतर इंद्रराज सिंहासनाधिष्ठित होतात. आणि गायनवादनाच्या मैफलीला आरंभ होतो. एक एक कलावंत पर्वताएवढ्या गुणांचा. हद्दू हस्सू खाँ ज्यांची गायकी चोरून शिकले ते बडे मोहम्मद खाँ, ज्यांच्या शिष्यांनीं घराणीं निर्माण केलीं ते तबलानवाज उस्ताद मोदू खाँ, ताजखाँ, सखावत हुसैन खाँ असे किती म्हणून सांगावे—आयुष्यभर तपःश्चर्या केलेले अस्सल वजनदार असे दीडशें कलावंत राजानें आपल्या पदरीं ठेवलेले. ते आपल्या कलेचें प्राणपणानें प्रदर्शन करतात. राजा धुंद होऊन ऐकतो. स्वतः अनेक फर्माइशी करतो. आपली इच्छा पुरी झाल्यावर कलावंतावर सोन्याच्या नाण्यांची खैरात करतो. रात्र संपते. इंद्रराजाचा दरबार बरखास्त होतो. उद्यांच्या मैफलीच्या अज्ञात प्रकाराचें आणि उजळणाऱ्या भाग्याचें चिंतन करीत कलावंत आणि कलावंतिणी निवासस्थानीं निघून जातात.

असें हें अवधचें संगीत साम्राज्य रात्रंदिवस अव्याहतपणें एका मादक कैफांत चालूं असतें. वास्तविक या अवधचे पूर्वीचे राजे असे नव्हते. कोणे एके काळीं म्हणजे २५० वर्षांहून अधिक कालापूर्वी मीर मुहम्मद अमीर नांवाचा एक हुशार आणि बुद्धिमान इराणी भारतांत आला. आणि त्यानें दिल्लीला आपलें बस्तान ठेवलें. त्याच्या दैवयोगानें एकदां बादशहा महम्मदशाह यांना होणाऱ्या अपघातापासून वांचविण्याचें श्रेय त्याला मिळालें. झालें. बादशहा प्रसन्न झाला आणि त्यानें या इराण्याला बुरहान-उल-मुल्क बहादुरजंग असा किताब देऊन त्याला अवधचा सुभेदार केला. त्यानंतर अनेक सुभेदार झाले. ज्यावेळीं मोंगल साम्राज्याचें पतन होऊं लागलें त्यावेळीं गाझीउद्दीन नांवाच्या सुभेदारानें आपल्याला अवधचा बादशहा म्हणून घोषित केलें. आणि तेव्हांपासून हें पहिलें सुभेदार घराणें बादशहा या नांवानें ओळखलें जाऊं लागलें. नबाब वाजिदअली शाह या घराण्याचा शेवटचा बादशहा १८४७ सालीं तो गादीवर आला. आणि १८५६ सालीं ब्रिटिश सरकारनें त्याला पदच्युत केलें.

वाजिदअली शाहानें अवघें नऊ वर्षेंच राज्य केलें; पण हीं नऊ वर्षें अवध आणि त्याच्या परिसरांत अक्षरशः संगीताचे पाट वाहिले. आपल्या दहा वर्षांच्या कारकिर्दीत या नबाबानें जें भोगलें, जो रंग लुटला आणि चैन केली त्याचें वर्णन 'जें न देखे रवि' तें पाहाणाऱ्या कवीला देखील करतां येणें कठीण आहे.

राजा जागा होई त्यावेळीं श्रुतिमधुर सनई वाजत असे. त्यानें शरीराचे आळोखे पिळोखे सतारीच्या बोलांच्या साथींत द्यायचे. त्याच्या जांभईला वीणेची साथ असायची. तो मंचकावरून उतरतांना वाद्यवृंद वाजत असे. त्याचा पदन्यास होतांना वेगवेगळ्या तालांत तबला वाजत राही. त्यानें नुसती मान वळवून जिथें स्थिर केली तिथें तबल्यावरचें परण बरोबर समेवर थांबे. आणि त्याचें वाक्य पुरें होतांना सुरसिंगारचा पलटा संपत असे. असा राजा संगीतमय झालेला होता. दिवसाचे चोवीस तास संगीत नी संगीत. अवधवर उगवणाऱ्या सूर्याचीं किरणें स्वरमंडल वाजवीत नगरांत प्रवेश करीत. जो जो दिवस उगवला तो तो संगीतांत मावळला. आणि अवधची पायांत पैंजण घालून ठुमकत ठुमकत आलेली रात्र छमछमाटाच्या नादांत केव्हां सरली हें कळत नसे.

राजा स्वतः उत्तम नर्तक तसाच गायक आणि वादकहि. त्या बाबतींतला त्याचा अधिकार








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

मी मी म्हणणाऱ्या कलावंतांनीं एकमुखानें मान्य केलेला. श्रीकृष्णचरित्र त्याला अत्यंत प्रिय होतें. श्रीकृष्णाचा वेष परिधान करून तो कृष्णासारखाच वावरत असे. सहा महिन्यांची रात्र करायची शक्ति त्याला नव्हती; पण सहा महिन्याच्या एकशें ऐशी रात्री मात्र त्यानें 'रास क्रीडा' केली. हिंदुस्थानांतल्या शेंकडों नृत्यांगना त्याच्या आश्रयाला येऊन राहिल्या. जी रूपवती त्याच्या विशेष पसंतीला येई तिला बेगम बनवून त्यानें आपल्या नाटकशाळेंत ठेवली. त्याच्या एकंदर ३६० नाटकशाळा होत्या. राजाच्या आवडत्या बेगमांना नृत्य-गायन शिकवायला ख्यातनाम उस्तादांची नेमणूक झालेली होती. या ख्यातनाम उस्तादांची यादी खुद्द राजानें आपल्या 'बन्नी' नांवाच्या ग्रंथांत लिहिलेली आहे. ज्यांचीं नांवें उच्चारतांच आजचे नामवंत नर्तक-नर्तकी कान पकडून आदर प्रदर्शित करतात ते गुलाम हुसैन, पीर खाँ, ताज खाँ राजाच्या आश्रयाला होते.

रास अथवा 'रहस' हें नृत्य-नाट्य राजाला विशेष प्रिय होतें "एक एक गौळण। एक एक कृष्ण। धरिलासे फेर मध्यें घालुनियां हरि।" असें हें 'रहस नृत्य' असे. या 'रहस' नृत्याला अफाट खर्च केला जाई. रहसनृत्याचा अवधि संपतां संपतां होळीचा सण जवळ येत असे. आणि त्या निमित्तानें 'होरी' खेळली जाई. कामुक चेष्टांना उधाण आलेलें असे. केवळ अत्तर, केशर आणि गुलाल या तीन वस्तूंचा त्या दिवसांतला खर्च पंधरा हजार रुपयांचा असे. (त्या काळांतला केशराचा भाव आजच्या मानानें किती कमी होता याची कल्पना करा.)

एकदां शहाला वाटलें वस्त्रहरणाचें नृत्य-नाट्य करूं या. मनांत यायचा अवकाश, कीं कारभाऱ्यांनीं लगेच सर्व सिद्धता केली. त्यासाठीं खास कृत्रिम तलाव निर्माण करण्यांत आला. त्याच्या काठावर एक झाडहि पुरण्यांत आलें. गोपी झालेल्या रूपयौवनसंपन्न कामिनी वस्त्रें काठावर ठेवून त्या तलावांत जलविहार करूं लागल्या. मग कन्हैयाचें रूप घेतलेला वाजिद-अली वाद्यवृंदाच्या साथींत दबकत दबकत त्या तलावाकडे आला आणि वस्त्रें हरण करून झाडावर जाऊन बसला. जलविहार करून थकलेल्या गोपी काठाकडे येऊन पाहतात तों वस्त्रें नाहींत. त्यांची नजर झाडावर गेली. कन्हैया तिथें बसलेला होता. आणि वस्त्रें


अ‍ॅटलास

स्टील फर्निचर



स्टील बुक-केस

४ खाने व प्रत्येकाला आंत सरकवितां येणारी काचेचीं तावदानें

आकार :—

६६" उंची × ३३" रुंदी × १२" खोली

७२" उंची × ३६" रुंदी × १२" खोली






सेल्व्हिन कपाटें

३ अ‍ॅडजस्टेबल खाने व काचेची तावदानें

आकार :—

७८" उंची × ३६" रुंदी × २०" खोली

अ‍ॅटलास



स्टील ईरा

शोरूम

८०/२५, नाना पेठ, क्वार्टरगेटजवळ, वाय्. एम्. सी. ए. समोर, पुणें २

मॉडर्न ऑफिस टेबल

आकार :—

७४" लांबी × ३०" रुंदी × २९" उंची

वर्कशॉप

प्लॉट नं. २०, मंगळवार पेठ, बारणे रोड, पुणें २.

फोन { शोरूम ३३३९ / वर्कशॉप ३६६८

TOM & BAY








अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

झाडाच्या फांद्यांवर लोंबकळत होतीं. मग त्या गोपींनीं परोपरींनीं विनंति केली. आणि मग कन्हैयाच्या इच्छेप्रमाणें नग्न शरीरानें कांठावर येऊन दोन्हीं हात वर करून त्यांनीं आपलीं वस्त्रें त्याच्याजवळ मागितलीं. राजानें त्यांना भरजरी वस्त्रें दिलीं.

स्त्रीवेषांत वावरावें, स्त्रीसारखें नटावें, मुरडावें आणि कांहीं दिवस स्त्रीजीवन जगावें असें एकदां शहांच्या मनांत आलें. आपली ही कल्पना त्यानें अल्पावधींतच मूर्त स्वरूपांत आणली कांहीं दिवस स्त्रीवेष घेऊन तो वावरला. एका नर्तकाला राजवेष देऊन त्याला त्यानें आपला पति बनविला. आणि राजा-राणीचे सर्व खेळ तो खेळला. कांहीं महिन्यांनीं या नकली राणीला दिवस गेले. सर्व राज्यांत आनंदोत्सव साजरा केला गेला. गर्भवती राणीची घेण्यांत येणारी सर्व प्रकारची काळजी आणि कोडकौतुकें राजगृहांतून व दरबारकडूनहि होऊं लागलीं. अनेक डोहाळ जेवणें झालीं. राजवैद्यांकडून वेळच्यावेळीं तपासणी होऊं लागली. कुमार कीं कुमारी जन्माला येणार यावर चर्चा सुरू झाल्या. पैजा लागल्या. आणि नऊ महिने पूर्ण होतांच बाळंतपणाहि झालें. परिणामीं काय झालें तें इतिहासांत नमूद नाहीं.

शेंकडों बायकांच्या विलासपर्यंकावर लोळणारा हा कामी बादशहा स्वतःच्या आत्मचरित्रांत मात्र स्वतःला ब्रह्मचारी ही उपाधि लावतो. स्वरसाधनेसाठीं महिन्यांतून एकदांच मी स्त्रीसुख घेत असें. आणि पुढें महिनाभर नृत्य–गायनाची साधना करायची असल्यामुळें मी संयम पाळीत होतों असें तो स्वच्छ सांगतो. 'सोळा सहस्र भोगुनि नारी। परि हरि हा ब्रह्मचारी' या कवींनीं केलेल्या कृष्णाच्या वर्णनाचा त्याच्या मनावर परिणाम झाला असल्यास न कळे.

या रंगेल राजानें एक मात्र निश्चित केलें. त्यानें नृत्य–संगीत फुलविलें. अस्सल कलावंताच्या गुणांची कदर केली. कलावंताला देतांना त्याच्या अंगांत कर्ण संचारे. छप्पर फाडून दिल्यासारखें तो देई. कलावंतावर त्यानें हिऱ्या–माणकांचा वर्षाव केला. वाजिद् अलीच्या राज्यांत गेलेला बाहेरचा कलावंत संतुष्ट होऊन परत आला. तबल्यांतले बनारस घराण्याचे जनक रामसहाय यांना सात दिवसपर्यंत तबला वाजवायला सांगून, खूष होऊन त्यांनीं ढोपरापर्यंत रुळणारे दोन रत्नहार, हजारों रुपये आणि दोन हत्ती देऊन त्यांचा गौरव केला. कलावंतांना राहण्यासाठीं अनेक सुंदर सुंदर महालें असलेली सुखसोयींनीं युक्त अशी 'कैसरबाग' त्यांनीं मुद्दाम बांधली. तसे त्या काळांत किंवा त्यापूर्वींहि कलावंतांना आश्रय देणारे आणि संगीताचे जाणकार असे अनेक संस्थानिक होते; कलावंत पदरीं बाळगणें ही त्यांची मिरास होती; पण वाजिद्अली शहाजवळ कलावंताच्या बाबतींत हृदयाची श्रीमंती होती. घराणेदार कलावंतासमोर आपलें राजेपण विसरून तो सदा नम्र होत असे. अकबरापेक्षांहि त्याची वृत्ति उदार होती. चांगल्या कलावंताला ऐकण्यासाठीं वाजिदअली देहभान विसरत असे.

घसीटखाँ नांवाचा एक गायक होता. स्वरसाधना करतां करतां तो त्यांत इतका विलीन झाला, कीं सामान्य लोकांचा त्रास होतो म्हणून गोमतीनदीच्या किनाऱ्यावर एका ओसाड जागीं झोपडी बांधून तो राहूं लागला. कोमल स्वरांच्या रागिण्या तो गाऊं लागला कीं ऐकणाऱ्याच्या डोळ्यांतून अश्रूंच्या सरी वाहात असत. अनेक रसांचा आविष्कार त्याच्या गळ्यांतून सहजगत्या होत असे. वाजिद् अलींच्या कानावर त्याची कीर्ति गेली. आणि त्याला ऐकण्यासाठीं राजा अगदीं आतूर झाला. त्यांनीं त्याला अनेक वेळां बोलावणें पाठविलें; पण घसीटखाँनें वेडेपणाचें सोंग पांघरून राजाच्या आमंत्रणाला दाद दिली नाहीं.

शेवटीं राजा एकदां वेष पालटून घसीटखाँकडे आला. त्यानें गोड गोड बोलून, लालचावून हळूहळू त्याला शहराकडे आणलें. आणि हळूच राजमहालांतहि त्याला घेऊन प्रवेश केला. राजानें त्याच्यापुढें पानतंबाखूचें तबक ठेवलें. आपण राजमहालांत आलेलों आहों हें बिचाऱ्या घसीटखाँना कळलेंच नाहीं. पान खातां खातां तो म्हणाला–"अरे मित्रा, तूं हा तंबाखू कुठून आणतोस रे? आणि हा चुना कसला? असा चुना मी जन्मांत कधीं खाल्लेला नाहीं! वाहवा! तुझ्याकडे खूप पैसे आहेत काय रे?" रात्रीं त्याच्यापुढें सोन्याची थाळी भरून जेवणाचे पदार्थ आले. त्यांतला एक एक पदार्थ खातां खातां घासीटखाँ म्हणतो—"मित्रा, अरे माझी एक मामी होती ती बटाट्याचा रस्सा हा असाच बनवायची रे!"

## दुखणेकरी सिंह

## ही-पाप निती



पशुसंघटनेंत एकाकी पडलेला एक दुर्बल सिंह भुकेकंगाल झाला होता. कुटिलनीतीनें भक्ष्य साधावें म्हणून आजारीपणाचें निमित्त करून गुहेंत तो दबा धरून बसला. त्याच्या चौकशीसाठीं तिथें जाणाऱ्या मूर्ख पशूंना त्यानें आत्मसात् केलें होतें. पण एका कोल्ह्यानें त्याचें हें सोंग ओळखून तो दुरूनच त्याची चौकशी करूं लागला. सिंहानें मायावी भाषेनें त्याला निकट येण्याची विनंती करतांच तो म्हणाला, "हे पशुश्रेष्ठा, तुझ्या ह्या गुहेंतून कोणी परतलेल्याचीं पावलें मला येथें उमटलेलीं दिसत नाहींत; तेव्हां दुरूनच तुला माझा प्रणाम."



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

बोलतां बोलतां त्याचा नूर पाहून राजानें त्याला हळूच गाण्याची फर्माईश केली; पण घसीटखाँ दाद देईना. प्रकरण अगदीं निकरावर आलें. तेव्हां राजानें नुसती टाळी वाजविली. त्याबरोबर पंचवीस तीस खड्गधारी शिपाई येऊन मुजरा करून राजाच्या डाव्या बाजूला उभे राहिले. आतां मात्र घसीटखाँनें ओळखलें, कीं जी गोष्ट आपण आजपर्यंत टाळीत होतों, तीच अनपेक्षितपणें आपल्यासमोर उभी राहिलेली आहे. तो घाबरला. आपण दुसरीकडे कुठेंहि नसून राजमहालांत आहोंत आणि आपल्याला आज्ञा करणारा समोर बसलेला पुरुष हा दुसरातिसरा कुणी नसून बादशहा आहे, हें त्यानें ओळखलें. त्याचा नाइलाज झाला. त्यानें साथीदार बोलवायला सांगून गायचें कबूल केलें. गातां गातां कांहीं ठिकाणीं त्याचे स्वर असे लागले, कीं ती स्वरसाधना पाहून बादशहा दिपून गेला. त्याच्या डोळ्यांतून घळघळा अश्रु वाहूं लागले.

गाणें संपल्यावर बादशहा म्हणाला—"घसीटखाँ, मी तुझ्यावर प्रसन्न झालेलों आहें. काय हवं तें माग." त्यावर घसीटखाँ म्हणाला—"हे बादशहा, तुला जर खरोखरीच मला कांहीं द्यायचं असेल तर फक्त एवढंच दे, कीं तूं फिरून माझ्या वाटेला कधींहि येऊं नकोस; कारण तुझ्यासारखे राजे पुष्कळ आहेत; पुढेंहि होतील; पण घसीटखाँ मात्र पुन्हा पुन्हा होणार नाहींत." असें म्हणून त्रिवार मुजरा करून महालाच्या उघड्या दरवाज्याबाहेर तो धांवत सुटला आणि अंधारांत नाहींसा झाला.

खरें कथक नृत्य वाजिदअली शहांच्या कारकिर्दींतच फुललें. कथक हा नृत्यप्रकार एकट्यानें नाचण्याचा मुळींच नव्हे. कथा एकानें सांगावी. दुसऱ्यानें निव्वळ बोल सांगावे. तिसऱ्यानें साथ करावी; आणि नर्तकानें फक्त नाच करावा. त्यानें बोलूं नये. दुर्दैवानें अशी संचपद्धति पुढें टिकली नाहीं. आजकाल पोट जाळण्यासाठीं या तिन्ही क्रिया एकट्यालाच कराव्या लागतात. गत-तोडा नाचून झाल्यावर आपलें थकलेलें शरीर नर्तक ध्वनिक्षेपकाजवळ ढकलीत आणतो आणि धापा टाकीत आपल्या पुढील आविर्भावांचें वर्णन करतो. तो गत तोड्याचे बोल म्हणून दाखवितो, अभिनय नृत्यांतलें कथानकहि सांगतो व हें सांगून झाल्यावर छातीचा भाता वरखालीं करीत पुन्हां सम गांठून नाचत राहातो; वाजिद अलीला या गोष्टी मुळींच पसंत नव्हत्या; किंबहुना असें एकट्यानें दाखविलेलें कसब त्याला आवडत नव्हतें. त्याचें म्हणणें या गोष्टी एकट्यानें करूंच नयेत. कथा सांगणाऱ्यानें कुशलतेनें कथाच सांगावी. आणि बोल सांगणाऱ्याजवळ गोड वाणीचें प्रभुत्व असावें. एका परीनें ही क्रिया सवाल-जबाबांसारखीहि होऊं शकते. म्हणूनच शहानें आपल्या पदरीं राहिलेल्या कलावंताला कशाचीहि वाण पडूं दिली नाहीं. त्याला अत्यंत सुखी ठेवला. मागेल तें दिलें.

बादशहानें अनेक शिष्य तयार केले; आणि असंख्य गीतें रचलीं. कांहीं गीतें 'मोहन-रसिया' व 'शाम' या नांवांनीं त्यानें केलेलीं आहेत. खानदानी ठुमरी-गायकांना तीं याद आहेत. "मोहन रसिया आये बगिया" "शाम बिन सजनी पिया ना धरो मोरा धीर" या सुप्रसिद्ध ठुमऱ्या वाजिद अलींनीं रचलेल्या आहेत. अख्तर पिया हें त्यांचें आणखी एक उपनांव; व हेंच नांव त्यानें आपल्या बहुसंख्य गीतांत गोवलेलें आहे. या नावांनें रचलेल्या कांहीं ख्यालांतल्या चिजाहि आहेत. सदारंग, अदारंग, मनरंग, दरसपिया, प्रेमपियाप्रमाणेंच अख्तर पियाचीं गीतेंहि संगीतांतल्या अक्षर वाङ्मयांत गणलीं गेलेलीं आहेत.

राजकारणाच्या डावपेचांत वाजिदअलीचें फारसें लक्ष नव्हतें. आपल्या या संगीत राज्यावर परचक्र येईल किंवा संगीतोत्सवासाठीं लागणाऱ्या खर्चाची यादी कुणाला दाखवावी लागेल याची त्याला फिकीर नव्हती. इथें नृत्यागारें आणि निशागारें चोवीस तास फुललेलीं असत. प्रजेला फक्त एकच उद्योग; जथ्या-जथ्यांनीं हे संगीत-भोग भोगायचे. सारें अवध रतिरंगरंगांत रंगलेलें. जळीं-स्थळीं सर्व ठिकाणीं एकच गोष्ट होती. नृत्य आणि संगीत. जणुं तो एक नृत्य-संगीताच्या यागच चालू होता. पण काल फिरला. हें सर्व वातावरण केव्हां एकदां आपल्या उदरांत गडप करतो याची त्याला हुरहुर लागली.

अवधच्या राज्याबाहेर इंग्रज नांवाचे कुणी प्राणी हिंदुस्थानचे सम्राट होऊं पाहात होते. नव्हे जवळजवळ झालेलेच होते. इतरांप्रमाणें अवधकडूनहि ते कांहीं कोटींची खंडणी वसूल करीत होते. अवधच्या बेसुमार धुंदीला उत्तेजन देऊन राजाला नालायक ठरविण्याची संधि पाहात होते. आपल्या हक्कांवर गदा आणणाऱ्या या इंग्रजांविरुद्ध बाहेर बंडें चालू होतीं; पण अवधच्या राजाला त्रिपल्लवीच्या बोलांच्या नादांत त्याचे पडसाद ऐकू आले नाहींत. त्याला ते ऐकू जाऊं नयेत अशी इंग्रजांनीं व्यवस्थाहि केली होती. मांजर जसें उंदराला खेळवून मारतें तसे हे इंग्रज हिंदुस्थानांतील अशा संस्थानिकांना खेळवीत ठेवत असत. अवधकडून त्यांना आणखी संपत्ति हवी होती; पण संस्थानचें उत्पन्न आणि नाचरंगाचा बेसुमार खर्च यांत बरीच तफावत दिसून आल्यानें 'तूं नाहीं तुझा बाप' या आपल्या नेहमींच्या नीतीप्रमाणें इंग्रजांनीं अवधवर वक्रदृष्टि वळविली. आणि राजाला शासनकार्यांत नालायक ठरवून अवधची गादी सोडायला भाग पाडलें.

आणि अशीच एक दुःखितं सकाळ. अवधच्या बादशहाच्या लाडक्या कलावंतांचा दरबार भरला होता. नित्याप्रमाणें संगीतांतच ललकार झाली. जणुं इंद्रराज आल्यासारख्या फुलांचे हार झेलवीत पऱ्या नाचूं लागल्या. बादशहा दुःखित होता. त्यानें हात वर करून तें नाचगाणें थांबविलें. वास्तविक—'मित्रहो, आज तुमच्या बादशहाला तख्तावरून ओढून काढण्यांत आले असल्यानें, अत्यंत दुःखित मनानं, मला तुम्हांला सोडून जावं लागत आहे. यापुढें तुम्ही सर्व लोक तुमची सोय पाहा!' एवढ्या शब्दांत आपल्या आश्रयी कलावंतांना सर्व परिस्थितीची जाणीव—बादशहाला करून देतां आली असती; पण अवधचा बादशहा इतका रुक्ष नव्हता. त्यानें वादकांना इषारा केला. सर्व वाद्यांतून एक स्वरेल झंकार निनादला. आणि त्या झंकारांत आपला व्यथेनें भरलेला सूर मिसळून बादशहानें भैरवी ठुमरी गायला सुरुवात केली. सगळ्या कलावंतांचे कान टवकारले. अक्षरें टिपून घेऊं लागले—

**"बाबुल मोरा नैहर छूटो ही जाये ॥ ध्रु ॥**
**चार कहार मिले । दुनियाँ सजाये ।**
**मेरो अपना बेगानो छूटो जाय ॥......"**

ती ठुमरी संपल्यावर आसूंभरल्या डोळ्यांनीं साऱ्या कलावंतांनीं आपलीं वाद्यें खालीं ठेवलीं; व माना खालीं घालून स्फुंदस्फुंदून रडत कांहींहि न बोलतां ते दरबाराच्या बाहेर पडले.

पुढें इंग्रजांनीं या बादशहाला कलकत्याला नजरकैदेंत ठेवलें. त्याच्या तैनातीला कलावंतांऐवजीं हिजडे ठेवले. त्याच्या सर्व रंगांना बेरंग करून टाकलें. वाजिदअली शहाची राणी बेगम हजरत महल हिनें—झांशीच्या राणीसारखें—इंग्रजांविरुद्ध लहानसें बंडहि केलें; पण हा सारा भैरवी नंतरचा इतिहास आहे. तो सुरेल नाहीं. त्यांच्यांत संगीत नाहीं. रतिरंग नाहीं. तो शुष्क आहे; रुक्ष आहे. अवधच्या संगीत राजाचा—अख्तरपियाचा—इतिहास त्या भैरवी ठुमरींत संपतो आणि डोळ्यासमोरुन उमटत जाणारीं तीं रंगीत संगीत इतिहासाचीं वलयें तिथेंच विराम पावतात. • • •

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

*मागच्या पिढींतील हीं कोंकणचीं माणसं. कांहींशीं उंटाच्या चालीसारखीं. तिरक्या भाषेची. तिरक्या चालीचीं. वरून खडबडीत आंतून रसाळ, आजचे मान्यवर विनोदकार* **श्री. जयवंत दळवी** *यांनी बालपणीं त्यांना पाहिलं. आणि आपल्या शैलीदार भाषेंत इथं त्यांना साकार केलं....*



# एकाहून एक नग आहेत नग!

शाळेंत जसजसे दिवस गेले, महिने गेले, वर्षें गेलीं तसतशी शाळेंत जाण्यांत सुद्धां गंमत वाटूं लागली. हेडमास्तर बागाईतकर आणि असिस्टंट मास्तर अमृते हे दोघेहि तसे आपापल्या परीनें बरे होते. शाळेच्या एका मोठ्या हॉलमध्यें आमचे सात वर्ग भरत असत. हे दोन मास्तर मेंढ्या पाळत बसल्यासारखे शाळेंत बसत असत. समोरासमोर बसत असत. पण दोघेहि एकमेकांच्या फंदांत फारसे पडत नसत. बागाईतकर मास्तर तर शिकव-ण्याच्याहि फंदांत फारसे पडत नसत. अमृते हा तरुण कच्चा पोर आहे म्हणून त्याच्यावर तेवढें ते मधूनमधून लक्ष ठेवीत. तशांतहि अमृते खादीचे कपडे घालीत. त्यामुळें हा बंडखोर स्वातंत्र्यवीर असावा अशा संशयी नजरेनें बागाईतकर त्यांच्यावर नजर ठेवीत असत. बाकी तुम्ही कांहींहि करा. नाहीं म्हणा-यला सकाळीं प्रार्थनेच्या वेळीं 'भो पंचम जॉर्ज भूप धन्य' हें गीत ते आमच्याकडून अत्यन्त गंभीरपणें म्हणवून घेत. त्यांच्या मेजाच्या बाजूला पंचम जॉर्जचा दरबारी पोषाखांतला भला मोठा रंगीत फोटो होता. त्या फोटोचें आपल्याला संरक्षण करावयाचें आहे असा प्रामाणिक समज करून घेऊन ते त्या फोटोच्या बाजूला उभे रहात. खरोखरीच भो पंचम जॉर्ज शाळेंत आले आहेत असें समजून ते कोटाचीं सर्व बटणें लावून घेत. कृतज्ञतेनें व लाचारीनें बिचारे हात जोडीत. आणि मग गंभीर चेहरा करून गळ्याच्या शिरा तणतण ताणीत ते स्वतः 'भो पंचम जॉर्ज भूप धन्य धन्य' हे गीत सुरू करीत. आणि मग ते इतरांना म्हणायला लावीत. प्रत्येक ध्रुवपदांत 'भो पंचम जॉर्ज' हे शब्द आले कीं त्यांचें डोकें न चुकतां आपोआपच खालीं वांकत असे. हें एवढें एक गीत म्हणतांना कोणी पोरानें मांडी खाजवली, न थांबवून शिंक दिली किंवा हुळहुळ असह्य होऊन शेंबड्या नाकावर भुर्रकन हात ओढला तर प्रार्थना संपतांच त्या पोराच्या कानशिलावर लगावायला ते कमी करीत नसत. आपण रिटायर्ड होण्याआधीं खुद्द पंचम जॉर्ज कधी हिंदुस्थानांत येईल, शाळेला भेट देईल आणि त्याच्या म्हणजे ज्याच्या साम्राज्यावर कधींहि सूर्य मावळत नाहीं अशा साक्षात् बादशहाच्या समोर हें गीत म्हणावें लागेल अशा भीतिनें ते तें गाणें तोंडपाठ ठेवीत असत. मला आतां वाटतें कीं, त्यावेळीं आमचें तें गीत चालू असतांना त्या भो पंचम जॉर्जला खरोखरीच कुणीं शाळेंत आणलें असतें तर परत जातांना गांधींच्या हातीं स्वातंत्र्याची सनद देऊनच तो परत गेला असता. पण बागाईतकर मास्तर या बाबतींत जें कांहीं करायचे तें मात्र पूर्ण भक्तीनें करीत असत. पंचम जॉर्ज आहे म्हणून आपली नोकरी आहे असा त्यांचा प्रामाणिक ग्रह झाला होता. हिंदुस्तान कधी काळीं स्वतंत्र होईल या गोष्टीवर त्यांचा तीळमात्रहि विश्वास नव्हता.

इतकेंच काय, पण त्याबाबतींत ते कुणाला एक चकार शब्दहि उच्चारूं देत नसत. अमृते मास्तरनीं एकदां आपल्या गोड आवाजाची परीक्षा घेण्यासाठीं 'घनतमीं शुक्र बघ राज्य करी। रे खिन्न मना बघ जरा तरी।' अशी ओळ एकदां गुणगुणतांच बागाईतकरांनीं त्यांना जागच्या जागीं ताणलें होतें. पंचम जॉर्जशिवाय दुसरा कोणी राज्य करी हा विचारसुद्धां त्यांना सहन झाला नव्हता. याबाबतींत अमृतेनीं हुज्जत घातल्यावर पारतंत्र्यरूपी घनतमीं शुक्ररूपी गांधी राज्य करी असा उलटा सुलटा काव्यार्थ त्यांनीं दाबलेल्या खाजगी आवाजांत अमृतेंना स्पष्ट करून सांगितला होता. पण अमृतेंनीं मात्र तो काव्यार्थ कधींच मानला नाहीं. उलट 'ये बाहेरी अंडें फोडुनी। शुभ्र मोकळ्या वातांवरणीं।' असें आव्हान देत ते आपली गुणगुण चालूच ठेवीत असत.

पण म्हणून बागाईतकारांनीं कधीं अमृतेंना जाचलें नाहीं. कुणाला त्रास देणें हें त्यांच्या स्वभावांतच नव्हतें. एक आवडता छंद म्हणजे ऱ्हस्वदीर्घांवर बरोबर ठेका धरीत शुद्धलेखन घालणें. अनुस्वारांचा बरोबर उच्चार करीत शुद्धलेखन घालणें. प्रार्थना संपली कीं आपल्या तीन वर्गांतल्या पोरांना ते पटापट शुद्धलेखन घालीत.

एकदां त्यानीं सुरुवात केली, "एकदां पशू आणि पक्षी यांच्यांत लढाई सुरू झाली. आतां



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

आपलें काय होणार या भीतीनें वटवाघुळ घाबरून गेलें. तें पशूपाशीं गेलें आणि म्हणालें, बाबांनो, मी पशू आहे. कारण माझें तोंड उंदराच्या तोंडासारखें आहे..."

वाक्य संपतें न संपतें तोंच नरू उद्गारला, "काय मास्तर?"

आणि मास्तर कडाडले, "अरे गाढवा, माझें तोंड उंदराच्या तोंडासारखें आहे."

आणि मास्तरांच्या तोंडाकडे पहात सारीं पोरें खदखदां हंसलीं.

तेव्हां कुठें नरूचा वात्रटपणा मास्तरांच्या ध्यानीं आला. अशा वेळीं दुसऱ्याशा मास्तरानें नरूला फोडून काढलें असतें.

पण बागाईतकर मास्तर त्या मानानें बरेच साधे भोळे!

"नरू, ★★★च्या ताठ उभा रहा."

नरू मुद्दाम पोंक काढून उभा राहिला. पण त्याला शिक्षा काय द्यावी हें त्यांना सुचलें नाहीं.

"म्हण बघूं—सकाळी उठोनी। देवासी भजावें ॥

गुरूसी वंदावें। जीवें भावें—जीवें भावें॥

एवढ्या दोन ओळी तेवढ्या त्यांनीं नरूकडून मोजून शंभर वेळां म्हणून घेतल्या आणि त्या-वेळपासून वटवाघळाची गोष्ट त्यांनीं पुनः कधीं शुद्धलेखनांत आणली नाहीं.

विशेषतः 'मुंबईतला दीपोत्सव' या धड्यां-तले परिच्छेद त्यांच्या विशेष आवडीचे. हे परिच्छेद शुद्धलेखनासाठीं घातल्यामुळें आपली सरकारनिष्ठा प्रकट होते असें त्यांना वाटत असे. "एकोणिसशेंऽऽ तीऽऽन सालच्या जानेवारीऽऽ महिन्यांत मुंबईऽऽ येथें राज्यऽऽ रोहणाऽऽ निमित्त मोठाऽऽ समाऽऽरंभ होणार असेंऽऽ" अशी सुरुवात करून ते दोनचार परिच्छेदांचें शुद्धलेखन घालीत असत. मग कोट-टोपी काढून खुर्चीवर ठेवीत असत. आणि प्रत्येक वर्गातल्या पहिल्या नंबरच्या पोराला सबंध वर्गाचें शुद्धलेखन तपासायला सांगून ते सारें धोतर कमरेपर्यंत गुंडाळून घेत. आणि म्हणत, "ए गुंड्या, मेल्या झोपतोस काय? रात्रीं झोप पडलीं नाहीं? उठ उठ! तो तांब्या भर."

गुंड्यानें पितळेचा तांब्या भरला कीं खुंटी-वरली छत्री घेऊन ते जानवें चांचपत निघून जात आणि अर्ध्या-पाऊण तासानें परत येत. आणि खिडकींतून डोकावून म्हणत, "एऽऽ परश्या, भडव्या, सारखें अंग कसलें खाजवतोस? खरजेनें पिडला जाशील. उठ. तांब्या घास बघूं लखलखा!"

मास्तरनीं परत आणलेला रिकामा तांब्या परश्या घांसून देई. मग ते शाळेच्या पायरीवर उभे रहात, आणि स्वच्छ हातपाय धुवून, चूळ भरून, कानावरचें जानवें काढीत आंत येत.

मग धोतराचा सोगा सोडीत म्हणत, "कोणाच्या रे जास्त चुका?"

"वासग्याच्या एकतीस चुका, मास्तर!"

नाकांतून ओठापर्यंत आलेली सफेद रेघ भुर्रकन् वर ओढत वासग्या कावरा बावरा व्हायचा.

"उठ. उभा रहा. मेल्या, एकतीस चुका? हें आहे काय? शुद्धलेखन आलें नाहीं तर तुझें होणार कसें? शिकणार काय आणि खाणार काय? जा—त्या बुल्या रावताच्या दुकानांतून एक सिंगल चहा घेऊन ये. जरा कडक कर म्हणावें. काय? कळलें? चल-पळ!"



खरोखरीच भो पंचम जॉर्ज शाळेंत आले आहेत. असें समजून बागाइतकर कोटाचीं सर्व बटणें लावून कृतज्ञतेने व लाचारीनें हात जोडीत.

वासग्या आनंदानें गोठ्यांतून सुटलेल्या वासरासारखा उड्या मारीत धूम ठोकायचा.

मग मास्तरना कसली तरी एकदम आठवण व्हायची. आणि म्हणायचे, "वास कसला येतो आहे?"

"भज्याचो वास येतासा." ओठांवरली लाळ सांभाळीत येशा पुटपुटायचा.

"भज्याचा वास...गणित विषय कुणाचा चांगला आहे रे?"

चिंत्याचें बोट घाबरत घाबरत वर यायचें.

"चिंत्या, उभा रहा. आठ अधिक चार किती?"

"बारा!"

"दहा अधिक दोन किती?"

"बारा!"

"अकरा अधिक एक किती?"

"बारा!"

"ठीक आहे. जा—त्या बुल्याकडून एक प्लेट गरम भजीं आण. गरम असलीं तरच आण. आणि मोजून बारा आहेत कीं नाहींत.— कळलें—चल—पळ."

मग एक एक भजें तोंडांत टाकीत, चघळत आणि वर निटक्या मारीत चहाचा घोट घेत घेत ते गणित घालायचे—"एका हौदांत आठ बादल्या पाणी ओतलें आणि त्यांतून चार बादल्या पाणी गळलें तर हौदांत किती पाणी राहिलें?"

शुद्धलेखनाप्रमाणेंच या गळक्या हौदाचें एक गणित त्यांच्या आवडीचें.

एखाद्या वेळीं भज्यांचीच खमंग असली तर आपण कोणतें गणित घालतां आहे तेहि ते विसरायचे. आणि मग "एका नारळाचे कोयत्यानें दोन तुकडे केले तर किती तुकडे होतील?" असेंहि गणित घालून ते मोकळे व्हायचे. अर्थात, याहि गणिताचें उत्तर म्हणून तीन चार पासून तो थेट दहा बारापर्यंत आंकडे लिहिणारीं माझ्यासारखीं पोरेंसुद्धां वर्गात होतींच!

सरस्वती-पूजन हा आमच्या शाळेंतला त्यावेळचा मोटा कार्यक्रम असायचा. या कार्य-क्रमांत पूजेव्यतिरिक्त करमणुकीचेहि कार्यक्रम असायचे आणि ते पाहायला पालकांची बरीच गर्दी जमायची. अशा एका कार्यक्रमांत अमृते मास्तरनीं 'वनवासी राम माझा सांगा कुणी पाहिला?" या चालीवर 'पेन्सिलीचा तुकडा माझा सांगा कुणी पाहिला?' असें एक गीत रचलें होतें. पेन्सिलीचा तुकडा मिळाला नाहीं तर पेपर कसे तपासूं? मार्क कसे देऊं? रिझल्ट कसा लावूं? वगैरे अनेक प्रश्न दुःख-भरानें त्या काव्यांत अमृतेमास्तरनीं उपस्थित केले होते. मूळ चालींत तें दांडगाईनें कोंबूनच म्हणावें लागत असे. त्यामुळें तें गीत म्हणतांनाच माझा जीव व्याकुळ होत असे. तरीहि हावभाव करीत तें व्याकुळतेनें कसें म्हणावें याची तालीम मी सतत पंधरा दिवस अमृतेंच्याकडून घेत होतों.

अशा रीतीनें 'अंगविक्षेप करून म्हणावयाचें गीत' तयार झालें आहे असें बागाईतकर मास्तरांना कळतांच त्याच्यांतला हेडमास्तर जागा झाला. त्यांना एकदम आपल्या जबाबदारीची जाणीव झाली. (प्रस्तुत गीतांत पंचम जॉर्जच्या विरुद्ध कांहीं तरी असेल असाहि त्यांना संशय आला असावा!) म्हणून त्यांनीं तें गीत मुद्दाम

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

वाचून पाहिलें. अंगविक्षेप न करतां त्यांनीं तें गीत दोनदां वाचलें आणि मग अंगविक्षेप करीत म्हणाले, "अमृते, तुम्हांस कांहीं कळतें कीं नाहीं? 'वनवासी राम माझा' हें गीत कुठें आणि तुमचें 'पेन्सिलीचा तुकडा माझा' हें गीत कुठें? राम कुठें आणि पेन्सिलीचा तुकडा कुठें? आणि तुमच्यापाशीं पेपर तपासण्यासाठीं सुद्धां पेन्सिलीचा तुकडा नाहीं हें लोकलबोर्डाच्या मेंबराला कळलें तर त्याचा काय परिणाम होईल याची जाणीव आहे तुम्हांला? दोन महिन्यांपूर्वी तुम्हांला पेन्सिल दिली नव्हती? कुठें आहे ती?"

अमृतेमास्तरनीं नुसते खिसे चाचपले आणि म्हटलें, "अहो, यांत खरें कांहीं नाहीं. हें काव्य आहे!"

"कसलें काव्य? पेन्सिलीच्या तुकड्यावर काव्य? आणि तुकड्यांतला 'तु' ऱ्हस्व असावयास हवा हें तुम्हांस आजपावेतों माहीत नाहीं? मग पोरांना शिकवतां काय? पोरांना शुद्धलेखन आलें नाहीं तर त्यांचें भवितव्य काय?"

शुद्धलेखनांतली चूक अमृतेमास्तरनीं मुकाटपणें ऐकून घेतली. पण 'पेन्सिलीचा तुकडा माझा' हें गीतच रटाळ आहे हें ऐकून घ्यायला त्यांची तयारी नव्हती.



अमृते, तुम्हांला काहीं कळतें की नाहीं? राम कुठें नि पेन्सिलीचा तुकडा कुठें! आणि दोन महिन्यापूर्वी तुम्हाला पेन्सील दिली होती ना? मग कुठें गेली ती?

"राम कुठें आणि पेन्सिलीचा तुकडा कुठें?"

"पण माझें तरी ऐका. 'वनवासी राम माझा' या गीताची फक्त चाल तेवढी घेतली आहे!" अमृतेमास्तरनीं बचाव केला.

"एखाद्या महान् काव्याची चाल सटरफटर काव्यांना घेणें हें सभ्यतेला सोडून आहे असें तुम्हांला वाटत नाहीं?"

सटरफटर या शब्दांत ऱ्हस्वदीर्घ नसल्यामुळें बागाईतकर मास्तरांनीं तो शब्द झटपट उच्चारला. त्यामुळें अमृतेमास्तरांना तो वेगळ्याच खटक्यांत जाणवला. आणि ते एकदम अस्वस्थ झाले.

"यांत असभ्यपणा कसला?" धरलेली शेपटी सोडवून घेण्यासाठीं मांजर जसें अंगविक्षेप करतें तसे अंगविक्षेप करीत अमृते किरकिरले.

"खात्रीनें–निश्चित–अलबत्त–" पाटावर वरवंटा मागेंपुढें फिरवावा तशी मान हालवीत हेडमास्तरांनीं खडखडाट केला. "निश्चित असभ्यपणा झाला. मला त्यांत मुळींच शंका वाटत नाहीं! पेन्सिलीच्या तुकड्यावर काव्य करण्याची मुळीं पाळीच कां यावी? इतर मोठे विषय संपले?"

"साऱ्याहि विषयांत आशय कधीं मोठा किती आढळे!" अमृतेंनीं एक कविवचन फेकून पाहिलें.

"हेंहि तुमचेंच काव्य?" हेडमास्तरांच्या आवाजांत इन्स्पेक्टराचा करडेपणा आला.

"नाहीं. हें दुसऱ्याचें आहे!"

"मला वाटलेंच. कोणाचें आहे?"


यंदाच्या दीपावली
वार्षिकांतल्या रंगीत चित्रांची
गौरवास्पद छपाई ज्या
सुसज्ज आणि अद्यावत्
मुद्रणालयांत झाली
**आणि**
जेथें ऑफसेट आदीकरून
सर्वतऱ्हेच्या छपाईचें काम सुबक होतें
त्याचें नांव



# न्यू इरा प्रिंटिंग प्रेस

८३, डॉ. ॲनी बेझंट रोड, वरळी, मुंबई १८

टे. नं. ४११९८






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"कोणाचें ?"

"कोणाचें ?

"कोणाचें ?"

तें कोणाचें हें दोघांनाहि माहीत नव्हतें. त्यामुळें तो प्रश्न तेथेंच सुटला. आणि मग बागाईतकर मास्तरांनीं आपल्या हेडमास्तरकीचा वरवंटा फिरवला.

अधिकारवाणीनें ते म्हणाले, "तुमच्या या गीताचा कार्यक्रम रद्द करा: ही डिस्ट्रिक्ट लोकल बोर्डाची क्रमांक एकची शाळा आहे. यांत सगळेच बिगरीचे वर्ग आहेत असा समज करून घेऊं नका."

काव्याची घडी खिशांत ठेवीत अमृते मास्तर चूपचाप झाले.

"पोटासाटीं जो व्यवसाय पत्करला आहांत त्यांत प्रावीण्य संपादन करा. कवि होण्याइतकी परिस्थिति कां यावी तुमच्यावर ? त्यापेक्षां मास्तरकींत लक्ष घाला. स्वतःचें शुद्धलेखन सुधारा." त्यानीं वडीलकीनें सल्लाहि दिला.

"मग कार्यक्रमांत आतां अर्धा तास कसा भरून काढायचा तें तुम्ही बघा." अशी एक अपत्ति बागाईतकरमास्तरांपुढें ठेवून अमृते मास्तर आपल्या खुर्चीवर जाऊन बसले.

पण बागाईतकर मास्तर तसे डरणारे नव्हते. अमृतेंना जिरवण्यासाटीं ते कामाला लागले. त्यांनीं लगेच सर्व वर्गाचीं क्रमिक पुस्तकें चाळलीं आणि हावभाव करून म्हणण्यासाटीं ते गीत शोधूं लागले. सुदैवानें त्यांना 'चेंडूचें गाणें' सांपडलें. आणखी सुदैवानें त्या गाण्याखालीं 'अंगविक्षेप करून म्हणावयाचें' असेंहि लिहिलें होतें. त्यांनीं तें गाणें निवडलें. एवढेंच नव्हे तर स्वतः धोतर खोचून शाळा सुटल्यावर ते पोरांच्या तालमी घेऊं लागले.

**वाहवा ! वाहवा ! चेंडू हा। सुंदर कितीतरी खचित अहा ॥**
**तर तो आपण घेउनिया। सगळे मिळुनी खेळूं या ॥ ध्रु० ॥**
**अम्हि फेकूं। अम्हि झेलूं ॥**
**तुम्हि फेका। तुम्हि झेला ॥**
**आतां थोडे दूर सरू। हो हो ! चेंडूस वाट करूं ॥**
**वाहवा ! वाहवा ! चेंडू हा। सुंदर किती तरी खचित अहा ॥**

आतां सरस्वती-पूजन तर अवघ्या आठवड्यावर आलें होतें. आणि तरीहि पांच सात तालमीनंतर सुद्धां पोरांचा मेळ जमेना. पोरें चेंडू झेलतां झेलतां गाणें चुकूं लागलीं आणि गाणें म्हणतां म्हणतां झेल चुकूं लागलीं.

शिवाय "या गीतांतलें 'अम्हि' 'तुम्हि' हें अशुद्धलेखन आतां बरें चालतें ?" असे फुत्कार अमृतेमास्तर येतां जातां टाकूं लागले. तेव्हां तेंहि गीत बागाईतकरांनीं रद्द केलें. एवढ्यांत सरस्वती-पूजन फक्त चार दिवसांवरच येऊन ठेपलें होतें. चारचौघांत धोतराची कांस सुटली म्हणजे ती घालतांना जशी गडबड उडते तशा गडबडींत बागाईतकर मास्तर दुसरें गीत शोधूं लागले.

अखेर आकान्ताच्या भरांत त्यांनीं देवाजीची करुणा भाकून 'भाताचा हंगाम' हें गीत एकदांचें निवडलें. त्याहि गीतावर 'अंगविक्षेप करून म्हणावयाचें' असें लिहिलेलें होतें. त्यामुळें त्यांचें काम झालें. घरीं जातांच जेवण तयार असावें असें त्यांना वाटलें. ज्या पुस्तकांत तें गीत होतें त्या पुस्तकावर पंचम जॉर्जचें चित्रहि होतें. शिवाय 'मुंबई इलाख्यांतील सरकारी शाळा खातें' आणि 'व्हर्नाक्युलर टेक्स्ट बुक्स रिव्हीजन कमेटीनें तयार केलेलें' असेहि उल्लेख होते. त्यामुळें अत्यंत सुरक्षिततेच्या भावनेनें त्यांनीं 'भाताचा हंगाम' हें गीत पक्कें केलें.

दीपावलि शुभचिंतन
SILOVER ORIENTAL BOMBAY
सिलोव्हर
स्टेनलेस स्टीलची भांडी
व बरशेन गॅसच्या 'अर्चिस
हॉट प्लेट्स' चे निर्माते
दि ओरिएन्टल
मेटल प्रेसिंग वर्क्स
प्रा. लि.,
१३१ वरळी, मुंबई १८

देवाजीनें करुणा केली।
भातें पिकुनी पिवळीं झालीं ॥
देवाजीच्या नांवा घेउनी।
तयार व्हारे करूं कापणी ॥
खसा खसा मग विळा चालवा।
चूड कापुनी घाला अडवा ॥
कापा! कापा! झटुनि सारे।
कडपांचे मग बांधूं भारे ॥

अशा प्रकारें गडबड गोंधळाला पूर्ण वाव देणारें गीत मुकर होऊन तालमी सुरू झाल्या. आम्ही बाराचौदा पोरांनीं या गीताचा नुसता गलका उडवून दिला. पण ऐन सरस्वती-पूजनाच्या दिवशीं मात्र इतका कांहीं गलका झाला कीं अमृतेमास्तर अगदीं हर्षोन्मादानें नाचले. आमची शाळा ती केवढी आणि त्यांत स्टेज तें केवढें! दोन्हीं बाजूला जास्तींत जास्त पडदे खेंचून सुद्धां कशीबशीं पांचसहा पोरें आपलीं तोंडें स्टेजवर दाखवूं शकलीं. बाकीचीं पोरें भान हरपून पडद्यामागेंच नाचत होतीं. घरीं गेल्यावर तूं कुठें दिसला नाहीस तो?—असा प्रश्न पालकांनीं विचारल्यावर आपण पडद्यामागेंच नाचलों हें अनेक पोरांच्या ध्यानीं आलें!

या गीतांत वास्तवतेचा रंग भरावा म्हणून आम्ही साऱ्या पोरांनीं पंचे नेसून आणि बंड्या घालून शेतकऱ्यांचा पोषाख केला होता. प्रत्येकानें आपापल्या घरचे विळे आणले होते. बोलून चालून भाताचाच हंगाम!

एवढ्याशा स्टेजवर आधींच दाटीवाटीनें उभीं राहिलेलीं आम्हीं पोरें. पडदा बाजूला सरकतांच आम्ही थरकाप घाबरलों. पण पडद्यामागून 'देवाजीनें करुणा केली—' अशी बागाईतकर मास्तरानीं प्रत्यक्ष देवाजीच्या अंगावर कांटा आणणारी आरोळी ठोकतांच आम्ही पोरांनीं नाईलाजास्तव तोंडें उघडलीं. कोयत्या-विळे हातांत धरून आम्हीं हात जोडले. आणि मी चुकतो कीं तूं चुकतोस अशी एकमेकांशीं नेत्र-पल्लवी चौकशी करीत आम्ही 'देवाजीनें करुणा केली। भातें पिकुनी पिवळीं झालीं।' असें जाहीर केलें. नाहीं म्हटलें तरी येथपर्यंत सारें



"कापा – कापा! कापा कापा?" परशाचा दांडगट बाप एकदम संतापानें किंचाळला "भड-व्यांनु कापलास तेवढा थोडा नाय झालां?"

ठीक जमलें. पुढें, साक्षात् लोकांसमोर, उघड्या-वर पडलेल्या आम्ही स्टेजवरल्या पोरांनीं घाबरून गीत लौकर आटोपण्याच्या दृष्टीनें घाई केली. आम्ही पुढला चरण पकडून 'तयार व्हारे करूं कापणी' अशी घाई केल्यामुळें 'देवाजीच्या नांवा घेउनी' हें कर्तव्य आम्हीं पार विसरलों. पण आपण स्टेजवरच आहों असें समजून पडद्यामागें पडलेलीं पोरें मात्र तेंच कर्तव्य पार पाडीत होतीं. त्यामुळें अनेक आवाज एकमेकांना भेदून गेले. आणि पानिपत झाल्यासारखें वाटूं लागलें. तेव्हां बागाईतकर मास्तरांनीं पुनः एकदां आपला कठोर भेसूर आवाज चढवून सारे किरकोळ पिचके आवाज आपल्या नियंत्रणाखालीं आणले. आणि पुनः एकदां 'देवाजीनें करुणा केली!' परंतु कमरेंतून वांकून हातांतल्या कोयत्या सरसावीत जेव्हां आम्हीं 'खसा खसा मग विळा चालवा' असें म्हणून आम्हीं विळा चालवला तेव्हां माझा विळा लागून परश्याच्या पंचाची कांस सुटली. आणि प्रेक्षकांत हास्याची एक लाट उठली. पण परशा डरला नाहीं. त्यानें उभ्याउभ्यानेंच स्टेजवर पंचाची कांस घातली. कांस ठाकठीक बसवून तो पुनः 'खसा खसा मग विळा चालवा' म्हणत वांकणार तोंच 'चूड कापुनी घाला अडवा' म्हणत आम्ही उभे राहिलों. त्या झटापटींत परशाच्या गालावर माझ्या विळ्याचा जबरदस्त ओरखडा आला आणि भळकन् रक्त सांडलें. आणि त्या वेदनेच्या भरांत त्यानें "हात् भोसडीच्या" म्हणून मला एक शेलकी शिवी हांसडली. मी ओशाळून उभा राहिलों. मध्येंच पळ काढावा आणि पडद्यांत घुसावें असें वाटलें. पण शक्य नव्हतें. डझनभर तरी कोयत्या माझी हत्या करण्या-साठीं तळपत होत्या. त्यामुळें नाकतोंड खाली घालून मी नुसता उभाच राहिलों. परशा रडवेल्या तोंडानें रक्त बोटानें पुशीत होता आणि बोट चोखत होता. बोटांतूनच रक्त येतें आहे असा त्याचा समज झाला होता. आणि तरीहि बाकीचीं पोरें मात्र 'चूड कापुनी घाला आडवा' मध्येंच दंग होतीं.

आमचें संग्रामी गाणें थांबत नाहीं, रक्ताची धार कमी होत नाहीं, आणि रक्त पुसलेलीं बोटें झपाझप चोखून परशा रक्त पोटांत घेत नाहीं हें पहातांच परशाचा बाप पितृप्रेमानें कळवळला "अरे परशा, रगात रगात..." म्हणत परशाचा बाप प्रेक्षकांतून उठला तो पुढें बसलेल्या पोराबाळांच्या हातांवर, मांड्यांवर. स्टारट पाय देत तडक स्टेजवर चढला. ज्या पोरांचे सुटे अवयव चिरडले गेले तीं पोरें केंकाटून रडत राहिलीं. तरी पर्वा न करतां परशाचा बाप स्टेजवर चढला. त्यामुळें सर्वांनाच हालचाल करणें कठीण झालें. आमचे सर्वांचेच अंगविक्षेप थांबल्यामुळें आतां पुढें काय करावें याचा अंदाज घेण्यासाठीं आम्ही बावळटासारखे पडद्यांत पाहूं लागलों. या भानगडींतून बागाई-तकर मास्तर आम्हांला सोडवतील अशी आशा आम्हांला वाटत होती. पण त्यांचें लक्षच नव्हतें. डोळ्यांसमोर क्रमिक पुस्तक धरून गीत म्हण-ण्यांत दंग झालेले हेडमास्तर आपल्या तंद्रींतच कोकलले, "कापा! कापा! झटुनी सारे—"

"कापा—कापा! काय कापा?" परशाचा दांडगट बाप एकदम संतापानें किंचाळला, "भडव्यानु, कापलास तेवढा थोडा नाय झालां?"

तेव्हां कुठें बागाईतकर मास्तरांचे डोळे खाडकन् उघडले. त्यांनीं भराभर शिट्टी फुंकली. पण शिट्टीचा आवाजच आला नाहीं. तेव्हां

निलगिरी किंवा एरंडेल २ डझन माल घेणाऱ्यास १ कॅलेंडर मोफत. सुंदर टिन पॅकिंग व चौकोनी स्क्रॅप वाटली.

आरको

मोफत
निलगिरी एरंडेल
लक्ष्मी एजन्सी. आरको बिल्डींग मुंबई नं. २४
प्रॉडक्टस्

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

गडबडींत शिटीचें उलटें टोक तोंडांत होतें हें त्यांच्या लक्षांत आलें. पण परशाचा बाप जबरदस्त. नारळ भरल्यावर बारदान हालवून बंद करावें तशा सगवानें त्यानें पडद्याचीं दोन्हीं बाजूंचीं दोन टोकें पकडलीं आणि आख्खें स्टेज बारदान भरल्याप्रमाणें एकदम बंद करून टाकलें.

दरम्यान परशाच्या बापाची समजूत काढी-पर्यंत बहुतेक प्रेक्षक गोंगाट करीत निघून गेले होते. परशाच्या बापाची समजूत काढणें कठीण झालें होतें. कारण तो बागाईतकरांना बोलूंच देत नव्हता. एका साध्या शब्दाआड एक शिवी अशा रीतीनें तो शब्दमालिका गुंफत होता. शिवाय परशाच्या हातांतला विळा त्यानें आपल्या हातांत घेतला होता. त्यामुळें तो 'धूड कापुनी घाला आडवा' करणार कीं काय या भीतीनें बागाईतकारांना घाम सुटला होता.

तेवढ्यांत नरू माझ्या कानांत कुजबुजला "मास्तराचा धोतार बघ–"

"घामान रे ता!" मी त्याला आवरलें.

"छा! इतको घाम खंयचो?" नरूला शंका होतीच.

अखेर, वार्षिक परीक्षेंत परशाला वरच्या वर्गांत ढकलण्याची हमी देऊन बागाईतकर मास्तरांनीं तें प्रकरण कसें बसें मिटवून टाकलें आणि सुटकेचा सुस्कारा सोडला. पण विळे, बंड्या आणि पंचे ज्याच्या त्याच्या घरीं न गेल्यामुळें तें प्रकरण पुढें शिमग्यापर्यंत चालूं होतें.

या साऱ्या प्रकरणांतून बागाईतकरमास्तरांनीं जो धसका घेतला तो कायमचा. ते पुनः कधींहि सामुदायिक करमणुकीचे कार्यक्रम सादर करण्याच्या फंदांत पडले नाहींत.

पुढें एकदोन वर्षांत सतरा रुपये पेन्शन घेऊन ते निवृत्त झाले.

आणि बाजारांत जायच्या रस्त्यावर असलेल्या आपल्या घरांत कसा तरी वेळ काढूं लागले. आला दिवस ढकलूं लागले. पिढीजाद घरांत राहून भवमहानदी तरून जाण्याचा प्रयत्न करूं लागले.

त्या रस्त्यावरून बाजारांत जातांना हमखास त्यांच्या घरावरून जावें लागत असे. तें घर शांत, एकलकोंडें दिसायचें. तेंहि रिटायर्ड झाल्यासारखें वाटायचें. त्या घराला एकुलती एक छोटीशी खिडकी होती. त्या खिडकींतून दुपारपर्यंत थोडा थोडा धूर झिरपतांना दिसे. घराच्या जिवंतपणाची तेवढीच एक साक्ष!

बाहेर ओट्यावर कधीं दिसलेच तर शुद्धलेखन घालण्याच्या आपल्या जुन्या पद्धतीनें विचारायचे, "काय रे आपू? कसें काय? बरें आहे ना? अभ्यास काय म्हणतो? शुद्धलेखन चांगलें ठेव!"

कधीं मला वेळ असला म्हणजे मग त्यांच्या अंगणांत मी थोडा अधिक वेळ थांबत असे. बोलतां बोलतां ते अलीकडे शिक्षणाचा दर्जा कसा खालवतो आहे तें सांगत असत आणि मग सारें खापर अशुद्ध लेखनावर फोडीत असत. मी त्यांच्या त्या जुन्या घराकडे बघत राही. बघतां बघतां वाशांना धरलेल्या वाळवीचे टपटप तुकडे पुढ्यांत पडत असत.

"वासे बदलून घ्या. वाळवी लागली आहे!" असें सांगितलें म्हणजे एक चकारहि तोंडांतून न काढतां कडवटपणानें ते फक्त 'चाललें आहे' अशा पद्धतीनें हात हालवायचे. मूल नाहीं बाळ नाहीं! कुणासाठीं घर राखायचें असा विचार त्यांच्या मनांत असावा.

तरीहि आखूड बुटक्या दारावर आंब्याचीं पानें आणि भाताचीं कणसें यांचें एक तोरण सदैव असायचें. घराच्या दर्शनी भींती खरवडलेल्या होत्या. पण तरीहि त्यावर चुन्यानें रंगवलेला नागोबा होता. बऱ्याच वर्षांपूर्वीं टांगलेले फलक होते त्यांवर 'राम राम—यावें बसावें', 'लौकर निजे लौकर उठे त्यास परमेश्वर भेटे', 'बरें सत्य बोला यथातथ्य चाला। बहु मानिती लोक येणें तुम्हाला॥' अशीं सुभाषितें होतीं.

अलिकडे त्यांच्या सोबतीला एक काळाकुट्ट बोकाहि ठाण देऊन होता.

"शाळा सुटल्यापासून खेंकसायला, रागवायला आहे कोण? आम्ही वृद्ध. आम्हांस विचारतो कोण? म्हटलें, बोका पाळावा. म्हणजे शाळेंत पोरांवर खेंकसायच्या आमच्या संवयींत खंड नको. या बोक्यावर आपलें खेंकसतां येतें. तो सारें निमूटपणें ऐकून घेतो!" असें म्हणत ते नारायणाचें कौतुक करायचे. नारायण म्हणजे बोका. त्यांनीं मुद्दाम त्या बोक्याचें नांव नारायण ठेवलें होतें. हेतु हा कीं, त्याला हांक मारण्याच्या निमित्तानें तरी परमेश्वराचें नांव मुखीं घोळावें.

इतर वेळीं ओव्या, श्लोक, अभंग, आर्या मुखीं घोळवीत ते घरांतल्या घरांत फिरत असत.

'दयाब्द वळशील तूं, तरि न चातकां सेवकां।
उणे किमपि; भाविकां उपगशील तूं देव कां॥'

असें गुणगुणून झाल्यावर मुलांना सांगावा तसा ते अर्थहि सांगून मोकळे होत. म्हणजे आपण म्हटलेल्या केकेचा अर्थच देवाला कळला नाहीं असें व्हायला नको.

"हे प्रभो, तूं दयेचा मेघ म्हणजे ढग जर अनुकूल होऊन इकडे वळलास तर मग भक्तरूपी चातकांना कसलीहि वाण रहाणार नाहीं."

तेवढ्यांत नारायण उपासपोटीं मॅव मॅव करायचा.

"नारायणा, आमच्यामुळें तुझ्या नशिबींचें दूध तुटलें. सदाचाच आपला अपुरा डाळभात..."


हीं दिवाळी व नवें वर्ष आमच्या ग्राहकांस व हितचिंतकांस सुखाचें जावो.

UMI BRAND

ऊमी ब्रँड
स्टोव्ह व ब्लोलँप
आणि
स्टोव्हचे स्पेअर
पार्टचे निर्माते.
प्रेसिंगच्या सर्व कामासाठीं
युनायटेड मेटल
इंडस्ट्रिज
नं. ७ भास्कर भुवन
फणसवाडी मुंबई २.

# they go hand in hand




....and under one roof of RATIONAL who undertake printing and production, right from idea, artwork, blockmaking and printing. RATIONAL studio and press are well-equipped with able hands and highspeed machinery.




**RATIONAL ART & PRESS PRIVATE LIMITED**

PROSPECT CHAMBERS ANNEXE, PITHA STREET, BOMBAY 1









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


अनुक्रमणिका

'अनन्यगतिकां जनां निरखितांचि—"·

मला बाजारांतून येतांना पहातांच ते केका अर्धीच सोडून म्हणायचे, "आपू, काय मासळी मिळाली तरी?"

"होय! आणलाय सरंगा!"

"आहे तरी स्वस्त?"

"नऊ आणे दिले!"

"नऊ आणे?" नकारार्थी मान हाल्वीत आपल्याशींच म्हणायचे, "आपलें काम नव्हे!" आणि मग मला म्हणायचे, "आईला म्हणावें थोडा नारळाचा रस अधिक टाक. म्हणजे बरें होईल कालवण!"

आणि मग मी पुढें जातां जातांच तोंडचें पाणी गिळून म्हटलेली केका माझ्या कानीं यायची—

**"तरेन तुमच्या बळें, भवमहानदी नाविका**
**तुम्हीच मग आतरास्तव मला सुटीना विका॥**
**असे विदित वासही मज सदाश्रमीचा, करा।**
**दया, गुण पहा; सवे मज सदा श्रमीं चाकरा॥"**

## २.

**बा**गाईतकर मास्तरांच्या निवृत्तीनंतर आमच्या शाळेंतलें एक शान्तिपर्व संपलें. त्यांच्या काळांत आबादी होती. एखादा पोरगा परीक्षेंत सपशेल नापास झाला आणि मास्तरांच्या घरीं जाऊन तो खूपसा रडला तर आपोआप पास होत असे. त्यांच्या निवृत्तीनंतर पावटेमास्तर येतांच शाळेंतला सारा नूरच पालटला.

रविवारीं दुपारच्या मोटारीनें पावटेमास्तर येणार असें कळतांच माझ्या वडिलांनीं—आबांनीं—आमच्या आवारांतल्या एका मांगराच्या दोन खोल्या झाडून तयार ठेवल्या आणि मला गांवच्या वेशीवर पाठवलें. पावटेमास्तरना सांग, दोन खोल्यांची जागा मोफत मिळेल म्हणून असा निरोप देऊन त्यांनीं मला वेशीवर उभा केला.

मोटार थांबतांच मीं चौकशी केली. तेवढ्यांत मोटारीमध्यें पावटे मास्तराच्या शेजारींच बाबुलीचा हस्तक बसलेला दिसला. मी हिरमुसला होऊन परत आलों. बाबुलीनें पावटे मास्तराला आधींच आपल्याकडे ओढलें होतें. त्यामुळें मन चुरपुटून गेलें. कारण बाबुली म्हणजे आमचा एकमेव शत्रु! आमच्या घराण्याचें तळपट करूं इच्छिणारा द्वाड पुरुष!

"मास्तर बाबुलीकडे गेलो!" मी आबांच्या कानावर बातमी घातली.



पावटे मास्तर—कोळशासारखा काळा कुळकुळीत आणि मुसळासारखा तुळतुळीत, डोक्यावर तबल्यासारखी शाई, बाकी नर्मदेंतला गोटा!

ते कांहीं बोलले नाहींत. तेहि मनांतून खजिल झाले होते.

दुसऱ्या दिवशीं सोमवार.

मी धडधडत्या काळजानें शाळेंत गेलों. पावटेमास्तर तापट आहेत. शिस्तीचे आहेत. ते ब्रह्मचारी आहेत. त्यांच्याबद्दल अनेक गोष्टी ऐकल्या होत्या. त्यामुळें आम्ही सारीं पोरें दचकून होतों. त्या दिवशीं सारीं पोरें प्रार्थनेच्या आधीं अर्धा तास शाळेंत आलीं होतीं. अमृते मास्तर तर इन्स्पेक्टर यायच्या दिवशीं करावेत तसे झकूक कपडे करून आले होते.

रीतसर प्रार्थना संपतांच पोरें खालीं बसलीं तोंच—

पावटेमास्तर आला.

वयानें पंचेचाळीशींतला इसम. पुरा सहा फूट उंचीचा कोळशासारखा काळा कुळकुळीत आणि मुसळासारखा तुळतुळीत. तुकतुकीत दाढी आणि नाकाखालीं खारीच्या तुटक्या शेपटासारख्या भुऱ्या रंगाच्या मिशा. 'डोक्यावर तबल्यावरली शाई. बाकी नर्मदेंतला गोटा. खांद्यापर्यंत रुळणारी शेंडी. (त्या शेंडीची जाडी आणि लांबी पाहून लहानपणीं आम्ही त्या शेंडीला शेंडाच म्हणत असूं!) ती शेंडी टाळूवर आडवी ठेवून त्यावर त्यानें (या मास्तराला त्याच्या पाठीमागें मी जन्मांत कधीं अहो म्हटलें नाहीं!) परीटघडीची उंच खादी टोपी ठेवली होती. शर्टाचीं बटणें गळ्यापर्यंत लावून त्यावर त्यानें आखूड कोट चढवला होता. जुत्याचा करंचरं आवाज करीत तो वेताळासारखा शाळेंत आला. येतांच तमाम पोरें उठून उभीं राहिलीं. अमृतेमास्तर स्वागतासाठीं पुढें धांवले.

आल्याबरोबर त्यानें टोपी काढून टेबलावर ठेवली आणि शेंडी जाग्यावर आहे कीं नाहीं तें चाचपून पाहिलें. तावडतोबीनें त्यानें टेबल-खुर्च्यांची जागा बदलली. आपली खुर्ची आणि आपलें टेबल एका कोपऱ्यांत नेलें. फक्त आपले तीन वर्गच नव्हेत तर अमृते मास्तरसकट सारे सात वर्ग सतत नजरेखालीं रहातील अशा बेतानें त्यानें तो कोपरा गांठला. प्रत्येक पोराला त्यानें आपला गोणपाट बाहेर नेऊन झाडायला सांगितलें. आणि मग सर्व वर्गांची ओळीओळीनें रचना केली.

मध्येंच तो अमृतेना म्हणाला, "इथें म्हारडीं किती आहेत?".

"प्रत्येक वर्गात दोनचार आहेत!"

मग एकदम गर्जना झाली.

"म्हारड्यांचीं पोरें! उठा—उठा!"

कमरेला लावलेल्या लंगोट्या सांभाळीत प्रत्येक वर्गातलीं महार पोरें उठून उभीं राहिलीं.

"गोणपाट उचला."

पोरांनीं दप्तरें आणि गोणपाट उचलले.

"तशीं त्या बाजूला जाऊन बसा. इकडे तिकडे शिवलात तर याद राखा. खड्डा काढून पुरून टाकीन. भडवीं शिकायला आलींत. बांबू तासून सुपें-रोवळ्या करा. शिकत हेत."

हिरमुसलीं पोरें! आपले गोणपाट आणि आपलीं दप्तरें घेऊन त्यांनीं शाळेंतच महारवाडा स्थापन केला. इतर पोरांवर आपली सावली पडणार नाहीं अशा बेतानें तीं पोरें घाबरीघुबरीं होऊन बसलीं.

"आणि चांभारडीं?" पुनः एकदां गर्जना झाली.

प्रत्येक वर्गातलें एखादें दुसरें पोर उठून उभें राहिलें. महारांची वस्ती ठरल्यावर तिथेंच आपल्यालाहि जावें लागणार हें त्यांनीं ओळखलें होतें.

"उठा-उठा! मेलीं तोंडें बघताहेत. उचला धोपट्या आणि या म्हारवड्यांत जाऊन बसा."

चांभारांचीं पोरें महारांच्या पोरांबरोबर जाऊन बसलीं.

"जुतीं बांधायचीं सोडून शिकायला आलीं आहेत!"

चांभारांचीं पोरें ओशाळीं झालीं.

जुत्याचा करंचरं आवाज करीत पावटे इकडून वेताळासारखा फिरला.

ती रचना पाहून अमृतेमास्तर चुळबुळले.

"महार-चांभारांचीं सर्व वर्गातलीं पोरें अशीं







अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

एकत्र बसलीं तर त्यांचा अभ्यास कसा घ्यायचा?" अमृतेंनीं शंका विचारून घेतली.

"कसलें आलें आहे भडव्यांचें शिक्षण? गुरें-ढोरें फाडून खायचें सोडून इथें शिकायला आलीं आहेत. तुम्ही गप्प राहून पहा. माझ्या मुदतींत हीं सारीं पोरें आपोआप गळतील!"

पावटे पुनः एकदां कर्दनकाळासारखा इकडून तिकडे फिरला.

मग त्यानें आमच्या वर्गातल्या पोरांचीं पटापट नांवें विचारलीं.

मीं माझें नांव सांगितलें.

"तूं आबाचा पोर?"

पोर हा शब्द मला अपमानास्पद वाटला. मी होकारार्थी मान हालवली.

"मुंडी कसली हालवतोस? वाचा गेली?" त्यानें जाडय़ा भरडय़ा कापडाची चिंधी फाडावी तशा आवाजांत विचारलें.

मग कांहीं किरकोळ अभ्यास होतो न होतो तोंच लघवीसाठीं दहा मिनिटांची घंटा झाली. पण पोरें बाहेर पडण्यापूर्वी त्यानें आपल्या मेजावर ताडकन् छडी आपटली आणि पुनः एकदां गर्जना केली.

"बाहेर जातांच कानावर जानवें ठेवा. तुम्ही हिंदूंचीं पोरें आहांत."

त्या दिवशीं ज्यांची मुंज झाली नव्हती तीं पोरें आणि मुंज होऊनहि गळ्यांत जानवीं नसलेलीं माझ्यासारखीं पोरें बाहेर ताटकळत उभीं राहिलीं. नुसत्या भीतीनेंच लघवीला लागलें होतें. पण जानवें नाहीं म्हणून आम्ही अवघडलों होतों.

दुसऱ्या दिवशीं ही आपत्ति परत नको म्हणून साखरेच्या पुडीला बांधून येणाऱ्या दोऱ्याचे चार फेरे करून तें जानवें गळ्यांत घातलें. आणि शाळेंत गेलों. नाहीं तरी दोन मिनिटें कानावर ठेवण्यासाठीं कांहीं तरी हवें होतें.

पण मी केवळ आबांचा मुलगा म्हणून हात धुवून माझ्या पाठीस लागण्याचा पावट्याचा निश्चयच असावा. आणि तोहि बहुधा बाबुलीनें फूस दिली म्हणून असावा.

दुसरा दिवस!

लघवीची सुट्टी संपतांच आम्ही आंत आलों. मी आंत येतांच पावटे माझ्याजवळ आला. गळ्याकडून माझ्या खमिसांत हात घातला. आणि माझें जानवें वर काढलें.

"हें जानवें आहे?"

"होय!" मी म्हटलें खरें, पण लघवीला लागल्यासारखें वाटलें.

"हें जानवें? तुझ्या बापानें केलें?"

मी गप्प राहिलों. माझा बाप काढतांच माझीं कानशिलें तापलीं. पण भीतीमुळें मी कांही बोललों नाहीं.

"हा पुडीला बांधलेला दोरा आहे कीं नाहीं?"

"होय!" म्हणून मीं कबुली दिली.

तावडतोब छडी उचलून त्यानें मला फोडून काढलें. इतका मार मी जन्मांत कधीं खाल्ला नाहीं. त्यानंतर पावटे महारांच्या पोरांकडे वळला. हा पुडीचा दोरा म्हणतांच तिथें कुणी तरी हंसल्याचा त्याला संशय होता. पण संशयाचें निरसन करण्याच्या फंदांत न पडतां त्यानें प्रत्येक पोरावर फेकून छडी मारली.

झाला प्रकार मीं घरीं सांगितला. तें ऐकून आबा लालबुंद झाले. ते दुपारच्या गाडीनें जिल्ह्याच्या गांवीं गेले. तेथें स्कूल कमेटीच्या अध्यक्षाला भेटले. आणि लेखी तक्रार नोंदवली. त्यानंतर दोनचार अधिकारी आले. आबांनीं


दीपावलीची शुभ घोषणा

शिवभक्त भालजी पेंढारकर ह्यांचा नवा ऐतिहासिक बोलपट




मोहित्यांची मंजुळा

निर्माता · दिग्दर्शक · कथा · संवाद
भालजी पेंढारकर

सोबत — जयशंकर दानवे, इंदिरा चिटणीस, राजा पटवर्धन, शांता तांबे, मा. विठ्ठल व इतर हजारों.

शीघ्र गतीनें तयार होत आहे

जागतिक हक्क : श्री व्यंकटेश पिक्चर्स (कल्याण)


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

त्या सर्वांसाटीं कोंबड्या मारून जेवण केलें. प्रत्येकांना जातांना नारळ दिले. आणि मग व्हायचा तो परिणाम झाला. असा प्रकार परत होतां नये अशी पावटेला बोर्डाकडून तंबी मिळाली. त्यामुळें पावटे जरा नरम आला खरा, पण त्याचा उद्दामपणा गळावा तसा गळला नाहीं. बोर्डाकडून तंबी मिळालेलीच नाहीं, मी शाळेंत काय हवें तें करीन, मी हेडमास्तर आहे अशी फुशारकी मारीत तो गांवं फिरूं लागला. हेडमास्तर हा पोस्टमास्तरहि असल्यामुळें पावटे आमचीं पत्रें उशिरां देऊं लागला. आमचीं कांहीं पत्रें तो फाडून टाकतो असा संशयहि येऊं लागला. "मी इथें असेपर्यंत ह्या पोराला (म्हणजे मला!) एकाच वर्गात नापास करून ठेवला नाहीं तर हा पावटे बापाचा पोर नव्हे! कसा भडवा शिकतो बघूं!" अशीहि जाहीर बढाई तो मारू लागला.

पण मीहि कांहीं कच्च्या दिलाचा नव्हतों. आबांचा पाठिंबा आहे हें पहातांच मलाहि चेव आला. "या पावट्याची मी उसळ करून खाईन." असें सांगत मीहि चौफेर फिरूं लागलों.

त्याच वर्षी सुदैवानें बोर्डाची निवडणूक होती. आबांनीं चंग बांधला.

पावटे महार-चांभारांच्या विरुद्ध आहे हें पहातांच आबांनीं केशा चांभाराला उभा केला. डाव्या हाताच्या अंगठ्याची निशाणी उठवणाऱ्या केशाला मत म्हणजे काय, निवडणूक म्हणजे काय आणि बोर्ड म्हणजे काय याची सुद्धां कल्पना नव्हती. स्वतः अनवाणी हिंडून दुसऱ्यांना जुतीं शिवून देण्यांत त्याची हयात गेली होती. पण आबांच्या सांगण्यावरून त्यानेंहि नेट धरला. आणि निवडणुकीस उभा राहिला. आबांनींहि पाण्यासारखा पैसा ओतला. मला वाटतें, त्या निवडणुकीपायीं जमिनीचा एक तुकडाहि पुढें आबांना विकावा लागला. पण त्यांनीं पर्वा केली नाहीं. सर्विसच्या मोटारी, खटारे, सारवट गाड्या जमा करून मतदार जमवले आणि बाजुलीचा विरोध फिक्का करून केशाला भरघोस निवडून आणलें. मला वाटतें, केशा हा जिल्हा लोकल बोर्डांत निवडून आलेला त्यावेळचा पहिला चांभार.

"हा अंगठाबहाद्दर चांभारडा करून करणार काय?" असें म्हणत पावटे आपली गुर्मी टिकवूं लागला.

बोर्डाच्या पहिल्या सभेला केशा हजर राहिला. वास्तविक त्याला या सभेला



"मास्तर मी मेंबर आलंय, उठून, उभो रव आणि मास्तर! शाळेंत प्वारां किती?"
"एकशें साठ"
"च्यामारी! इतकी?" केशाला आश्चर्याचा धक्का बसला.

जायचें नव्हतें. भीतीनें तो काळवंडून गेला होता. डोकें दुखतें, चक्कर येते, हगवण सुरू झाली आहे अशीं एकापेक्षां एक बरचढ कारणें त्यानें पुढें केलीं. पण कांहीं झालें तरी जिल्ह्याच्या ठिकाणीं सभेला गेलेंच पाहिजे, हा अब्रूचा प्रश्न आहे असें आबांनीं त्याला बजावून ठेवलें होतें. शेवटीं घाबराघुबरा होऊन केशा सभेला गेला. शुभ्र धोतर, खमीस, कोट आणि वर भगवा फेटा अशा पोषाखांत खांद्यावरचें उपरणें सावरीत केशा बोर्डाच्या सभेंत जाऊन बसला. त्याचा खाजगी चिटणीस म्हणून आबाहि सभेंत बसले.

बोर्डाची सभा आटोपून केशा पुनः गांवांत आला तेव्हां त्याला त्या वेषांत पहाण्यासाटीं शें-दोनशें लोक मोटर-स्टँडवर जमले होते. त्याला ते कपडे आबांनीं आपल्या खर्चानें दिले होते. इतकेंच काय, पण जिल्ह्याच्या गांवीं जायच्या दिवशीं नखशिखांत कपडे करून हा चांभार जेव्हां अनवाणी हजर झाला तेव्हां आबांना त्याला आपलें नवीन जुतेंहि द्यावें लागलें. त्या वेषांतली केशाची ती मूर्ति मला आजहि माझ्या डोळ्यासमोर स्पष्ट दिसते. ती मूर्ते पहाण्यासाटीं आख्खा महारवाडा आणि चांभारवाडा मोटर स्टँडवर लोटला होता. मोटरींतून उतरतांच आबांनीं सर्वांना सांगितलें, "आतां केशा जुतीं शिवचो नाय. बोर्डाचो मेंबर झालो. उद्यां शाळेकडे जमा. केशा शाळा तपासणी करतलो!"

घरीं येतांच आबा तडक विहिरीवर गेले. आणि सर्व कपडे ओले करून त्यांनी आंघोळ केली. केशाला शिवल्यामुळें झालेला भ्रष्टाकार


पूना वॉच कंपनी

आपल्या ग्राहकांस
व हितचिंतकांस

दिवाळी

अभिष्ट–चिंतन

सहर्ष सादर करीत आहे!



सुप्रसिद्ध मेकचीं नाविन्यपूर्ण
घड्याळें मिळण्याचें पुण्यांतील
सर्वांत जुनें दुकान!

■

सरस्वती – विलास
लक्ष्मी रोड, पुणें २.


अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

त्यांनीं धुवून काढला. पण त्या पावट्याला मऊ करण्यासाठीं हें सारें कांहीं करण्याचा त्यांचा निर्धार होता.

दुसरे दिवशीं सकाळीं काय चाललें आहे हें पावट्याच्या ध्यानीं येण्याआधींच शें-दीडशें लोकांचा गराडा शाळेला पडला होता. बामण, भंडारी, महार आणि चांभार गटागटानें शाळेभोंवतीं जमले होते. त्या सर्वांच्या, विशेषतः चांभाराच्या तोंडांवरुन उत्सुकता ओसंडत होती.

पावटेमास्तर शाळेंत येतांच त्याला जमलेल्या लोकांकडून कळलें कीं आज शाळा तपासणी आहे. तें कळतांच पावटेनें टेबलावरची छडी उचलून पंचम जॉर्जच्या फोटोमागें लपवली. आणि कोटाचीं बटणें लावून कांहीहि कुणाला न शिकवतां भुवया चोळीत तो दगडासारख्या खुर्चीवर बसून राहिला.

आपल्या भरदार पोशाखांत सकाळीं केशा आमच्या घरीं आला. मग आबा त्याला घेऊन शाळेकडे निघाले. वाटेंत दोघेहि अडखळत होते. कारण आबांच्या मागें चार हात अंतर ठेवून चालण्याची केशाला संवय. ती मोडून आबांच्या पुढें चालणें केशाला जमत नव्हतें. मेंबराचा सेक्रेटरी म्हणून आबा केशाच्या मागून चालत होते. अशा थाटांत जोडी शाळेच्या दारापाशीं येतांच जमलेल्या लोकांनीं स्तंभित होऊन गलका केला.

केशानें शाळेंत पाय ठेवतांच हर्षाचें भरतें येऊन मी उभा राहिलों. मी उभा रहातांच महार-चांभारांचीं पोरें उठलीं. आणि मग मागोमाग सगळीं पोरें उभीं राहिलीं. केशाचा हा पहिलावहिला अनुभव. त्यामुळें तो एकदम दचकून घाबरला. येऊं नये तिथें आलों असें वाटून त्यानें पाय मागें घेतला आणि आपलें कावरें बावरें तोंड तो उपरण्यानें पुसूं लागला.

"चल पुढें—" आबा कुजबुजले.

दोघे मेजापाशीं आले तरी पावटे खुर्चीवर बसून राहिला. खालच्या मानेनें उगीच हजेरी पुस्तक चाळूं लागला.

शाळेंत तुला खुर्चीवर बसायचें आहे हें आबांनीं केशाला आधीं सांगून ठेवलें होतें. केशा धड बसेल कीं नाहीं अशी त्यांना शंका होती. पण कशाचा काय परिणाम झाला कोण जाणे. कदाचित गांवचे शें-दीडशें लोक शाळेच्या दारा-खिडक्यांत झुंबड करुन आपल्याला बघत आहेत या जाणिवेनेंहि असेल, केशा अनुभवी मेंबरासारखा वागूं लागला. त्याच्या आवाजांत एकदम ताठरता आली.

"मास्तर, मी मेंबर आसंय उठून उभो रव!"

तें ऐकतांच पावटे एकदम चमकला. उठून उभा राहिला. तें पाहून चांभारवाड्यांतलीं माणसें बाहेरुन हंसलीं. केशा खुर्चीवर बसला. आबा पाठीमागें उभे राहिले. क्षण, दोन क्षण विचाऱ्या केशानें भेदरलेल्या नजरेनें शाळा पाहून घेतली. शाळेचा आंतला भाग त्यानें जन्मांत प्रथमच पाहिला. आणि मग भाषण विसरलेल्या पोरासारखा तो ओशाळून आबांच्या तोंडाकडे पाहूं लागला.

"शाळेंत विद्यार्थी किती?" आबांनीं त्याच्याकडे तोंड करुन सांगितलें.

"होय, होय! मास्तर, शाळेंत प्वारां किती?"

"एकशें साठ।"

"च्या मारी! इतकी?" केशालाच आश्चर्याचा धक्का बसला.

"पुढें बोल—" आबांनीं सूचना केली.

"आज प्वारांचो अभ्यास काय घेतलंस?" असें म्हणत केशा उठला आणि इकडे तिकडे फिरला. त्याला साऱ्या पाट्या कोऱ्या दिसल्या. केशानें जन्मांत प्रथमच पाटीला स्पर्श केला, आणि दोघांतिघांच्या पाट्या उलट्यासुलट्या करुन पाहिल्या.

"खंय पांढरा दिसना नाय!" असें आश्चर्यचकित होऊन तो उद्गारला.

"म्हणजे शाळा सुरु होऊन दोन तास झाले तरी अभ्यास नाहीं." आबांनीं स्पष्टीकरण केलें. आणि केशाला पुढें ढकललें.

एकदम मी केशाच्या नजरेंत आलों तेंव्हां तो विस्मयानें चमकला आणि स्वतःला विसरुन ओरडला, "अरे आबानु, हे तुमचे आपू! आमचे धनी!"

आबांनीं पुन्हां त्याला पुढें ढकललें.

तेथें चांभारांचीं मुलें पाहून त्याला पुन्हां विस्मय वाटला.

"मेल्यानु तुम्ही हंय रवंय? तुमका शिकरुण कशाक?" असें तो खाजगींत पुटपुटला.

"तूं गप्प रव!" असें दटावून आबांनीं शाळेची फेरी पुरी केली.

केशा परत आला आणि खुर्चीवर बसला. तेवढ्यांत पाठीला बोट लावून आबांनीं त्याला खुणावतांच तो पुन्हां उठला आणि तडक पंचम जॉर्जशीं गेला. लोंबकळणारा फोटो त्यानें वर उचलला, आणि त्याच क्षणीं लपवलेली वेताची छडी पालीसारखी खालीं पडली. हवें होतें तें मिळालें या विचारानें केशाला हर्ष झाला आणि तो ओरडला, "ही बघा, काठी गावली!"

काठी घेऊन केशा पुन्हां खुर्चीवर बसला आणि आबांच्या कानांत म्हणाला, "कसला बुक?"

"शेरे बुक—"

"मास्तर, शेरे बुक आणा—"

मास्तरनें टेबलावर शेरेबुक उघडून मेजावर ठेवलें. आबा पुढें झाले. शाळा सुरु होऊन दीड दोन तास झाले तरी अभ्यास सुरु झाला नव्हता. वेताची छडी लपवलेली आढळली. त्या अर्थीं मुलांना छडीनें मारलें जात असावें वगैरे शेरा मारुन त्यानीं अर्धे पान भरलें. शाईचें पॅड उघडतांच केशानें त्यावर डाव्या हाताचा अंगठा टेकवला आणि शेरेबुकावर उठवला.

त्यानंतर तपासणी संपली.

शाळेभोवतीं जमलेलीं माणसें आपण स्वप्नांत कांहीं तरी पहात आहोंत अशा आविर्भावानें केशा चांभाराकडे पाहूं लागलीं. आणि शाळेंत जें नवल घडलें तें गांवभर सांगत सुटलीं.

तपासणी संपवून केशा आमच्या घराकडे गेला आणि अंगणांत उभा राहून त्यानें एका मागून एक कपडे उतरले. कपडे उतरतांच लंगोटींतला केशा चांभारासारखा दिसूं लागला. त्याच्यांतला मेंबर गळून पडला.

"ह्या कपड्यान् आधीं माझो जीव अर्धो हैराण झालो!" असें म्हणत केशानें कपड्याचें बोचकें बांधलें, आणि सूड उगवल्याप्रमाणें तो त्या बोचक्यावर ठाण मांडून बसला. मग


सरदारगृह

क्रॉफर्ड मार्केटजवळ, मुंबई २
(टे. : ३८३३७)

राहण्याची व भोजनाची उत्तम सोय.

**मंगलकार्यें व मेजवान्या यांसाठीं सोईस्कर ठिकाण.**

— आमचीं वैशिष्ट्यें —

- हीरकोत्सवानिमित्त अद्यावत् पद्धतीचें भोजनगृह व अनेक प्रकारच्या सुखसोई.
- टिळक जन्म शताब्दि दिनीं लोकमान्यांचें सरदारगृहांत केलेलें स्मारक.

श्रीसरस्वती–







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

करवंटींतून दिलेला चहा पिऊन त्यानें घशाला पडलेली कोरड घालवली.

त्यानंतर, मला वाटतें, दोनतीन दिवसच झाले असतील.

अपमानानें विद्ध-झालेला पावटा टोळासारखा केशाला शोधीत होता. आणि एकदां अचानक केशा पावट्याच्या दृष्टीस पडला. बुल्या रावताच्या दुकानासमोर बसून तो करवंटींतून चहा पीत होता. केशाला वाटलें होतें, आतां मेंबर म्हणून हा मास्तर आपल्याला सलाम करील म्हणून पण संतापानें जळणारा पावटा धांवत पुढें आला आणि त्यानें केशाच्या कंबरड्यावर जोरकस लाथ हाणून त्याला आडवा टाकला. "भडव्या, जुतीं शिवायचीं सोडून शाळेची तपासणी करतोस?" असें म्हणत पावट्यानें त्याला लाथा मारीत त्या लाल धुळींत अक्षरशः गडबडा लोळवलें आणि तो आघोळीसाटीं तगतग निघून गेला.

झक मारली नि मेंबर झालों असा पश्चात्ताप करीत केशा आमच्या घरीं धांवला. आणि त्यानें घडलेली घटना आबांच्या कानीं घातली.

बोर्डाच्या मेंबरला शाळा मास्तरनें मारणें ही गोष्ट साधी नव्हती. आबानींहि कंबर कसली. म्हणतां म्हणतां साक्षीपुरावे झाले. इकडून तिकडे हेलपाटे झाले. अधिकारी आले नि गेले आणि एका महिन्याच्या अवधींतच पावटे सहा महिन्यांसाटीं विनपगारी सस्पेंड झाला. आणि त्याला पुनः कधीं या शाळेंत नेमूं नये असा हुकूम पडला.

बावुलीच्या घरांतून ज्या दिवशीं पावटा बांडबिस्तरा घेऊन परत जायला निघाला तेव्हां केशा मुद्दाम आपल्या मेंबराच्या पोषाखांत तिठ्यावर येण्यापूर्वी मी पांचपन्नास माणसें गोळा केलीं होतीं. पावटा मोटारींत चढला तेव्हां आम्ही टाळ्या पिटून "आतां भडव्या खा पावट्याची उसळ." असें ओरडत प्रचंड गलका केला.

त्यानंतर दुसऱ्याच आटवड्यांत कटकट नको म्हणून आबांनीं राजिनामा लिहिला आणि सुटकेचा श्वास सोडीत केशा चांभारानें त्यावर डाव्या हाताचा अंगठा उटवला. विशेषतः आतां मेंबराचे कपडे चढवायला नको म्हणून केशाला सुटल्यासारखें वाटलें.

त्यानंतर केशानें आपल्या पोराचें लग्न उरकून घेतलें, आणि त्या दिवशीं तेवढा त्यानें पुन्हां एकदां मेंबराचा पोषाख चढवला.

मला वाटतें, त्यानंतर जन्मांत पुन्हा कधीं केशा त्या कपड्यांना शिवला नाहीं.

## ३.

पावटेमास्तराची रवानगी झाली आणि आपण ती रवानगी केशा चांभाराकडून करायला लावली या जाणिवेनें आबांचे कांहीं दिवस खरोखरच धुंदींत गेले. पावटेमास्तराचें आणि पर्यायानें बाबुलीचें नाक कापल्याबद्दल ते अक्षरशः खुषींत होते. आलेल्या-गेलेल्यांशीं या एकाच गोष्टीचा रवंथ चालायचा. विशेषतः खळनाथाच्या देवळांत तर ही गोष्ट आली कीं आबांची बैटक हां हां म्हणतां रंगायची. केशा चांभारानें पावट्याला कशी वेसण घातली याची रसभरित वर्णनें करण्यांत आबांचा वेळ मोठा मजेंत जायचा.

त्याच वेळीं निरनिराळ्या वर्तमानपत्रांतहि आमच्या गांवाला प्रसिद्धि मिळत होती. बोर्डाच्या निवडणुकींत केशा चांभार कसा निवडून आला, बामण उमेदवाराचा त्यानें कसा भरघोस मतांनीं पराभव केला वगैरे अनेक खुलवून लिहिलेल्या बातम्या त्यावेळीं वर्तमान-


तुमच्या कांतीला
कांहीं आगळेंच रुप द्या
रेमी
सौंदर्य-प्रसाधनें
कोल्ड क्रीम, स्नो, पावडर, हेअर ऑइल्स, साबण तसेंच ब्रिलियंटाइन, पोमेड इ.इ.








सोल डिस्ट्रिब्युटर्स:
ए. व्ही. आर. ए. ॲण्ड कंपनी. मुंबई २ - कलकत्ता १ - मद्रास १





अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पत्रांत येत होत्या. चांभाराला बहुमतानें निवडून देणारें आमचें गांव पुरोगामी विचाराचें आणि सुधारक वृत्तीचें आहे असेंहि अनेक वर्तमानपत्रांनीं सूचित केलें होतें. तथापि निवडणुकीमागली खरी परिस्थिति काय होती हें या वर्तमानपत्रांना कधींच कळलें नाहीं. आबा आणि बावुली यांच्यांतील वितुष्टामुळें आबांनीं केशा चांभाराला बोर्डांत निवडून आणलें होतें, पावट्याला नरम करण्यासाटीं त्यांनीं चांभाराला हाताशीं धरलें होतें हें बिचाऱ्या बातमीदारांच्या कानांपर्यंत पोचलेंहि नव्हतें. एका खेडेगांवांत, आणि तेंहि त्या काळच्या खेडेगांवांत, एक अशिक्षित चांभार बोर्डावर निवडून येतो यांचेंच सर्वांना कौतुक वाटत होतें. सर्व बातम्यांतून या एकच घटनेचा गौरव होत होता. केशा निवडून आला आणि त्या बिचाऱ्याच्या ध्यानींमनींहिं नसतांना आमचें गांव पुरोगामी म्हणून झगझगीतपणें झळकलें. त्यामुळें आबांच्या अंगावर आणखी मूटभर मांस चढलें. सर्व वर्तमानपत्रें जमवून आबा देवळांत येत आणि चवुतऱ्यावर बसून त्या बातम्या गांवकऱ्यांना वाचून दाखवीत. त्यामुळें गांवभर केशाचें आणि पर्यायानें आबाचें कौतुक होत होतें.

इथें एक गोष्ट कबूल केली पाहिजे ती ही कीं वर्तमानपत्रांनीं ध्वनित केल्याप्रमाणें आमचें गांव पुरोगामी नव्हतें. आणि आमचे आबा तर मुळींच पुरोगामी नव्हते. ते धर्माचें



डॉ. रामदास—वीतभर रुंदीचा नि दोन हात लांबीचा फडका ते कमरेभोंवतीं गुंडाळीत. खांद्यावर वीतभर लांबीचा फडका असे.

यथास्थित पालन करणारे, सनातनी होते. केशा चांभाराला त्यांनीं हाताशीं धरलें आणि त्याला निवडून आणलें तें केवळ एका जिद्दीखातर. बावुलीला जिरवण्याच्या ईर्षेखातर ! एरव्हीं केशांची सावली अंगावर पडल्यानंतर आंघोळ केल्याशिवाय ते घरांत येत नसत. वारंवार केशाची सावली अंगावर घेऊन ते निवडणूक लढवीत होते तेव्हां तर आजी त्यांच्या-वर रात्रदिवस खेकसत असायची. आपल्या हातून भ्रष्टाचार होतो आहे असें त्यांनाहि वाटायचें. पण केवळ पावट्याला लोळवण्यासाटीं त्यांनीं तें सारें कांहीं सहन केलें होतें.

अखेर केशाच्या निवडणुकींतून एक विकट प्रसंग उभा राहिला. केशाला निवडून दिल्या-नंतर कधीं काळीं आपल्यावर अशी आपत्ति येईल अशी आबांना मुळींच कल्पना नव्हती. वर्तमानपत्रांतल्या बातम्या वाचून कांहीं समाज-सुधारकांनीं आणि विशेषतः हरिजन-सेवकांनीं एकदम आमच्या गांवावर मोर्चा वळवला. आमचें गांव चांभाराला निवडून देतें, त्याअर्थी तें पुरोगामी असलें पाहिजे, चाभाराला निवडून आणण्यासाटीं आबा झटतात, त्या अर्थी तेहि पुरोगामी आणि सुधारक असले पाहिजेत असे फुकटे निष्कर्ष काढून कांही समाजसुधारक एकाएकीं आमच्या गांवांत हजर झाले. सायकलींवरून फिरणारे, मोटरींतून येणारे आणि पायीं चालत येणारे अनोळखी चेहरे गांवांत दिसूं लागले. लेंगेवाले, धोतरवाले, पंचेवाले, लुंगीवाले. उघडे, बोडके, टोपीवाले. दाढीवाले, बिनदाढी-वाले. काठीवाले, बिनकाठीवाले. टक्कलवाले, चरखावाले. किती तरी प्रकारचे लोक पिशव्या हातांत घेऊन किंवा खाकेंत मारून आमच्या गांवीं पायधूळ झाडूं लागले. गुळाच्या खड्याकडे मुंगळ्या जमाव्यात तसे हे लोक आमच्या घरीं जमूं लागले. येऊन राहूं लागले. जेवूं-खाऊं लागले. त्यांच्या पाठीमागून तर आमच्या घरीं टोळधाड आली आहे असा आबा कुत्सित उल्लेख करीत. या सर्व लोकांनीं आमच्या गांवांत सहभोजन घालण्याचा बेत रचला. बेत कसला ? चांगला चंगच बांधला. महार आणि चांभार या हरि-जनांना सोबतीला घेऊन या गांवांत जेवलेंच पाहिजे. म्हणजे मग या गांवच्या पुरोगामित्वावर शिक्कामोर्तब झालें असा ग्रह करून घेऊन त्यांनीं चळवळ आरंभिली. त्यासाटीं त्यांना आबांचा पुढाकार हवा होता. कारण केशा चांभाराच्या निवडणुकींत आबांनींच पुढाकार घेतला होता.

हें सारें ऐकून आबांना कैचींत अडकल्या-सारखें वाटलें. झक मारली आणि केशाला निवडून आणलें असें त्यांना वाटलें. पण करणार काय ? नाहीं म्हटलें तरी काळाचाहि महिमा असतो ना ? आबा शंभर टक्के सनातनी होते. पण मी सुधारक नाहीं, मी सनातनी आहे, मी अस्पृश्यता मानतो, माझा सहजभोजनाला विरोध आहे असें त्यांना उघडपणें सांगतां येईना. आणि छातीठोकपणें सुधारणांवर विश्वास ठेवून सहभोजनांत सामील होतां येईना. केशाला निवडूनच आणलें नसतें तर ही टोळधाड या गांवावर आलीच नसती असा विचार मनांत येऊन


राधाकिशन राजाराम
आणि कंपनी

तारेचा पत्ता : नेरोडोर १४३, प्रिन्सेस स्ट्रीट, फोन : ३००९४
मुंबई २ (भारत)

विविध प्रकारच्या सुगंधांचे सुप्रसिद्ध निर्माते

दर माफक पण गुणांत श्रेष्ठ अशा आमच्या खास '५१०२' मालिकेंतील सुगंध घेऊन खात्री करा.

★ जस्मीन ★ रोज ★ नार्सिसस ★ फूजेर
★ मोगरा ★ नाईट क्वीन ★ चिप्रे

तसेच निरनिराळे भारतीय व फ्रेंच पद्धतीचे सुगंध


अनुक्रमणिका





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

त्यांना पश्चात्ताप होई. पण नुसता पश्चात्ताप करून तरी ते काय करणार होते? उलट सारे हरिजनसेवक इतक्या हातघाईवर आले होते कीं त्यांना कांहीं ना कांहीं करणें भाग होतें. बिकट परिस्थिति पहातांच आजारी पडण्याची सार्वजनिक कलाहि त्यावेळीं असावी तशी सर्वश्रुत नव्हती. त्यामुळें टाळाटाळ करणें, आढेवेढे घेणें, कधीं कधीं होय होय म्हणणें, मध्येंच नाहीं नाहीं म्हणणें एवढेंच आवांना शक्य होत होतें. पण त्याचा तसा कांहीं उपयोग झाला नाहीं. आलेल्या सर्व हरिजन-सेवकांना हीं तंत्रें पूर्वपरिचित असल्याचें आढळून आलें. टाळाटाळ करतांच ते अधिक मागें लागले. आढेवेढे घेतांच त्यांनीं अधिक आग्रह केला. होय होय म्हणतांच मिष्कास हास्य केलें आणि नाहीं नाहीं म्हणतांच पिच्छा पुरविला.

आवांनीं अखेरपर्यंत कधीं होकार दिला नाहीं. नकारहि दिला नाहीं. फक्त सत्यापमध्य चालू राहिलें. पण सेवकांनीं हे फारशी फिकीर केली नाहीं. आवांनीं कांहीं म्हटलें तरी त्यांच्याच मदतीनें आमच्या पुरोगामी गांवांत सहभोजन घडणारच हें नक्की झालें. त्यासाठीं दिवस ठरला. भोजनावळीसाठीं मंडप घालायचा खर्च नको म्हणून उघड्या मैदानावरच सायंकाळीं सात वाजतां सहभोजन पार पाडायचें असें ठरलें. तालुक्यांतून, जिल्ह्यांतून सुधारक, सेवक, पुढारी असलीं टरफलें असलेले अनेक जण जत्रेला आल्यासारखे आमच्या गांवांत येऊं लागले. आमच्यांच घरीं उतरू लागले. आणि जबरदस्तीनें आवांना ओढून गांवभर प्रचार करू लागले.

डॉ. रामदास हे या सर्व मंडळीचे म्होरके होते. ते पुढाऱ्यासारखे वागत. पुढाऱ्यासारखीं भाषणें देत. पण त्यांना पुढारी म्हटलेलें आवडत नसे. ते स्वतःला नम्र सेवक म्हणवून घेत. वीतभर रुंदीचा आणि दोन हात लांबीचा एक फडका ते कमरेला गुंडाळीत. खांद्यावर वीतभर लांबीचा एक फडका असे. हवेंत उष्णता असली म्हणजे हा फडका भिजवून ते कपाळावर ठेवीत. त्यांची यष्टी सुकलेल्या काठीसारखी होती. त्यांची दाढी मधाच्या मोहोळासारखी होती. समोर एक व्यक्ति असो अगर पन्नास लोक असोत. (त्यापेक्षां अधिक माणसें त्यांच्या प्रचार-संमेला कधीं लाभलीं नाहींत!) त्यांच्या समोर भाषण करतांना ते या दाढीवर सारखा हात फिरवीत. बोलतांना एखादा शब्द सुचला नाहीं म्हणजे मग आपली दाढी घट्ट आवळून



रामदासांचें 'पूर्णान्न' म्हणजे हाताला लागतील त्या भाज्या चिरून उकडणें. त्या अजब मिश्रणाचा वास येतांच कितीतरी प्रेक्षकांनीं जो पळ काढला त्यांनी परत तोंडच दाखवलें नाहीं.

धरीत. त्यांचें खास वैशिष्ट्य म्हणजे त्यांची जीभ फार लांब होती. ती आम्हांला एकदां अचानक दिसली होती. कारण त्यांच्या दाढी-मिशांतून दांत, ओठ, जीभ या अवयवांचें दर्शन कधींच होत नसे. पण तें एकदां अचानक झालें. एकदां ते आमच्या घरीं वाटींतून आंबरस पीत होते. पितां पितां हनुवटीवर थोडे थेंब पडले होते. ते त्यांनीं गाईसारखी लांब जीभ काढून चाटून घेतले. आणि तुटलेले केस जिभेला चिकटतांच थुकूथुक् करून थुंकले.

आपला डॉक्टरीचा व्यवसाय सोडून त्यांनीं १९२० सालीं स्वातंत्र्याच्या चळवळींत उडी घेतली होती. हिंदुस्थानांतल्या सर्व ब्रिटिश गव्हर्नरांना आणि व्हाइसरॉयला ते महिन्यांतून एकदां न चुकतां तार करीत असत. 'आपण आतां हिंदुस्थान सोडून जाणें इष्ट ठरेल' अशी तार ते पाठवीत असत. पुढें पैशाची तंगी निर्माण होतांच गव्हर्नरांना तारा पाठविणें बंद करून ते फक्त व्हाइसरॉयलाच तार पाठवीत असत. कारण व्हाइसरॉय गेला म्हणजे गव्हर्नरहि जातील अशी त्यांना खात्री होती. उद्यां पत्रावळ गेली की उद्यां द्रोणहि जाईल असें ते म्हणत असत. 'आपण आतां हिंदुस्थान सोडून जाणें इष्ट ठरेल' एवढी मोठी तार पाठवून अधिक खर्च करण्यापेक्षां 'चालते व्हा' अशी संक्षिप्त तार करून पैसे कां वांचवीत नाहीं अशी कुत्सित शंका आमच्या गांवांतल्या काहीं लोकांनीं त्यांना विचारली होती. त्यावर "'चालते व्हा' हा हुकूम झाला. हुकूम केला कीं विरोधी पक्षाच्या भावना दुखावतात. विनंती केली कीं भावनांचा आदर होतो." असें ठराविक उत्तर त्यावेळीं त्यांनीं दिलें होतें.

सहभोजनाच्या आधीं आठ दिवस सर्व व्यवस्था पहाण्यासाठीं ते आमच्या घरीं मुक्काम ठोकून होते. ते आले आणि दुसऱ्या दिवशींच आजारी पडले. चांगला अंग भाजणारा ताप सडकून भरला. पण त्यांनीं आम्हांला डॉक्टरला बोलावूं दिलें नाहीं. औषधहि घेतलें नाहीं. कडकडीत उपोषण केलें. त्याचबरोबर पाणी घालून थोडी तांबडमाती कालवली आणि मातीच्या भाकऱ्या कपाळावर थापल्या. त्याचे कपचे होतांच ते काढून पुन्हां चिखल कपाळावर थापला. बराच वेळ हें सत्र चालू ठेवून त्यांनीं आपला ताप उतरवला तेव्हां आम्ही अक्षरशः विस्मयचकित झालों.




**आमच्या असंख्य ग्राहकांस व हितचिंतकांस सुखसमृद्धीचें जावो.**



सर्व प्रकारचा कागद, पुट्टा, बायंडिंग-क्लॉथ व सरस
ठोक भावानें मिळण्याचें प्रमुख ठिकाण

**श्रीकृष्ण पेपर कंपनी**

४१७, बुधवार पेठ, पुणें २

(फोन नं. २३५८८)






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

त्यांचें जेवणसुद्धां असेंच विक्षिप्त असायचें. आम्हीं केलेलें जेवण ते जेवीत नसत. "मी आपल्यासाठीं काय करतो? मग आपले श्रम मी कसे घेऊं!" असें विचारुन आपल्या भाकऱ्या ते स्वतःच करीत. तांदळाच्या पिठांत नारळाचें पाणी टाकून आणि त्यांतच खोबऱ्याचें तुकडे मिसळून ते भाकरी भाजत असत. तीहि पूर्ण भाजलेली नसे. अर्धीकच्चीच भाजलेली असे. ती चिकचिकीत भाकरी ते चिक्की खाल्ल्यासारखी खात असत.

पहिल्या दिवशींच त्यांच्यासमोर बसून मी पत्रावळीवरली भाताची रास उठवूं लागलों तेव्हां ते अस्वस्थ झाले. या वयांतला पोरगा हें एवढें अन्न खातो हें पाहून ते स्तंभित झाले. माझें जेवण चालू असतांनाच ते गंभीरपणें मला म्हणाले, "बाळ आपू, आपला देश गरीब आहे. दरिद्री नारायणांचा आहे. आपण एवढा दोघांचौघांचा भात जेऊं नये. तुझ्यासारख्यानें चार घांस कमी घेतले तर तेवढे इतर भुकेलेल्या लोकांच्या पोटीं जाऊं शकतील!"

तें ऐकतांच मी पुन्हां भात घेतला नाहीं. पत्रावळींत होता तोच कसाबसा संपवला आणि मी पानावरून उठलों. इतर भुकेलेल्या लोकांसाठीं चार घांस कमी जेवणें मला शक्य नव्हतें. म्हणून दुसऱ्या दिवसापासून डॉ. रामदासांचें जेवण संपल्यानंतर मी जेऊं लागलों. त्यांच्यासमोर जेवायला बसूं नकोस, मेला दृष्ट लावील असा मला आईनें उपदेश केला. भात जेवायला सुद्धां नशीब लागतें, भाकरी खाऊन गांवभर चरणाऱ्याला भाताची कसली आली चव असें म्हणून आजीनें संताप व्यक्त केला.

त्यांच्यासमोर बसून मी जेवायचें थांबवलें. तथापि मीं भाताचें प्रमाण कमी केलेलें नाहीं असा त्यांना संशय आला असावा. कारण ते पुन्हां एकदां म्हणाले, "बाळ आपू, गरगरीत फुगणें हा बळाल्याचा गुणधर्म आहे. माणसाचा नव्हे. माणसानें फक्त जिवंत रहाण्यास आवश्यक तेवढेंच अन्न खावें. त्यामुळें मन संयमी होतें. खूप खाऊन शरीर सुटत गेलें तर उठण्याबसण्यापासून तो समाजकार्यापर्यंत साऱ्या हालचालींत जडत्व येतें. शारीरिक जडत्व बुद्धिमांद्यास कारणीभूत होतें." त्यामुळें हा माणूस सहभोजनासाठीं आला आहे. कीं मला आळवण्यासाठीं आला आहे असा प्रश्न सारखा माझ्या मनांत येत असे.

आबांना सुद्धां ते धड जेवूं देत नसत. त्यांच्या पानावरल्या भाज्या पाहून डॉक्टरसाहेबांची टीका सुरू व्हायची. भाज्या नुसत्या अर्ध्या कच्चा शिजवाव्या आणि मीटमसाला न घालतां खाव्या असें त्यांचें तत्त्व होतें. त्यामुळें कधीं एकदां सहभोजन आटोपतें आणि ही पीडा परत जाते असें आबांना झालें होतें.

तथापि सहभोजन पार पडल्याशिवाय ही पीडा जाणार नव्हती!

पण महार आणि चांभार यांना पंक्तींत घेऊन सहभोजन करायचें कसें? प्रथम अनेकांनीं हो हो म्हटलें तरी खुद्द त्या दिवशीं कोणी आला नव्हता. शेवटीं अब्रू आणि धर्म या दोन्हींचा बचाव करण्यासाठीं आबांनीं कट रचला. त्या कटाला खुद्द महार-चांभारांचाहि दुजोरा मिळाला. कारण डॉ. रामदासांच्या प्रचारानें बरेचसे महार आणि चांभार अस्वस्थ झाले होते. बामण आणि कुळवाडी यांच्या पंक्तींत बसून आम्ही गांवांत भ्रष्टाकार करणार नाहीं, आम्ही आमच्या परंपरेनें वागणार असें ते हट्टानें सांगूं लागले. इतकेंच नव्हे तर हें भलतें खूळ गांवांत आणलें म्हणून डॉ. रामदासांना "खूळो डाक्टर" अशा नांवानें संबोधूं लागले.


हीं दिवाळी व नवें वर्ष आमच्या ग्राहकांस व हितचिंतकांस सुखाचें व समृद्धिचें जावो!



ट्रिनीटी पेपर
कार्पोरेशन पेपर अँड बोर्ड

टेलिफोन : २६१०५१

ऑफीस : २४५ फ्रीअर रोड मुंबई १

दुकान : लुकमन बिल्डिंग, पाकमोडी स्ट्रीट मुंबई ३







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

त्यामुळें आबांचा कट पक्का झाला. त्यांनीं पंचवीस कुळवाडी बोलावले आणि सांगितलें, तुम्ही उद्यां सहभोजनाला महार होऊन यायचें. तुमचीं आडनावें आणि जातकुळी सांगायची नाहीं. आणखी दुसऱ्या पंचवीस कुळवाड्यांना सांगितलें, तुम्ही चांभार होऊन यायचें. एकमेकांत मिसळून बसायचें आणि जेवायचें. पण आपण कुळवाडी, भंडारी आहोंत हें कळूं द्यायचें नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सहभोजन. परगांवाहून आलेले कार्यकर्ते सकाळपासून राबत होते. भात, वडे, गुळवणी आणि डाळीची आमटी एवढे पदार्थ करण्यांत कार्यकर्ते दंग झाले. सुमारें पांचशें लोक जमणार होते. डॉ. रामदास स्वतः एकहातीं पूर्णान्न नांवाचा खाद्यपदार्थ करणार होते. त्याची त्यांनीं सर्वत्र जाहिरात केली होती. सकाळपासून ते एकटे पूर्णान्नाच्या मागें हात धुवून लागले होते. पूर्णान्न म्हणजे काय? अनेकांना कुतूहल होतें. सायंकाळीं चार पांच वाजतांच दोंदोनशें लोक डॉ रामदास पूर्णान्न कसें करतात तें बघायला जमले होते. डॉ. रामदासांनीं ज्या ज्या भाज्या हाताला लागतील त्या सर्व कापून एका भल्या मोठ्या टोपांत टाकल्या आणि अर्धकच्च्या उकडल्या. नंतर उकडलेल्या भाज्या मुरडण्याचें काम सुरू झालें. शेवटीं त्यांचें एकजीव मिश्रण करण्यासाठीं त्यांनीं पूर्णान्न ढवळायला सुरवात केली तेव्हां अनेक प्रेक्षकांनीं तिथून जो पळ काढला तो परत तोंड दाखवलें नाहीं. ढवळायला योग्य, लांब साधन मिळालें नाहीं म्हणून त्यांनीं थेट कांखेपर्यंत आपला उजवा हात पूर्णान्नांत घुसवला आणि पूर्ण ढवळाढवळ सुरू केली.

पंक्ति बसूं लागल्या तेव्हां बनावट महार-चांभार हजर झाले. आबांनीं त्यांच्या हे महार, हे चांभार असें सांगून ओळखी करून दिल्या. तेव्हां डॉ. रामदासांनीं त्यांना प्रेमभरानें आलिंगन दिलें आणि सर्वांना पक्तींत बसवलें. जेव्हां खुद्द डॉ. रामदासच पूर्णान्नाचा टोप घेऊन वाढायला आले तेव्हां तर कहरच झाला. ज्यांनीं तें कसें केलें तें पाहिलें होतें ते तर नको-नको म्हणत पत्रावळीवर आडवे झाले. तरीहि पूर्णान्न जबरदस्तीनें पत्रावळीवर पडलेंच. कोणी त्याला स्पर्श केला नाहीं ही गोष्ट वेगळी. अर्थात् त्यामुळें सारे लोक कंटाळून कंटाळून जेवले. जेवणें चालू असतांना पूर्णान्नाची सात्त्विक महति सांगत रामदास यजमानासारखे फिरत होते.

पक्तींत माझ्याशेजारीं माझा मित्र नरू बसला होता. त्यानें जेवण थांबवून बराच वेळ टक लावून रामदासाकडे पाहिलें आणि साक्षात्कार झाल्यासारखें करून हळूंच मला म्हणाला, "आपू, रामदासस्वामी ते हेच?"

"चल मेल्या! हे कसचे? हे नुसते रामदास. ते रामदासस्वामी निराळे. त्यांनीं खूप वर्षांपूर्वी समाधि घेतली."

नरूला रामदासस्वामींचें नांव नुसतें ऐकून माहीत होतें. त्यानें कुठें तरी चित्रहि पाहिलें होतें. पण जन्म-मृत्यूसंबंधीं कांहीं माहिती नव्हती. पण रामदासस्वामी फार वर्षांपूर्वी होऊन गेले आणि त्याच्या समाधीचें दर्शन घेतलें पाहिजे असें आमचे शेजारी वामन दाजी कुळकर्णी म्हणत असत. तें ऐकलें होतें मीं. त्यामुळें रामदासस्वामींनीं फार वर्षांपूर्वी समाधि घेतली एवढी मी नरूच्या ज्ञानांत भर घालूं शकलों.

त्यावर नरू म्हणाला, "तांच म्हटलां, चित्रांत रामदासस्वामींची लगोटी असता. आणि हेंचो पंचो दिसलो!"

डॉ. रामदास हे रामदासस्वामी नव्हेत हें कळतांच नरू टिंगल करायला मोकळा झाला. म्हणाला, "अहो, तुमचां पूर्णान्न आणा थोडां!"

तीनचारशें लोकांच्या पंक्तींत पूर्णान्न परत मागणारा नरू एकटाच.

त्यामुळें डॉ. रामदासांना पराकाष्ठेचा आनंद झाला.

ते धांवत गेले आणि टोप घेऊन आले. नरू पुरे म्हणेना. त्याच्या पत्रावळींत पूर्णान्नाचा ढीग पडला. मलाहि आश्चर्य वाटलें.

"बाळ, नांव काय तुझें?" त्यांनीं आपुलकीनें चौकशी केली.

"नरू!"

"ठीक-ठीक! तुला पूर्णान्न आवडलेलें दिसतें!"

"छा!" नरू पत्रावळ उचलीत म्हणाला, "कुत्रा तरी तोंड लायतां कांयतंय—"

त्याबरोबर पूर्णान्नाचा टोप तिथेंच टाकून दाढी चोळत रामदास जे तिथून पळाले ते सारे लोक जेऊन उठेपर्यंत तिथें दिसले नाहींत.

अशा रीतीनें सहभोजन आटोपलें.

कार्यकर्ते थकून भागून परतले.

शिल्लक राहिलेलें किती तरी अन्न रात्रीं खऱ्याखुऱ्या महार-चांभारांनीं खाल्लें.

गांवांतले महार चांभार जागृत आहेत. अन्य लोक पुरोगामी आहेत. तंटाबखेडा न करतां सर्वजण एकमेकांत मिसळले आणि सहभोजन यशस्वी केलें असें सर्टिफिकेट डॉ. रामदासांनीं दिलें.

आणि "मेले खुळे सहभोजन करतले!" असें म्हणत गांवांतले लोक नंतर आठवडाभर डॉ. रामदासांची चेष्टा करीत राहिले.

हीं माणसें—हे प्रसंग यांना अंत नाहीं. भोंवतालच्या परिस्थितीनें जशीं घडविलीं तशीं झालीं. परिस्थितीमुळें जसें वागावें लागतें तशीं तीं वागलीं. आंत एक बाहेर एक असा प्रकार नाहीं. दाखवायचे दांत एक आणि खायचे दुसरे अशी रीत नव्हती; उलट दाखवायला तेवढे दांत आहेत; पण खायला कांहीं नाहीं असा प्रकार होता. जसें जमलें तशीं तीं जगलीं. त्यांच्या वागण्यांत सांगड नव्हती. स्वभावावर वेगड नव्हती.

हीं जिवंत माणसें या गावांत जन्मलीं, वाढलीं आणि आतां त्यांतलीं बरींचशी गेलींहि. आपल्या पश्चात् आपली कोण आठवण काढील, कुणाच्या मनांत आपल्याला स्थान असेल किंवा नसेल याची त्यांनी अपेक्षा धरली नाहीं; तशी फिकीरहि केली नाहीं;

पण माझ्या अंतर्मनांत मात्र हीं माणसें आपल्या अनामिक व्यक्तित्वाचा एक जिवंत ठसा उमटवून गेलीं. उभ्या जन्मांत त्यांची उचलबांगडी होणार नाही. क्रम लागेल तशीं त्यांना साकार केलीं पाहिजे...! ● ● ●

(ही लेखमाला क्रमशः मासिक दीपावलीत वाचा)

भारत सरकारकडून 'रजिस्टर्ड' केलेलें

पांढरे डाग

औषध किं. ५ रु., पो. ख. १। रु. माहिती मोफत मागवा.

दमा, श्वास रोगांवर अनुभविक गुणकारी औषध. किं. ५ रु., पो. खर्च १। रु.

कोणतींही औषधे मिळतात. धोकेबाजापासून सावधान

वैद्य के. आर. वोरकर, आयुर्वेदभवन (दिपा)

मु. पो. ता. मंगरूळपीर, जि. अकोला (महाराष्ट्र)







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

*काकूनं उपाय सुचवला. मंदाला थोडावेळ गरगरल्यासारखं झालं; पण तिलाहि तोच एक मार्ग बरोबर वाटला. तिला मारल्याखेरीज गत्यंतरच नव्हतें.*

# पाप

मनोहर तल्हार

आनंदा, ए आनंदा, अहो बर्वे.

त्याच्या कानांवर दोनतीनदां हाका आल्या. त्यानं मागें वळून बघितलं. राजा देशपांडे त्याच्याकडे घाईघाईनं येत होता. त्याच्याजवळ येऊन राजा देशपांडे त्याला म्हणाला—

"किती हाका माराव्यात रे? कांहीं सीमा?"

आनंदा नेहमीप्रमाणं गालांतल्या गालांत हसला आणि कसलीही उत्सुकता न दाखवतां एकटक त्याच्याकडे पाहूं लागला.

"नंदा, तुझी ही मख्खपणाची आदत कायमच आहे वाटते लेका. तुला कांहीं आहे रे?"

"काय?" आनंदानं मिस्कील हसून विचारलं.

"लाज म्हणजे काय तें माहित आहे ना तुला? की विकली बाजारांत? ऑं—? काय?"

"एवढ्या मोठ्या गोष्टी माझ्यासारख्या पामराला कशा कळव्यात हें तूंच सांग. तुझ्यासारख्या—"

"बस्स बस्स. पुरे कर. तुझ्यासारखा निर्लज्ज मानवप्राणी मीं अजून बघितला नाहीं कुठें! इथून माझी बदली व्हायला दहाबारा महिने तरी निश्चितच झाले असतील. त्या अवधींत माझ्या तीन पत्रांना फक्त तुझं तीन ओळींचं एक पत्र आलं. आणि आत्तां मी तुला इथें दिसलों तरी तुझ्या चेहऱ्यावर आनंद, कौतुक, औत्सुक्य, कांहीं कांहीं तर बघायला मिळायला हवं होतं मला? पण तूं आपला हा असा! कांहीं बोलशील तर शपथ! नुसतं गालांतल्या गालांत हसणं. अरे मी म्हणतों, अऱ्या गृहस्था, तें तरी कशाला हवं? काय? इतक्या दिवसांनंतर मी तुला भेटलों, भेटल्यानंतर माझी कांहीं वास्तपुस्त, माझ्या तब्येतीची काळजी—निदान नाहीं कांहीं तर मला म्हणायचा हवंस तूं आतां की राजा चल त्या समोरच्या हॉटेलांत, चहा घेऊं या—पण तुझं आपलं असं—गालांतल्या गालांत हसणं!"

आणि राजानं गालांतल्या गालांत हसून नक्कल केली.

"संपलं एकदांचं तुझं पुराण!" आनंदा त्याच्या हसण्याच्या नक्कलेवर हसत म्हणाला.

"कसा आलास वळणावर?"

"तूं इथें कसा आलास?"

"लग्नाला!"

"कुणाच्या?"

"तुझ्या बहिणीच्या!"



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

"राजा, असा आडून टोमणे मारूं नकोस. माझ्या बहिणीच्या लग्नाला तुला बोलावलं नाहीं म्हणून तुझा राग असेल माझ्यावर. रागाव. हरकत नाहीं. तुझा राग मला फार आवडतो. अलिकडे घरांत कुणीच माझ्यावर रागवत नाहीं!"

"तुमचा राजू तुमच्यावर—अरे हो बरी आठवण झाली. आजची तारीख १० मे १९६० ना? मिस्टर आनंदराव, मला आत्तांच्या आत्तां तुमच्या घरीं आलं पाहिजे!"

"कशाला?"

"तुमच्या चिरंजीवांना 'कॉंग्र्याच्युलेशन्स' द्यायला!" आनंदाचा चेहरा एकदम उतरला. आनंदाच्या तोंडून एक शब्दही फुटूं नये, पण तो कसाबसा म्हणाला—

"सॉरी मिस्टर राजा देशपांडे. यंदा राजूचा वाढदिवस होणार नाहीं!"

"कां? काय झालं? काय, झालं तरी काय नंदा?"

"कांहीं नाहीं...कांहीं नाहीं. राजू गेला रे!"

राजा देशपांडेनें त्याच्या दोन्ही खांद्यांना आपल्या हातांनीं दाबून धरलं. नंतर पाठीवर थोपटलं. म्हटलं—

"नेव्हर माईंड. बहुतेक त्याला कारण ती म्हातारीच असेल!"

"हूं!"

"चल्......आपण समोरच्या कॅफेमध्यें चहा घेऊं! चलतोस ना?"

आणि आनंदाकडून होकार—नकार न मिळतांच राजानं त्याचा हात धरून जवळजवळ ओढतच त्याला हॉटेलकडे नेलं. बराच वेळानं राजा म्हणाला—

"थोडा चहा घे, म्हणजे बरं वाटेल."

दोघेही 'कॅफे'च्या कंपार्टमेंटमध्यें आले. कंपार्टमेंटचा पडदा सारून राजानं ठाकठीक केला. खिशा चांचपडून चार मिनारचं पाकीट काढलं आणि सिगारेट पेटवून भराभर धूर सोडूं लागला. अस्वस्थपणें राजाच्या चेहऱ्यावरची उदासीनता पाहून आनंदाला भडभडून आलं. वाटलं, त्याच्या गळ्यांत गळा घालावा आणि मोठ्यांदा हंबरडा फोडावा. हमसून हुमसून रडावं आणि सारं दुःख ओकून टाकावं. मन हलकं करावं. पण तसं कांहीं झालं नाहीं. त्यानं सगळं आवरलं. म्हणाला—

"मलाही दे एक सिगरेट!"

"फार कडक आहे!"

"असूं दे!" आनंदानं राजाकडून सिगारेट घेतली आणि पेटविली. सपाटून ओढून धूर सोडूं लागला. मग झोपेंत बडबडावं तसा म्हणाला—

"राजा, मला नेहमी अलिकडे एक प्रश्न भेडसावतो आहे, मी मेलों तर माझ्या मंदाचं कसं व्हावं? कसं होईल रे तिचं?"

"मूर्ख झालायस कां रे नंदा? काय, झालं काय तुला मरायला? ऑं? काय म्हणतो मी?"

तशाही स्थितींत आनंदा गालांतल्या गालांत हसला. म्हणाला—

"काय व्हायचं राहिलं? तूंच सांग. आई गेली ती म्हातारी आजारां-तून उठल्यानंतर. तिसऱ्या वर्षी पुन्हां म्हातारी आजारी पडली. बरी झाली आणि नंतर एका महिन्यांतच बाबा गेले. सुलभाचं लग्न केलं तांतडीनं म्हणून ठिक नाहीं तर राजूचं भाग्य तिला लाभलं असतं. सहा महिन्यां-पूर्वी म्हातारीनं राजूला गिळलं...आणि असाच एखाद्या दिवशीं मी गेलों तर माझ्या मंदाचं—कसं व्हावं? राजा, कसं व्हावं रे तिचं?"

कांहीं विचार करूं नकोस कांहीं होत नाहीं. तुला निष्कारणच तसं वाटतं. कदाचित् हा योगायोगही असेल. तूं 'नर्व्हस' होऊं नयेस.

"काय? काय म्हणतो मी ते ऐकतोस ना? आपल्या मनावर सतत एखाद्या विचाराचा पगडा बसत गेल्यामुळें तो विचार असत्य असूनही सत्य वाटूं लागतो. ही 'सायकॉलॉजी' आहे; मग तो केवळ एक भास म्हटला—पाहिजे, काय? काय म्हणतों मी? ऑं? असला विचारच करूं नये!—काय? समजलास ना?"

राजानं चहा पिऊन झाल्यावर पुन्हा एक सिगारेट पेटवली. पुन्हा नाकतोंडाबाहेर धूर सोडूं लागला. बऱ्याच वेळानंतर तो म्हणाला—

"मी इथें आतेबहिणीच्या लग्नाला आलों आहें. लग्न परवांला म्हणजे बारा तारखेला आहे. सकाळीं साडेसातला. आज मी तुझ्याकडे येणार होतोंच. ही घे तुझी पत्रिका!"

त्याने आपल्या खिशांतून एक पत्रिका काढली. तीवर आनंदाचं नांव लिहून त्याला दिली.

"सोबत वहिनीला आण, बरं कां? आणि नेहमी डोक्यांत राख घालून बसत जाऊं नकोस असा, काय? राजू गेल्याचं ऐकून खूप वाईट वाटलं. किती तें बोलून दाखविण्यासारखं नाहीं. चल्. बाहेर पडूं या,"

दोघेहि उठले. आनंदा राजाच्या मागोमाग कोलमडल्यागत चालूं लागला. राजानं काऊंटरवर पैसे टाकले आणि दोघेही रस्त्यानं चालूं लागले. बरेच दूरपर्यंत आल्यावर राजा म्हणाला—

"नंदा, शक्य झालं तर उद्यां सकाळीं येईन मी तुझ्याकडे पण वाट बघूं नकोस!"

"ये. अवश्य ये. मंदाला बरं वाटेल तूं आल्यानं!"

"प्रयत्न करीन. पण येणं झालं नाहीं तर परवांला लग्नांत भेट होईलच. वहिनीला घेऊन येशील. मी चलतों आतां—" राजानं आनंदाला पुन्हां थोपटलं व तो निघून गेला.

विचारांनीं आनंदाचं डोकं सुन्न झालं. त्या वारंवार येणाऱ्या विचा-रांनीं तापूं लागलं. विचार करूं नये म्हणून हजारदां ठरवूनही नकळत तेच ते विचार येऊं लागतात. मग आनंदाला अगदीं नकोसं होतं. विचारांनीं डोकं कसं पोखरून निघतं.

तो घरीं आला तेव्हां त्याला म्हातारी नेहमीच्या ठिकाणीं दिसली नाहीं, ती कुठें बाहेर गेली असावीसं त्याला वाटलं. तो सरळ स्वयंपाक खोलींत असणाऱ्या बायकोजवळ आला. त्यानं तिच्याकडे बघितलं. ती उगाळलेल्या सुंठेचा लेप बोटांनीं निपटून खोलगट चमच्यांत जमा करीत होती. त्यानं प्रश्नार्थक नजरेनं तिच्याकडे बघितलं. ती त्राग्यानं म्हणाली,

"म्हातारीचं डोकं दुखतंय्!"

"आणखी?" त्याचा सूर निराळ्याच काळजीनं उमटला.

"अंगांत कणकण वाटते म्हणते!"

तो मनांतून घाबरला. पण त्यानं स्वतःला सावरलं. उसन्या अव-सानानं म्हणाला—

"ॲस्प्रो घेऊन येतो. कडक कडक चहा कर सुंठहळदीचा. ॲस्प्रो आणि चहा घेतल्यानं बरं वाटेल म्हातारीला!"

तिनं मान वर करून त्याच्याकडे बघितलं. मग थांबून ती म्हणाली—

"बरं वाटेल म्हातारीला? मरूं द्या ना मेली तर. पिडा तरी जाईल घरांतली......!"

"अग ए, जरा हळू तरी बोल. म्हातारीला ऐकूं जाईल."

"जाऊं द्या!"

तिनं रागाच्या भरांतच भरलेला सुंठेच्या लेपाचा चमचा विस्तवावर


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

ठेवला. थोड्या वेळांतच खद्‌खद् शिजून त्यावर साय जमली. तिनं तो चमचा उचलला आणि ती टाण्‌टाण् पाय आपटीतच म्हातारीकडे गेली.

म्हतारीचें कण्हणें सुरूच होतें—

"अयाई ग...आई ग. मेल्यें...रामा मेल्यें......लवकर ने रे रामा...मेल्यें ग सूनबाई...अरे रामा...हं हं हंऽऽऽ हंऽऽऽ हंऽऽऽ...रामाऽऽऽ वाचव रे...मेल्यें ग...हं हं हंऽऽऽ लौकर ने रे रामा...मेल्यें ग...वाचव रे रामा..."

"जास्त बडबडूं नका सुंठ लावून देत्ये. बरं वाटेल जरा. नंतर चहा घ्या थोडा."

"सूनबाई,......आपल्याकडे थर्मामिटर आहे ना?"

"..............."

"सूनबाई, एकते आहेस ना?"

म्हातारीने डोळे उघडून मंदाकडे बघितलें. तशी मंदा म्हणाली—

"अं...हो. आहे ना!"

"माझा ताप बघून घे बरं!"

सुंठेचा लेप लावून झाल्यावर मंदानं लेपाचं बोट वाटीला निपटून घेतलं आणि पदर सावरून ती म्हातारीजवळून उठली, स्वयंपाक खोलींतल्या मोरींत वाटी ठेवून हात स्वच्छ धुवून घेतले. शेगडींतले कोळसे चांगले धगधगूं लागले होते.

तिनं खिचडीसाठीं पातेलं ठेवलं. कांहीं तरी आठवल्यामुळें ती विचार करूं लागली. आणि मग तिला त्या तापलेल्या पातेल्याची आठवण झाली. तिनं घाईघाईनं पातेल्यांत पाणी ओतलं. फोडणी दिल्यासारखा आवाज झाला. त्या आवाजानं तिला थोडं दचकल्यासारखं झालं.


दीपावलीचें शुभचिंतन!

समृद्धि आणि सुबत्ता यांचे प्रतीक म्हणजेच

रस्टन

ऑइल एंजिन

ग्रीव्हज् कॉटन अँड कं लि


दिवाणखान्यांत चाहूल लागली. तिनं दारांतून बघितलं. आनंदा ॲस्प्रोची वडी हातांत घेऊन आला होता. आनंदानं कपडे बदलले आणि आंत—स्वयंपाकखोलींत आला.

"स्वयंपाकाला किती वाजतील?"

"खिचडी मांडली आहे. एक तास तरी लागेल—तोंवर चहा करून देऊं कां?"

"नको. चहा मघांशीच झाला. राजा देशपांडे भेटला होता. परवांला त्याच्या आतेबहिणीचं इथं लग्न आहे. आपणां दोघांना त्यानं लग्नाला बोलावलं. चलशील कां?"

"बघूं, थर्मामिटर कुठें ठेवलंत?"

"कां?" धक्का बसल्यागत आनंदानं विचारलं.

"कांहीं नाहीं. म्हातारी म्हणते ताप किती आहे बघून घे म्हणून, म्हणून हवंय्, कुठें आहे!"

"माझ्या त्या लाकडी पेटींत आहे!"

"तुम्हीं बघून घेतां का ताप? मला किनई म्हातारीची थोडी भीति वाटते. तुम्ही आत्तांच बाहेर गेलांत तेव्हां हुरहुरल्यासारखें वाटत होतं. तुम्ही ताप बघून घ्या; मी तोंवर म्हातारीसाठीं सुंठहळदीचा चहा करते. मग मोजून घेतां ना ताप?"

"हो. बघून घेतो. पण तुला भ्यायला काय झालं?"

"मघांशी मी विचार करीत होतें- सुंठेचा लेप म्हातारीच्या कपाळाला लावतांना की--आतां कुणाची पाळी- तुमची की माझी! मी मेलें तर तुमचं कसं होईल हो?"

काय खूळ घेऊन बसली आहेस मरणाचं? जें घडलं तें योगायोगानं. असं काय नेहमींच होत कां? मघांशी राजा देशपांडे म्हणाला होता की हा योगायोग आहे म्हणून. आणि आपण निष्कारण तिच्या आज रानून उठण्याचा आणि नंतर होणाऱ्या कुणाच्या तरी मृत्यूचा संबंध लावतो आहोंत. तसं कांहीं नाहीं. हा नुसता योगायोग आहे. आणि तुझ्या डोक्यांतलं हें भूत काढून टाक बरं आधीं. हा विचार पक्का मनांत शिरला म्हणजे तो खरा वाटूं लागतो. वास्तविक तसं कांहीं नसतं. कसं? मनावर असल्या गोष्टींचा पगडा सहज बसतो. तो एक मानसशास्त्रीय परिणाम आहे. परंतु मनांतून—"

"विचार करीत नाही म्हटलं तरी अगदीं आपोआप विचार सुरू होतात. म्हातारीनं मघांशी माझ्याकडे डोळे वटारून बघितल्यासारखं वाटलं मला. अगदीं खरं सांगतें--तिनें डोळेच वटारले होते!"

"तो भास असावा."

"भास कसला? तिनं मला कांहींसं विचारलं. दोनदां. मी विचारांत गढल्यें असल्यान मला कांहीं कळलं नाहीं. परंतु मग मात्र खूप खणखणीत आवाजांत विचारलं. डोळे वटारून...हें अस्सं—" मंदानं म्हातारी सारखे डोळे वटारून दाखविलें.

"हें बघ, आजारीं माणसं आजारपणांत अशीच चिडचिड करीत असतात. त्यांत वाईट उद्देश कांहीं नसतो. प्रथम, तूं विचार करणं सोडून दे पाहूं. आतां सव्वा सात होत आले आहेत. मधल्या घरांत अजून दिवा लावला नाहींस! कां?"

आनंदा म्हातारीच्या खोलींत आला. खोलींत सर्वत्र अंधार होता. खिडक्या बंद असल्यामुळें खोलीचा विचित्र दर्प येत होता. दाराच्या चौकटींत असलेलें विद्युत्‌बटन दाबल्यावर खोलीभर प्रकाश पडला तेव्हां



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

आनंदाला कळलं की म्हातारीला ओकारी होऊन तिचे कपडे त्यामुळें भरले आहेत. आनंदानं हाक घातली—

"मंदा. काय करते आहेस ? पाणी आण थोडं. आजीला ओकारी झाली आहे !"

आनंदा उठला आणि त्यानं खिडकीचीं दारें मोकळीं केलीं. हवा बिलकूल बंद होती. दारें उघडल्यावर जराही हवा आंत आली नाहीं. त्यानं आपल्या शर्टचा समोरचा भाग दोन्ही हातांच्या चिमटींत धरून वरखालीं केला. त्याचा थोडं बरं वाटलं.

एका हातीं चहा आणि दुसऱ्या हातांत पाण्याचं मोठं भांडं घेऊन मंदा दारांत उभी होती. "ये ना आंत !"

"हो." ती आंत आली. चहाचा कप खालीं ठेवून पाण्याचं भांडं सोबत घेतलं व म्हातारीजवळ जाऊन फडकं ओलं करून म्हातारीचं तोंड पुसलं. म्हातारीचं अंग चरंच तापलं होतं. त्या चटक्यानं मंदा शहारली, तिनं विचारलं—"ताप मोजला कां ?"

"नाहीं !" आनंदा थोडा थांबून मंदला म्हणाला—"म्हातारीचे कपडे आणि अंग ओल्या फडक्यान स्वच्छ कर प्रथम. नंतर ताप मोजून घेतों मी !"

आनंदानं थर्मामिटर झटकून उजेडांत आडवं धरलं. पारा संपूर्ण खालीं उतरला आहे याची खात्री झाल्यावर तें म्हातारीच्या तोंडांत ठेवलं. घड्याळाकडे बघितलं. एक मिनिट झाल्यावर तें काढून दिव्याला आडवं धरलं. "एकशे दोन ! बापरे !!" आनंदा स्वतःशींच पुटपुटला.

"आनंदा" म्हातारी डोळे मिटूनच म्हणाली.

"काय ?"

"कांहीं खायला केलं कां रे ! भूक लागलीय् मला. आंतडे आंतून खूप तोडताहेत."

"साबूदाणा करून द्यायला लावतो, तोवर हा चहा घे आजी."

आनंदानं म्हातारीला भिंतीशीं बसवलं. ॲस्प्रोची गोळी काढून ती तिच्या तोंडांत टाकली आणि चहाची बशी तिच्या तोंडाशीं धरली. म्हातारीनं बळें बळें गोळी गिळली. आणि ढमढसा चहा ढोसला :

"हो. तोंड कसं मातीसारखं झालं आहे बघ आनंदा, तूं—जेवलास काय ?"

"नाहीं."

"कंटाळल्यें मी या जगण्याला. शंभराहून जास्त वय झाली असेल माझी. झांशीच्या राणीनं लढाई केल्यानंतर चारपांच वर्षांनं माझा जन्म झाला म्हणतात, समजलास ?"

"स्वस्थ पड बरं. मरायची वेळ आली तर इंजेक्शन द्यायचंही काम पडणार नाहीं !"

"माझ्यामुळें तुम्हां दोघांना किती त्रास होतो हा—"

"तुला स्वस्थ पड म्हणून म्हणतो ना ?" आनंदाचा स्वर चिडका झालेला बघून म्हातारीनं झोपण्यासाठीं चाळवाचाळव केली. आनंदानं तिला गादीवर बरोबर झोपवलं.

निचेष्ट पडल्यागत म्हातारीनं डोळे मिटून घेतलें आणि कुठलीही हालचाल न करतां ती पडून राहिली.

आतां जेवायला जायला कांहीं हरकत नाहीं असें वाटून आनंदा स्वयंपाक खोलींत गेला. मोरींत हाततोंड धुवून दारावरल्या टॉवेलानं तें पुसलें. आणि भिंतीला टेकवलेला एक पाट मांडून त्यावर 'हुश्श' करीत बसला. मंदानं ताट पुढें केलं. त्यांत गरमगरम वाफाची खिचडी


# Kashinath Damodar Naik Ltd.

*Merchants, Agents & Manufacturer's Representatives*

**Margao – Goa**

*Distributor in Goa for*

1. Caltex India Limited
2. Britannia Biscuit Company
3. Tata Oil Mills Co. Limited
4. Parry & Company
5. Golden Tobacco Company
6. Cadbury & Fry
7. Dunlop Rubber Co. (India) Ltd.

# Sukdow Industrial Limited

**Sukdow Building**
**Margao – Goa**

*Distributor in Goa for*

1. Parle products Co. Pvt. Ltd.
2. Bharat Pulvertsing Mills Pvt. Ltd.
3. Mettur Chemical & Industrial Corp.
4. Andhra Roller Flour Mills.

# MANGAL MEDICALS

Prop. S K Naik, M.Sc.

**Mangal Building, Raji Ahmad Road, Wadala**
**Chemist, Druggist & Provision Stores**

*Wish Happy Diwali for all our Patrons*









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

भांड्यांतून उकरून ओतली. तळलेली तेलमिरची बाजूला टाकून कांद्याची भाजी वाढतन्न आनंदाला विचारलं—

"ताप किती आहे?"

"फार ताप नाहींयू. सकाळपर्यंत उतरून जाईल!"

"खरं कां?"

"बहुतेक!"

आनंदा व्हरांड्यांतील आरामखुर्चीत ताणून बसला. कसला तरी विचार करीत. बराच वेळ मन अस्वस्थपणें विचारांत गुंतलं. मनाची सारखी उलघाल सुरू होती. बऱ्याच वेळानं मंदा आली. म्हणाली...

"साबूदाणा तयार केला आहे. देतांना आजीला?"

"आजी, ए, आजी ऽऽऽ"

आनंदानं दोनतीनदां हांका घातल्या. परंतु म्हातारीनं जरा हूं की चूं केलं नाहीं. मंदा साबुदाण्याचं भांडं खालीं ठेवून जमिनीवर फतकल मांडून बसली. आनंदा म्हातारीच्या खाटेच्या लांकडी भागावर बसला व त्यानं म्हातारीला हलवलं. म्हातारीचं अंग खूप तापलं होतं. हाताला बसलेल्या चटक्यानं आनंदाला धक्काच बसला. परंतु त्यानं कांहींच झालं नाहीं असं भासवलं.

"थर्मामिटर दे बरं!"

"तुम्हीच मघांशी ताप मोजला ना? कुठें ठेवलंत?"

"मला वाटतं मी इथेंच विसरलो"

त्यानं गादीवर इकडे तिकडे बघितलं. म्हातारीच्या डोक्याजवळ तें पडलं होतं. त्यानं तें झटकलं. दिव्याला आडवं धरून पारा उतरला किंवा नाही ते बघितलं. पुन्हां दोनतीनदां झटकून पारा खालीं आणला आणि तें म्हातारीच्या तोंडांत ठेवलं. मिनिटाभरानं ते काढून घेतलं. डोळ्यावर विश्वास नसल्यासारखं त्यानं बघितलं. डोळे मोठाले करून. एकशें चारच्या पुढें पारा सरकला होता. तोंडाला कोरड पडली म्हणून आनंदा म्हणाला—

"पाणी आहे का?"

"कशाला?"

"प्यायला. थंड पाणी आण!"


भारतातील प्रमुख नागरी सहकारी बँक

दि सारस्वत को-ऑपरेटिव्ह बँक लि.

लाख

वसूल भांडवल... रु. — ९.५८

राखीव निधी ... रु. — १०.९१

ठेवी ........ रु. —३०५.४९

खेळतें भांडवल . रु. —३३५.००

मुख्य कचेरी सारस्वत बँक गृह, गिरगांव, मुंबई-४

शाखा: फोर्ट, दादर, वरळी, वडाळा, माहिम, पुणें व बेळगांव

महिला शाखा: गिरगांव, मुंबई-४

alco


ती लगबगीनं गेली आणि लोटा पेला घेऊन आली. आनंदानं दोन तीन पेले पाणी रिचवलं.

मंदानं अधीरतेनं विचारलं—

"ताप किती आहे?"

"मघांपेक्षां वाढला आतां. डॉक्टर बोलावून आणलं पाहिजे आतां समजलीस?"

"पण ताप किती आहे?"

"चार!"

"काय?" तिनं मोठ्यांदा विचारलं.

"कांही नाही." थोडा वेळ थांबून आनंदा म्हणाला—"डॉक्टर श्रीमाळींना मी घेऊन येतो!"

नंतर पुन्हां विचार करून तो पुन्हां म्हणाला—

"नाहीं तर असं करतो. आजीला 'हरकिन'मध्यें भरतीच करतो!

"कांहीं हरकत नाही."

मंदाच्या डोक्यावरचा ताण एकदम कमी झाला. तिला एकदम पिसासारखं हलकं वाटूं लागलं आणि चेहऱ्यावर हर्षंहि आलं. ती म्हणाली—

"साबूदाणा खात असतील तर बघा."

"अशा तापांत ती कांहीं खाणार नाहीं. आजी, ए आजी—"

म्हातारी पुन्हां कांही बोलली नाही. आनंदानं पुन्हां विचारलं—"

"आजी, ए आजी."

ती पुन्हां कांही बोलली नाही. नंतर म्हणाली—

"आनंदा, बाहेर बघ, राजू एकटा बसला आहे, त्याला आण बरं घरांत."

आनंद-मंदानं एकमेकांकडे बघितलं.

"ये. बाळ राजू, तुला घोडा हवा ना? बैस माझ्या पाठीवर. हं असा. छान. हं आतां चल...चल... घुर्रर...जाऊं आतां. आतां येऊंच नाहीं आपण!"

"मंदानं डोळ्याला पदर लावला. आनंदा तिला थोपटून म्हणाला—

"म्हातारी तापांत बडबडते आहे. पण तिला हा एकाएकी तापच कसा?"

"परवापासून त्यांना बरं नव्हतं. पण त्यांनी सांगितलंच नाहीं"

"मी असं करतों. येथून टांगा घेऊन येतों. तुला भीति वाटत असेल तर तूं व्हरांड्यांत थांब तोपर्यंत. किंवा शेजारच्या इंदिराकाकूंना बोलावून घे!"

दोघेही खोलींतून बाहेर पडले. व्हरांड्यांत आले. आनंदानं इंदिरा-काकूंना हाक दिली.

"काकू, अहो काकू!"

इंदिराकाकू लगबगीनं बाहेर आल्या. ओले हात लुगड्याला पुशीतच त्यांनीं विचारलं-"काय?"

"तुम्हांला थोडी सवड आहे काय?"

"कां?"

"मी. टांगा आणायला जातो. घरांत मंदाला एकटीला भीति वाटते!"

"म्हातारीची तब्येत पुन्हां बिघडली कां?"

"ताप आलाय्. सरकारी दवाखान्यांत भरती करावं म्हणतो. थांबतां कां थोडा वेळ मंदाबरोबर?"

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

"हो !"

आनंदा तांगा बघायला निघाला.

इंदिराकाकू कपाळावर आंट्या चढवून म्हणाल्या—

"काय मेली म्हातारी. प्रत्येक आजारांत कुणाला ना कुणाला खाणारी. मरूं तरी दे तिला एकदां !

"काकूबाई असं म्हणूं नका !"

"कां ग ? कांहीं भीति आहे काय त्या थेरडीची ? मेलीचा अस्सा राग येतो ! काय ग आणि तुला इतका पुळका कसला येतो म्हातारी-बद्दल ?...आतां आजारांतून उठून तुला विधवा व्हायच आहे की आनंदाला विधूर करायच–आहे ? आँ ?"

मंदाच्या डोळ्यांत टचकन् पाणी आलं. तें बघून इंदिराकाकू म्हणाल्या,

"असं रडत बसून नाहीं चालणार. कांहीं तरी केलं पाहिजे !"

"काय केलं पाहिजे ?"

"मला एक कल्पना सुचली. कान कर इकडे !" आणि काकू हलक्या आवाजांत कानांत पुटपुटल्या. काकूची कल्पना ऐकून मंदाला गरगरल्या सारखं वाटलं. तिनं स्वतःला सांवरलं म्हणाली—

"काकूबाई, हे कसं शक्य आहे ? आणि कुणाला कळलंतर कोणत्या थराला जाईल ही गोष्ट ?"

"ती मेल्याशिवाय गत्यंतर नाहीं. आतां तिला दवाखान्यांत नेऊन राहिलांत, तें कशासाठीं ? मरण्यासाठीं ? सांग पाहूं ?"

"बरी करण्यासाठीं ?"

"आणि ती आजारांतून उठली म्हणजे काय होतं तें मी तुला सांगावं कां ?"

"माझं डोकं तर बधिर झालंय काकू !"

तेवढ्यांत तांगा आला.

आनंदा आणि मंदानं म्हातारीला उचलून तांग्यांत बसवलं.

तांगा निघून गेल्यावर शेजाऱ्यांमध्ये ओघान्या चर्चा सुरू झाल्या. मंदा इंदिराकाकूंकडे थांबली. अधूनमधून काकू म्हातारीच्या आजाराचे गुण–दोष–फायदे–तोटे वर्णन करुन सांगूं लागली. बराच वेळ झाला. रात्रीं अकराला आनंदा घरीं परतला. मंदाला आवाज दिला तशी ती काकूच्या घरांतून बाहेर आली. तिनं विचारलं—

"भरती केलं?"

"हो? डॉक्टर ओळखीचाच आहे!"

"कोण!"

"वसंतराव देशमुख, गेल्याबरोबर आजीला भरती केलं आणि एक इंजेक्शन दिलं!"

"असं." मंदानं घराचं कुलूप उघडलं. ते दोघेहि आंत गेले. आनंदा खुर्चीत बसला आणि ती उभीच राहिली.

"आतां ताप कसा आहे?"

"टायफाईड आहे म्हणतात!"

"म्हणजे?" धक्का बसल्यामुळें मंदानं विचारलं.

"घाबरण्यासारखं कांहीं नाहीं म्हणतात. एका तासानंतर पुन्हां डॉक्टरांनीं इंजेक्शन दिलं. आणि आजीच्या देखभालीसाठीं एका चांगल्या नर्सला सांगितलं. रात्रीं आणखीन दोनतीन इंजेक्शन्स द्यावीं लागतील म्हणालेत डॉक्टर!"

"पण हें कशासाठीं?"





रवि वनस्पतिबद्दल लोकांना अभिमान वाटतो. कारण त्यामुळें घरांतील समारंभप्रसंगींचें वातावरण आनंदी राहते.

रवि वनस्पति हे एक ए व डी व्हिटॅमिनयुक्त अत्युत्तम अन्न आहे.

रवि व्हेजिटेबल ऑईल इंडस्ट्रीज, दावणगेरे (म्हैसूर राज्य)


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

लक्षांत ठेवा, 'माझदा लॅम्प अधिक प्रकाश देतात व टेंहि अधिक काल'




# माझदा लॅम्प लावून
## दीपावली अधिक प्रकाशमय करा

AEI-43 (D) MAR




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

"आजारांतून आजी बरी व्हावी म्हणून!"

"आणि बरी झाली म्हणजे?"

"तुला निष्कारणच असं वाटतं की मागच्यासारखं पुन्हा कांहीं होईल म्हणून. तें घडलं तें योगायोगानं. असं प्रत्येक वेळींच थोडं व्हायला बसलं?"

"पण मी म्हणते, पुन्हां तसं झालं तर?"

"असलं अभद्र कांहीं बोलूं नकोस!"

"न बोलल्यानं तें टळतं कां? काकू काय म्हणतात माहीत आहे?"

"काय म्हणतात?"

"त्या म्हणतात—" मंदा थोडी थांबली. नंतर ती म्हणाली—

"म्हातारी मेल्याशिवाय हें सत्र थांबणार नाहीं म्हणून!"

"मग काय म्हातारीला मारून टाकावं काय?"

"तसं कुठं म्हणतें मी. पण वांचवण्याचे तरी प्रयत्न कां करावेत?"

"दवाखान्यांत वाचवण्याचेच प्रयत्न करीत असतात."

"मीं तर असं ऐकलं की एखादी 'केस' हातीं लागत नसल्यास तसंच कुठलं तरी इंजेक्शन देऊन रोग्याला मोकळं करतात."

"पण ती 'केस' हातीं लागत नसणाऱ्या 'केस'ची गोष्ट! ही तशी कांहीं 'केस' नाहीं."

जरा वेळानं आनंदा म्हणाला—

"जास्त विचार करूं नकोस. झोंपून रहा शांतपणें!"

मंदानं झोपण्याची तयारी केली. झोपण्यापूर्वी ती आनंदाला म्हणाली—

"मला किनई, कसंसंच वाटतं आहे. बघा बरं हात लावून, थोडा ताप असल्यासारखं वाटतं. आणि डोकं सुद्धां दुखतं आहे!"

आनंदानं तिचा हात धरून बघितलं, किंचित्सं अंग गरम झालं होतं. आनंदा उसनं हास्य आणून म्हणाला—

"छे. कुठें आहे तापबिप? तुला आपलं निष्कारणच वाटतं आहे. तूं आपल्या डोक्यांतलं तें भूत काढून टाक पाहूं!"

"ताप नाहीं ना?"

"छे! बिलकूल नाहीं?"

"पण मला तर वाटतो आहे. थर्मामीटर आणूं का? मोजून तरी बघा.!"

"छे ग. कांहीं तरीच आपलं खूळ नको डोक्यांत भरून घेऊंस. मघांशीं आणलेली ॲस्प्रोची वडी घे. म्हणजे बरं वाटेल."

तिनं पाण्याच्या घोटाबरोबर गोळी घेतली. आणि अंग टाकलं. आनंदानंही अंग टाकलं. बराच वेळ झाला तरी आनंदाच्या डोळ्याला डोळा लागला नाहीं.

बऱ्याच वेळानंतर आनंदानं मंदाकडे बघितलं. ती डाराडूर झोपली होती. आनंदानं तिचा हात दाबून बघितलं त्याला तो थंड वाटला. मग आनंदाला वाटलं की आपला हातच अधिक गरम असावा. त्यानें मानेवर आपला तळवा उलटा दाबून ताप आहे किंवा काय याचा अंदाज घेतला. नंतर तळवा पोटाला लावून बघितला. बरगड्यांना हात दाबून तापाचा अदमास घेतला. थोडं अंग गरम होतंच. त्यानं अधीरेपणानं मंदाला उठविलं. ती झोपेंतून एकदम दचकून जागी झाली.

"दचकूं नकोस एवढ्यांदा. कांहीं झालं नाहीं. तुला एवढ्याचसाठीं उठवलं को आतां तुला तापबिप नाहींय. आतां तुला कसं वाटतं?"

"बरं वाटतं. मला वाटतं, मला चांगली झोंप लागली गोळी घेतल्यावर. नाहीं कां?"

"गोळी आहे कां?"

"नाहीं. मघांशी घेतली ती तेवढीच शिल्लक होती. कां? तुम्हांला हवीय् कां?

"होय. अंग थोडं कोमट वाटतंय्!"

तिनं आनंदाचा हात दाबून बघितलं. अंग थोडं गरम वाटलं. ती म्हणाली,

"छे. कुठें काय? कांहीं तापबिप नाहीं. तुम्हांला तसा भास झाला असावा."

"नाहीं ग. डोकंही थोडं ठणकतं आहे!"

"आतां तुम्हांला दगदग झाली आहे ना, त्याचा परिणाम असावा हा. दुसरं कांहीं नाहीं!"

"कांहीं कां असेना. पण थोडं वाटतं तसं!"

"तुम्हीं कसला तरी विचार करतांहात"

"मघांशी तूं इंदिराकाकूंनीं सांगितलेलं सांगितलं त्याचा!"

"मी भावनेच्या भरांत तशी म्हणाल्यें. त्याचा एवढा विचार करूं नका. माझं चुकलं!"

"तसं केलं तर?"

आनंदा बोलून गेला. मंदा आनंदून म्हणाली—

"पण डॉक्टर आपल्या म्हणण्याप्रमाणें करतील कां?"






स्विस ट्रेडींग कार्पोरेशन
८६ बी, नेताजी सुभाष रोड, मुंबई २.




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"न करायला काय झालं?" पण नंतर आनंदा लगेच म्हणाला, "पण ही फार मोठी जबाबदारीची गोष्ट आहे. उघडकीला आलं तर त्याचे परिणाम भयंकर होतील!"

"डॉ. वसंतराव देशमुख तुमच्या परिचयाचा आहे ना?"

"आहे!" आनंदानं कपाळावर आलेला घाम टिपला. अस्वस्थ झालेल्या आनंदाला मंदा म्हणाली—

"आतां झोपून राहा. काय करायचं तें पुढं पाहूं!" बऱ्याच वेळानं दोघांनाही झोप लागली.

दुसऱ्या दिवशीं आनंदा हवं नको तें बघायला दवाखान्यांत गेला. म्हातारी निश्चेष्ट पडली होती. नुकतीच ताप मोजून गेलेली नर्स आनंदाला बघून हसतमुखानें त्याच्यासमोरी आली. म्हणाली—

"रात्रीं कॅप्सूलच्या गोळ्या देण्याची तशी कांहीं आवश्यकता वाटली नाहीं. परंतु इंजेक्शन्‌ने दिलें. दोनचार दिवसांत ताप उतरून जाईल!"

"म्हणजे?"

"आजारांतून उठतील बऱ्याहून!"

"ऑं?" आनंदाला मनांतल्या मनांत धक्का बसला. त्यानें स्वतःला सावरलें. विचारलें—

"खायचं कसं?"

"कांहीं काळजी नको. अजून म्हणजे ताप उतरल्या दिवसापासून—पंधरा दिवस तरी खायला कांहीं देऊं नका. तसं इथं रोज दूध देण्यांत येतंच. तुम्ही काळजी करण्यासारखं कांहीं नाहीं."




"मी जाऊं आतां?"

"ओ. एस्. बाय ऑल मिन्स्!" नर्स हसून म्हणाली.

आनंदा घरीं परतला.

मंदानं विचारलं—

"तब्येत कशी आहे?"

"लवकरच बरी होईल, ती नर्स म्हणत होती!"

"नर्सला काय समजतं?"

"पाहूं या!"

दुसऱ्या दिवशीं आनंदा दवाखान्यांत गेला तेव्हां डॉक्टर स्वतःच हजर होते.

"मि. बर्वे, घाबरण्यासारखं तसं कांहीं नाहीं. रात्रीं कॅप्सूलच्या गोळ्या दिल्या म्हणजे होईल ताप कमी. आत्तां मी एक इंजेक्शन देतो. आठ दिवसांत तुम्हांला म्हातारीच्या प्रकृतींत फरक वाटेल, बरं कां?"

"थँक यू डॉक्टर! पण डॉक्टर—"

"काय?"

"इंजेक्शन कोणतं देणार तुम्ही?"

"पेनीसिलीनचं. कां?"

आनंदाला वाटलं की डॉक्टरांना सांगावं; असं इंजेक्शन द्या की म्हातारीनं पुन्हां आजारांतून उठूं नये.

"त्याचं असं आहे—"

"कसं?" डॉक्टरांनीं हंसून बघत विचारलं.

"असं इंजेक्शन द्या की म्हातारीनं पुन्हां—"

"अहो पण ती फार म्हातारी झाली आहे. पुन्हां ती आजारी पडणारच आणखी कधीं तरी. पण या आजारांतून मात्र ती उठेल. तुम्ही भलतें सलतें विचार करूं नका. Please! कसं म्हणतो?"

"मला असं म्हणायचं आहे—मला हें म्हणायचं आहे की ते इंजेक्शन—

"फार भारी आहे. तुम्ही काळजी करूं नका!"

आणि डॉक्टरांनीं अगदीं थोड्या वेळांत म्हातारीच्या दंडांत सुई टोचली. म्हातारीनं थोडी हालचाल केली. नर्सनें सुई टोचल्या जागेवर आयोडीनचा फवा लावला व ती जागा चांगली चोळली. म्हातारी पुन्हां तशीच पडून राहिली.

आनंदाला वाटलं की म्हातारीनं तसंच रहावं. नेहमीसाठीं.

"खरं म्हणजे काळजी करण्यासारखं कांहीं नाही मिस्टर बर्वे!"

"खरं?" आनंदा खरं म्हणजे फार मोठ्या काळजींत पडला.

आनंदा घरीं आल्यावर मंदानं विचारलं—

"तब्येत काय म्हणते?"

"बरी आहे! आज रात्रीं 'कॅप्सूल'च्या गोळ्या देणार आहेत!"

"आज शेजारच्या रमाकाकू आल्या होत्या!"

"कशाला?"

"म्हातारीची चौकशी करायला!"

"मग काय सांगितलं?"

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"तब्येत बरी होत आहे म्हटलं म्हातारीची !"

"मग ती काय म्हणाली ?"

"कांहीं म्हणाली नाहीं. फक्त लांब सुस्कारा टाकला !"

"हं ऽऽऽ" आनंदानं एक दीर्घ सुस्कारा टाकला.

"अगदीं असा सुस्कारा !',

"टाकूं दे !"

जेवण आटोपून आनंदा ऑफिसला गेला. ऑफिस सुटल्यावर तो दवाखान्यांत न जातां सरळ घरीं आला. घरीं आल्यावर मंदाशीं बोलत असलेल्या शेजारच्या दोनतीन बाया उठून आपआपल्या घरीं गेल्या.

आनंदानं मंदाला स्नानासाठीं पाणी घालायला सांगितलं.

बराच वेळ थांबून आनंदानं मंदाला विचारलं—

"मघांशी बाया कशाला आल्या होत्या ?"

"माझी चौकशी करायला !"

"म्हणजे ?"

"म्हातारीची तब्येत सुधारत असल्याचं त्यांना कळलं !"

"बरं मग ?"

"त्यांना असं वाटलं की तुम्ही किंवा मी या दोघांपैकीं बहुतेक कुणी तरी आतां आजारी पडणार. म्हणून त्यांनी माझ्या तब्येतीची चौकशी केली !"

"तूं काय सांगितलं ?"

"प्रकृती उत्तम आहे म्हणून !"

"हं—" आनंदानं एक लांब सुस्कारा सोडला.

"आणि हो. एक विसरलेंच. इंदिराकाकू आल्या होत्या !"

"कशाला ?"

"तें नाही सांगितलं. फक्त तुम्हीं आलां म्हणजे थोड्या वेळाकरितां पाठवून द्या म्हणाल्या."

थोड्या वेळानं आनंदानं जेवण केलं आणि इंदिराकाकूकडे गेला.

काकू कामांत होत्या तरी त्यांनीं बसायला सांगितलं. थोड्या वेळानं लिंबाचं सरबत त्या स्वतः घेऊन आल्या. पेला समोर करीत म्हणाल्या,

"सरबत घे थोडं !"

"नुकतंच जेवण केलं मीं !"

"म्हणून काय झालं ? लिंबाचं आहे !"

आनंदानं सरबत गटागट पिऊन टाकलं. अस्वस्थपणें विचारलं—

"मला कशाला बोलावलंत काकू ?"

"सहज बोलावलं. तुझी तब्येत वगैरे ठीक आहे ना ?"

"हो. चांगली आहे. चांगली खणखणीत आहे."

"तशीच असूं दे बाबा. देवाजवळच तेवढीच एक प्रार्थना आहे. मंदाला देखील प्रकृतीला जप म्हणावं. मी एकलं की म्हातारी बरी होते आहे मंदाला देखील प्रकृतीला जप म्हणावं. मी एकलं की म्हातारी बरी होते म्हणून. खरं आहे ना ?"

"हो." आनंदानं एक लांब सुस्कारा सोडला. थोड्या वेळानं आनंदा म्हणाला—"चलतों काकू."

"बरं. तुम्ही दोघंही प्रकृतीला जपावं हं !"

"हो !"


हीं दलाल आर्ट स्टुडिओची अभिमानास्पद प्रकाशनें !

क्राउन साईझ ● पृष्ठें ११६ ● मोहरेदार कागद ● जाड पुठ्ठा बांधणी ● अनेक रेखाकृति ● १४ तीनरंगी चित्रांनी नटवलेलें व रसाळ भाष्यानें सजविलेलें अनमोल पुस्तक

किंमत रु. ७॥ + १ रु. र. पो.




क्राउन साईझ ● पृष्ठें १०० हून अधिक ● मोहरेदार कागद ● जाड पुठ्ठा बांधणी ● प्रत्येक चित्राचे रसाळ भाष्य ● किंमत फक्त रु. ७॥ + १ रु. र. पो.



एकमेव विक्रेते :

अ. अं. कुलकर्णी,

कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रोड, पुणें २


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

गेल्या आठवड्यांत अनेकांनीं आनंदा-मंदाच्या तब्येतीची वासपुस केली आणि म्हातारीची तब्येत जसजशी सुधारूं लागली तसतसें आनंदाला वाटूं लागलें, आपणाला कांहींतरी होतें आहे. परंतु त्यानें आपल्या मनाचें समाधान केलें. आज सकाळीं जेव्हां आनंदा दवाखान्यांत गेला तेव्हां म्हातारी भिंतीला टेकून बसली होती. आनंदाला बघून ती क्षीणपणें हसली.

"काय आजी, तब्येत बरी आहे ना आतां?"

"अरे बाबा, या मुलीनं माझी खूप काळजी घेतली. अगदीं मुलीसारखी काळजी करणारी पोर आहे ही!"

"आजीबाई, तुम्ही जास्त बोलूं नका. ही औषध घ्या आणि पडा पाहूं!"

"पडते बाई, पण मला एक सांग, लाडू कधीं देशील?"

"कसले?"

"तुझ्या अन् डॉक्टरांच्या लग्नाचे आतां समजलीस?" ती खूप लाजली म्हणाली—

"हे हो काय आजी? मला नका विचारूं..."

"मग कुणाला विचारूं? डॉक्टरांना काय?"

"मला चिडवूं नका आजीबाई, नाहीं तर कडू औषध देईन तुम्हांला."

"अग तूं वीष जरी दिलं तरी मी आनंदानं घेईन."

एव्हांना ती निघून गेली. आनंदा उठला.

आनंदा निघाला. दारांत डॉक्टरांची गांठ पडली.

"हॅलो मि. बर्वे, अवर पेशंट इज ओक्के नाऊ!"

"थँक्यू डॉक्टर!"

"चार दिवसानं या. म्हातारीला डिस्चार्ज देऊं!"

चार दिवसांनं म्हातारीला डिस्चार्ज मिळाला. म्हातारीला घरीं आणलं आणि महिनाभरांत म्हातारी चालूं-फिरूं लागली.

आणि दोनतीन महिने झाले तरी मंदा आणि आनंदाची प्रकृति चांगली खणखणीत असलेली बघून शेजारांत आश्चर्य व्यक्त होऊं लागलं. कुणी समाधान व्यक्त करूं लागलं आणि कित्येकांना धक्का देणारी ती घटना वाटली.

आज तर इंदिराकाकू मंदाला म्हणाल्या देखील—

"मंदा, असं नेहमींच थोडं होत. मागं जें झालं तें योगायोगानं झालं असावं. यापेक्षां त्याला जास्त महत्त्व देऊं नये!"

"तेंच तर मी म्हणत्यें!"

इंदिराकाकू निघून गेल्या. आणि मंदाला त्यांच्या म्हणण्याचं थोडं आश्चर्यही वाटलं. परंतु मनाला त्यामुळें फार बरं वाटलं. म्हातारी चष्मा लावून डाळ निवडीत बसलेली पाहून मंदा म्हणाली—

"आजीबाई, राहूं द्या तें. मी निवडून घेईन!"

"अग होत तोपर्यंत करावं!"

मंदाला आज अगदीं हलकं फुल्कं वाटूं लागलं. अगदीं पिसाप्रमाणं. असंच पिसासारखं उडावं असंही तिला वाटलं. आनंदा ऑफिसमधून आल्यावर त्याला चहा तयार करून दिला. म्हणाली—

"इंदिराकाकू आल्या होत्या."

"काय म्हणाल्या?"

"मागं जें घडलं तें योगायोगानं घडलं असावं असं त्यांचं मत आहे!"

"मी नव्हतों म्हणालों मागं एकदां?"

"हो. आठवतं मला!" मंदाच्या चेहऱ्यावर आनंद मावत नव्हता. तिच्या प्रत्येक हालचालींतून तो ओसंडूं लागला. ती म्हणाली—

"आज आपण थोडं बाहेर जाऊं या. चलतां ना?"

"कशाला?"

"शॉपिंगला!"

मंदानं कपडे बदलले. आनंदाला आवडणारी अस्मानी रंगाची नऊवारी व त्याच रंगाची चोळी तिनें पेहरली. त्यांत ती फारच सुंदर दिसूं लागली आनंदाला. आनंदा तिच्याकडे विस्मयानं पाहून स्वतःशींच म्हणाला—

"छान!"

जायला निघाला तेव्हां तो आजीला म्हणाला—

"आजी, तूं जेऊन घे. आम्हांला तिकडे एका मित्राकडे जेवायला जायचं आहे!"

"बरं." म्हातारी हसून म्हणाली, "पण लवकर या. मी घरांत एकटी आहे म्हटलं!"

त्यांनीं बरंचसं हवंनको तें सामान खरेदी केलं आणि बिल चुकवून बाहेर पडतांना दुकानांत शिरणाऱ्या डॉक्टर वसंतराव देशमुखांना बघून आनंदा थबकला. म्हणाला—

"हॅलो डॉक्टर देशमुख, हाऊ आर यू?"

"क्वाईट वेल!"

आनंदा मंदाला म्हणाला—

"यांचा परिचय करून देतो. हे डॉक्टर देशमुख डॉक्टर वसंतराव देशमुख. आपल्या आजीला यांनींच ट्रिटमेंट दिली." आणि डॉक्टरांना आनंदा म्हणाला, "आणि ही माझी पत्नी-मंदा बर्वे!"

दोघांनींही एकमेकांना नमस्कार केला. आनंदा मंदाला म्हणाला—

"आणि मंदा ऐकलं कां, यानीं आपल्या आजीची जितकी काळजी घेतली तितकीच काळजी कु. नलिनी शर्मा या नर्सनींहि घेतली.

"व्हेरी सॉरी मिस्टर बर्वे; ती नर्स गेली!"

"काय, सांगतां काय डॉक्टर?"

"खरं सांगतोय् मी. गेल्या महिन्यांतच ती वारली. टायफाइड झाला होता तिला!" डॉक्टरांचा स्वर कातर झाला, परंतु चेहऱ्यावर उसनें हास्य होतें. आनंदाच्या तोंडून बराच वेळ शब्द फुटला नाहीं. नंतर तो स्वतः सांवरून म्हणाला—

"फार वाईट झालं डॉक्टर, फार वाईट झालं!" डॉक्टरांचा सूर एकदम बदलला. हळव्या स्वरांत ते म्हणाले...

"खरंच फार वाईट झालं!"

नंतर डॉक्टर स्वरांत स्वच्छता आणून व थोडंसं हसून म्हणाले—

"माझ्यामुळें तुम्हांला उशिर होईल."

आनंदा मंदानं कांहीं न बोलतां नुसते हात जोडले आणि तीं दोघं दुकानाच्या बाहेर पडलीं.

ते दोघंही बराच वेळ रस्त्यानं चालत राहिलीं. पण कुणीच कुणाशीं बोललं नाहीं.

बऱ्याच वेळानं आनंदा म्हणाला,

"असं वाटतं कीं असंच खूप चालत रहावं. खूप चालत रहावं. घरीं वापस जाऊंच नये."

"मलाही तेंच वाटतं!" मंदा भारावलेल्या सुरांत म्हणाली. परंतु दोघांचीही पाउलें मात्र घरच्याच दिशेनं वळलीं होतीं. • • •





अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

आमच्या सर्व ग्राहकांस व हितचिंतकास नविनवर्ष सुखाचें व भरभराटीचें जावो.

शंकर आणि कंपनी

प्रभात प्रोसेस स्टुडीओ

सर्व प्रकारच्या मुद्रणाला लागणारे सर्व प्रकारचे
उत्कृष्ट ब्लॉक्स हुकमी करुन मिळण्याचें
सुप्रसिद्ध ठिकाण

फोन :- २१६५७

धोबी वाडी, ठाकुरद्वार, मुं-२.






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका



डॉक्टर दमयंती सरपटवार, *पी. एच्. डी. या महाविदुषीनें आपल्या मृदुमृदुल सव्य करानें ललितललित प्रचुर भाषेनें खास दीपावलीसाठीं लिहिलेली ही एक पुराणकालीन प्रेमकथा.*

# ॥ नरस्तमाखुं न कदापि मुञ्चति ॥

मिथिला नगरींत कृष्णवर्मन् राजा राज्य करत असतां सर्वत्र सुबत्ता नांदत होती. स्मृतिकारांच्या आदेशाप्रमाणें प्रजाजन आपापल्या विशिष्ट व्यवसायांत निमग्न असल्यामुळें प्रजाजनांत अनिष्ट अभिनिवेश नव्हता. राज्यांतला द्विजगण मंत्रजपजाप्यकरणाचें आपलें दैनंदिन कर्तव्य पंचपन्न उषःकालापासून अष्टौप्रहरसमयापर्यंत परिपूर्ण करण्यांत यत्नशील असे. राज्यांतील मंदिरें मठ व विजनवासी आश्रम ह्यांचें कार्य यथासांग चालू राहावें म्हणून दर्भसमिधा, चंदनअगुरुकाष्ठ, घृत, पायस, अजापुत्रबलि इत्यादि यज्ञतर्पण साधनांची समृद्धि परिपूर्ण असून निश्शंक धर्मकार्य सुरू रहावें म्हणून आश्रमसीमाप्रदेशांची सुरक्षा करण्यासाठीं नगरींतल्या क्षत्रियजनांना शस्त्रास्त्रें पुरवून त्यांचें सुसज्ज व सुशिक्षित दल नगरीच्या चतुर्सीमाप्रदेशांत इतस्ततः जागृतपणें विरहत असे.

प्रस्तुत सैनिकदलांत कालकंप ग्रामनिवासी एक द्वादशवर्षप्राप्त महाजनक नामेंकरून तरुण होता. प्रत्येक सैनिकानें पंचवार्षिक शिक्षणक्रम पूर्ण केल्यानंतर त्याची नियुक्ति दलविभागांत विशिष्ट स्थानीं करण्यापूर्वी त्याला गृहस्थाश्रम व तत्संबंधीं इष्टकार्य पार पाडण्यासाठीं द्विसंवत्सरांची विश्रांति मिळे. आपलें सर्वांगीण शिक्षण पूर्ण होऊन आपण विवाहपात्र झाल्याचें महाजनकास आकलन होतांच तो स्वग्रामीं निवर्तला आणि उपवर कन्यकाचे संशोधनकार्य त्यानें सुरूं केलें. कालकंप ग्रामस्थ शतानंदशेटी ह्याची सुडौल कन्यका रतिमंजरी हिला एका प्रभातीं पंचप्रसादाच्या तडागीं पाहून तो विव्हल झाला. बालपणीं रतिमंजरी व तिच्या सख्यांसह महाजनक शतानंदाच्या अंगणीं कंदुकक्रीडा करीत असे. वृक्षलतांचीं पुष्पें खुडणें, आम्लीकावृक्षांचीं फळें पाडणें, करतालिकांचा खेळ खेळणें, कंचलीकेनें मुखावरण करून सांगोपांग हस्तस्पर्शानें व लबालिकान्वेष करणें इत्यादि विविध तनमनरंजक केलिसुखांनीं कालक्रमणा करीत असे. त्यावेळची दशएकादशवर्षीय लालनताडनयोग्य रतिमंजरी आतां षोडशोत्तरवर्षीय झाल्यामुळें अत्याधिक विलोभनीय वाटत होती. तिची चंपककली नासिका आतां विशेष संवेदनाक्षम व तरल झाल्यामुळें ती जणुं नाकवनिताच वाटत होती. तिचें आरक्त ओष्ठसंपुट हे कुसुमायुधाच्या आयत शरासना सारखें भासत असे. तिच्या सखोल हृदयाची गाढता तिच्या स्तनाभोगानें कल्पिता येत असे. तिचा कटिप्रदेश मृगेन्द्राशीं तुल्यरूप वाटत होता. तिचे उरूद्वय पाहून कर्दलीवृक्षांच्या कांडांची आठवण येत असे. वसंतऋतूंत जसा वृक्ष मोहरून पक्व फळांनीं भाराक्रान्त होतो तसा तिचा देहसंभार जागोजागीं भारावलेला दिसत असे. अशा मनोरमेकडे जर शरसिद्ध महाजनकाची दृष्टि वळली नसती तरच नवल होतें.

तत्पश्चात् प्रतिदिनीं इष्टकालीं मंदिरदर्शननिमित्तेंकरून पंचप्रसाद परिसरांत महाजनक उपस्थित राहूं लागला. कालांतरानें उत्थापित झालेल्या प्रणयभावनेमुळें उद्दीपित होऊन त्यानें रतिमंजरीचा अनुनय करण्यास सुरुवात केली. बाल्योद्भव कथाकेलींच्या स्मृतिसंदर्भानें रतिमंजरीचा हृदयाकार प्रस्फुटित करण्यास त्या कुशल सैनिकास विशेष श्रम आणि अवधि लागला नाहीं, महाजनक स्वतांही प्राकृतिकतया सुदृढ व पौरुषयुक्त असल्यामुळें त्या कामिनीस मादक मातंगाची अभिलाषा उत्पन्न होणें नैसर्गिक होतें. पण महाजनक सैनिकी शिस्तीमुळें व्रतस्थ असल्यामुळें त्याच्याकडून सीमित चर्चाकरणाव्यतिरिक्त विशेष रसग्रहणक्रियाकर्म होऊं शकलें नाहीं. सेनाकेंद्रांत असतांना पुष्कळदां तो अभ्यस्तकालीं विजनवासी होऊन धूमपान करीत विचारवंत होत असे. ह्या त्याच्या प्रकृतीवरून त्याला धूमप्राश असे उपाधिनामही प्राप्त झालें होतें. त्याच्या तमाखूपूरित धूम्रनालाची ज्वलनक्रिया सतत चालू असतांना धूमप्रक्षेपणामुळें 'यत्र यत्र धूमः तत्र तत्र महाजनकः' असें सैनिकगण परिहासानें म्हणत असत. महाजनकाच्या मुखग्रासित धूम्रनालानें त्याचें व्यक्तिमत्व अधिकच हृदयहारी वाटत असल्यामुळें रतिमंजरी विव्हल न होणेंच अस्वाभाविक ठरलें असतें. जसें वन्हिपरिसरांत नवनीत द्रवमान होतें तशी महाजनकसहवासानें रतिमंजरी द्रवीभूत झाली. त्या पंचप्रसादपरिसरांत त्या बालपरिचित प्रणयी युगुलाचें कूजन अखंडित सुरू होऊन विवाहदीक्षेसाठीं आसक्ति निर्माण झाली.

कालकंप ग्रामनिवासी शतानंदशेटीस ह्या संगमोत्सुक कन्येचा निश्चय ज्ञात होतांच त्यानें मध्यपुरुषाद्वारा महाजनकाच्या कुलाचाराचें संशोधन सुरू केलें. मध्यपुरुषानें महाजनकाच्या कुलशीलाची साग्र अन्वीक्षा करून शतानंदशेटीस कळविल्यानंतर त्या सुपित्यानें आपल्या कन्येस पाचारण केलें व तो तिजप्रत कथिता झाला, कीं महाजनकाचा पिता

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट
अनुक्रमणिका

टणत्कार हा जन्मजात वैश्य असला तरी कृतकर्मानें इपुधर असल्यामुळें आपल्या कुलवंशापेक्षां कनिष्ठ दर्जाचा ठरतो.

"पण तात, मला तत्संबंधीं प्रेमऋद्धि असल्यामुळें त्याच्या कुलवंशाची किंचित् हीनता अपण क्षम्य मानवी. तसेंच त्याचे इपुधर तात गतासु झाल्यावर त्यानें पितृक व्यवसायाशीं प्रसक्त न राहतां राष्ट्रीय धर्मास देह वाहून शस्त्रवृत्ति स्वीकृत केली ह्यामुळें त्याची महत्ता वृद्धिंगत झाली नाहीं काय ?"

"साधु साधु !" शतानन्दशेटी उद्गारले, "उदयिक सायंकालीं नियोजित प्रीतिविषयास मिष्टान्नभोजनास आमंत्रित कर ! तत्पश्चात् निर्णय प्रतिष्ठित करतां येईल."

"इष्ट इष्ट !" विलासवती म्हणाली. विलासवती ही शतानन्दशेटीची तृतीय भार्या चत्वारिंशति असूनही अमितकामा होती. सुखलोलुप जीवनाच्या परिपूर्तीमुळें सुस्थदेही झाल्यामुळें ती आकर्षक वाटत असे. आपल्या कन्येसाठीं वरसंशोधन करतांना तिचे पतीशीं मतैक्य असूनही रतिमंजरी अतृप्त राहूं नये म्हणून तिनेंही प्रस्तुत योगास संमति दिली. माता विलासवतीच्या अप्रत्यक्ष उत्तेजनानें रतिमंजरी आनंदित होऊन तिनें महाजनकास निमंत्रण दिलें.

नियोजित कालीं यथावगुंठित महाजनकाचें आगमन होतांच रतिमंजरी सहर्षित झाली. त्याची वस्त्रांपवस्त्रें परिष्कृत असल्यामुळें शतानन्दशेटी त्याच्या दर्शनानें सुप्रसन्न झाला. तद्वत् त्याच्या प्रकृष्ट देहयष्टीमुळें हा आपल्या आशावती कन्येस समर्थ सहकारी ठरेल ह्याची विलासवतीस खात्री झाली. भोजनकक्षांत भोजनाची सिद्धता तयार होतीच. सैनिक महाजनक प्राकृतिकाया क्षुधातुर असल्यामुळें प्रस्तुत सहभोजनांत त्यानें मिष्टान्नांचा व मांसाशनाचा परिपूर्ण स्वाहाकार केला. व विलासवतीच्या पाकनैपुण्याचें कौतुक केलें. भोजनोत्तर आरामकक्षांत अभ्यागतासाठीं तांबूलसेवनाची सिद्धि केली होती. रतिमंजरीनें स्वहस्तें शतानन्दशेटीस तांबूल देऊन तद्वत् विलासवतीनेंही देऊन महाजनकापुढें ताम्बूलभाजन ठेवलें. महाजनकानें तांबूलसेवन करून आपल्या वस्त्रकोषांतून धूम्रनाल काढून तो तमाखूपूरित केला व ओष्ठसंपुटांत त्याची स्थापना करून त्याचें प्रज्वलन केलें. उत्साहानें धूमपान करण्याच्या भरांत सबंध कक्ष उग्र धूमानें निर्भरित होत आहे ह्याचे भान त्याला राहिलें नाहीं. शतानन्दशेटी ह्या त्याच्या कृतीमुळें कलुषित झाला पण कक्षांतून वामकुक्षीच्या निमित्तानें त्यानें निर्गमन केलें. विलासवतीला जरी हा त्याच्या सामर्थ्याचा आविष्कार वाटला तरी पण वयोज्येष्ठांच्या पुरस्तात् असें धूमपान करणें अशिष्ट वाटून तीही सहजतया आरामकक्षांतून निर्गत झाली. आरामकक्षांतून अनावश्यक ज्येष्ठगणाची अनुपस्थिति झाल्यावर सुस्थ महाजनकास लाभलेला रतिमंजरीचा एकांत इष्ट वाटला व तो प्रियेच्या निकटवर्ति सहवासाची अपेक्षा करूं लागला. पण रतिमंजरी उत्सुक असली तरी चाणाक्ष होती. आपलीं पितरें कक्षापासून किंचित् अंतरवर्ती असलीं तरी त्यांचे लालस नेत्रचतुष्टय व तीव्र कर्णद्वय आसमंतात परिक्रमित असणें स्वाभाविक आहे हें ओळखून तिनें महाजनकास उत्तेजन न देतां उलट अवरोधच केला. कालांतरानें प्राप्त होणाऱ्या प्रदीर्घ सुखासाठीं क्षणिक आसक्तीचा मोह टाळणें युक्त आहे हें तिनें भावमुग्ध वृत्तीनें व सौम्य उपदेशानें प्रियकरास सुस्पष्ट केलें. अधिक असफल सहवासानें देहताप वृद्धिंगत करण्यापेक्षां भावी प्रगाढ समवायाची सुखस्वप्नें अचिरेण विचेष्टित कशी होतील ह्याचा मार्ग सुकर होण्यासाठीं त्यानें तत्काल निवृत्त होण्याचें ठरविलें.

आरंभलघ्वी वर्धिनी क्रमेण
गुर्वी पुरा क्षीणमनीच पश्चात्
कीं कामधेनु दुधुक्षसि यद्
वत्समिव तामनुना पुराण

असा विचार मनांत येऊन कामधेनू रतिमंजरीचा किंचित्काल वियोग पत्करण्याचा युक्त मार्ग त्यानें आचरला. रतिमंजरीनें महाजनकाचा ललाटपट्टा अंतर्कक्षांतून आणून देऊन देहलीपर्यंत त्यास निरोप दिला.

वरपरीक्षेचें फलित जाणण्यासाठीं अत्युत्सुक असलेली रतिमंजरी मातृकक्षांत तत्क्षणीं प्रवेश करिती झाली. तत्रस्थित शतानंदशेटींनीं तिचें सस्मित स्वागत करून आपला अनुकूल निर्णय कथन केला.

"हे सुकन्ये ! तुझा इष्ट पति सुदृढ, सुदर्शन व सुस्थित आहे हें तुझें सद्भाग्य आहे. पण त्याची अतीव धूम्रासक्ति आम्हांस प्रतिघातक वाटते. अतःपर महाजनकानें ह्या दुराचाराचें विसर्जन करण्याचें आश्वासन दिलें तरच आम्ही ह्या संयोजनास सम्मति प्रदान करूं."

"युक्त युक्त ! मीही तुझ्या विचाराशीं सहमत आहे" विलासवती उद्गारली. रतिमंजरीचा आशापल्लव पितृवचनांनीं पूर्णविकसित जरी झाला नाहीं तरी महाजनकावरच्या स्वप्रभावानें यथेष्ट साधतां येईल ह्याचा तिला आत्मविश्वास वाटला.

दुसऱ्या दिनीं पंचप्रसादपरिसरांत युगुलसंमीलन होतांच रतिमंजरीनें प्राप्त निर्णय महाजनकास विदित केला व आशंकेनें ती क्लान्त झाली. महाजनक क्षणिक स्तब्ध होऊन मग हंसला. तत्काल रतिमंजरी विस्मित होऊन उद्गारली,

"प्राणप्रिया, मी साशंक झालें आहे ! आपलें ईप्सित साध्य होणें कसें शक्य आहे ?"

महाजनकानें त्या पंचालिकेस आलिंगनानें आश्वासन देऊन तो म्हणाला, "हे कपोतिके, तूं यत्किंचितही क्लान्त होऊं नको. तुझ्या पितरांची अपेक्षा अगदींच क्षुल्लक आहे. मला ती मान्य आहे." रतिमंजरीनें प्राणप्रियाचें आश्वासित ऐकल्यावरोबर तिनें त्यास सहर्ष अंगीकृत करून द्विगुणित उत्साहानें ती म्हणाली :

"नाथ ! पण आपल्या प्रदीर्घ व्यवहाराचा त्याग करणें आपणांस कसें साध्य होईल ?"

"ते कांहींही असो. पण तुझ्या पित्याचें ईप्सित पूर्ण करणें प्राप्त आहे. कारण त्य शिवाय आपला प्रेमपरिपाक असाध्य होईल" आणि क्षणिक स्तब्ध राहून तो मिस्किलपणें म्हणाला, "कदाचित् ते स्वतांच मला धूमनाल स्वीकृत करण्याचा आग्रह करतील."

महाजनकानें आपला धूमनाल तत्क्षणीं बंदिस्त केला व तो प्रगट अथवा प्रच्छन्न अस्पर्शित राखण्याची प्रतिज्ञा केली.

यथाकालीं महाजनक व रतिमंजरीचा विवाह ऐश्वर्यानें साजरा झाला. काल्कंप ग्रामवासियांनीं ह्या सुखद सोहळ्यांत सहर्ष सहभागी होऊन आपलें जिव्हालौल्य यथाशक्ति परिपूर्ण केलें. विवाहपश्चात् विलासवतीनें काममंजरीस विवाहोत्तर रात्रिजागराचें सम्यग्ज्ञान सुस्पष्ट निवेदित करून पतीस कसें प्रसन्न राखावें ह्याचा इष्टोपदेश केला.

द्वितीय दिनीं महाजनकाच्या निवासीं पोचलेल्या विलासवतीस स्वपुत्री यथाकांक्षित उत्फुल्ल न दिसतां विमनस्क असल्यासारखी वाटली. विलासवती स्वभावतः ह्या मुद्रालेखनांत पारंगत असल्यामुळें तिच्या अनुभवी दृष्टीला रतिमंजरीची बुभुक्षित मुद्रा किंचित् अयथार्थ वाटली.

"पुत्री, तुझें कुशल आहे ना ? मधुचंद्र यथाकाम परिपूर्ण झाला


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

'नकोस बनवूं माझे पुतळे पैसे खर्चून
नको लिहूं ग्रंथही मजवरि करून संशोधन
सभाहि भरवून नको करूं तूं गुणगौरव माझा
व्यर्थ नको सामर्थ्य घालवूं करून गाजावाजा
कटिबद्ध हो, मम कार्य पूर्ति करण्यासी'
हाच शिवबाचा संदेश महाराष्ट्रासी.

बॉम्बे प्रोसेस स्टुडिओ - क्रिसेंट चेंबर्स, टॅमरिंड लेन, फोर्ट, मुंबई नं १. टे. नं. २५२९४५






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

ना! महाजनकानें तुज संतुष्ट राखिलें आहे ना?" विलासवती निर्भर कुतूहलानें उद्गारली.

"माते, मी अभागी ठरलें. नवपरिणित वधू ज्यासाठीं अत्युत्सुक असते असे माझे नैसर्गिक देहधर्मसुद्धां अतृप्त राहिले हे माझें दुर्भाग्य नव्हे काय?" रतिमंजरी विकल होऊन म्हणाली.

हें अपूर्वानिष्ट वर्तमान ऐकून विलासवती निःस्तब्ध झाली पण तिनें आपल्या भावना निग्रहित केल्या.

"दैवात् महाजनक असुस्थ असेल अथवा विवाहप्रसंगाच्या संस्कारांनीं परिश्रमित झाला असेल. नाहींतर त्याच्यासारख्या फलोन्मुख दृढदेही वराकडून तुझ्यासारख्या उत्फुल्ल व परिपुष्ट वधूची अशा मंगलकालीं उपेक्षा होणार नाहीं. आज निस्संशय तुझें मनोवांछित द्विगुणित होईल याबद्दल निश्शंक राहा व अपेक्षित समयीं अतीव देहपीडन भोगूनही त्याला कामनिवृत्त कर म्हणजे तो तुझ्याशीं सतत लाङ्गूलचालन करील" असे आश्वासून विलासवती स्वगृहीं निवर्तली.

पराहे पुनश्च विलासवती स्वकन्यागृहीं पर्युत्सुक मनानें जाती झाली. तेव्हां रतिमंजरीची मुद्रा तिला तद्वत्च विकल वाटल्यामुळें ती खिन्न झाली तरी पण अतीव श्रमांमुळें ती कदाचित् आयासित असावी म्हणून पूर्वदिनाप्रमाणें तिला पृच्छा केली.

रतिमंजरी उदासीन वृत्तीनें कथन करती झाली, "माते,मला पूर्वरात्रौ चिंतोद्वेगानें निद्रा प्राप्त झाली नाहीं. महाजनकानें अजूनही मला अनाघ्रात राखिली आहे." कष्टापन्न चित्तानें रतिमंजरी अधिक बोलूं शकली नाहीं.

विलासवतीनें तिच्या पृष्ठदेहावरून सान्त्वनानें हस्त फिरवून तिला शांत केल्यावर रतिमंजरी पुढें उद्गारली.

"जेव्हां गतरात्रीं आम्ही पर्यङ्कस्थित झालों तेव्हां महाजनकानें माझा कोमल हस्त स्वहस्तांत घेऊन माझ्या नेत्राशीं नेत्रमीलन केलें व तो संथपणें उद्गारला, 'मत्प्रिय कोमलांगी'...आणि क्षणांत गाढ झोंपी गेला." तिच्या नेत्रांत अश्रु तरारले. "त्या पूर्ण रात्रींत तो क्षणभरहि विकुक्ष झाला नाहीं...आणि मी मात्र कामज्वरानें पीडित होऊन शय्येवर अस्थिर झालें होतें."

"विराम! मी महाजनकाभिमुख होऊन स्वतां प्राप्त परिस्थितीचें अन्वेषण करतें आणि तुमचें संमीलन घडवून आणतें."

...आणि तत्प्रीत्यर्थ महाजनकास एकांतीं गांठून विलासवतीनें त्याच्या विचित्र व्यापाराची संथपणें पृच्छा केली;

"हे जाल्म जामात! माझी सुकन्या तुला इतकी अपरूप वाटली कीं तूं तिला अजूनही अस्पर्शित मानतोस?"

"छे, छे, श्वसे! उलट त्या स्वरूपकन्येवर माझे नितांत प्रेम आहे. पण ज्याअर्थी ज्या धूम्रनालानें मला क्रियाकर्म करण्यास उत्तेजित केलें असतें त्याचा मला परित्याग करण्याची सक्ती झाल्यामुळें मी आज अकार्यक्षम झालों आहे, व किंचित् अवसरानें मी कदाचित् पूर्णपणें निकामी ठरेन."

विलासवती किंचित्कालानें रतिमंजरीच्या कक्षांत आली. तिला सर्व कुचेष्टिताची कल्पना आली होती. रतिमंजरी मातेची प्रतीक्षा करीत देहलीवर तिष्ठत होती.

"रतिमंजरी! ह्या रौप्यमुद्रा घे आणि पण्यवीथीनून धूमसाहित्य क्रयप्राप्त कर आणि महाजनकास तत्काळ धूमप्राशनाचें सौख्य उपलब्ध कर."

रतिमंजरीनें मात्राज्ञेचें परिपालन केलें, तिला मातेच्या ह्या विचित्र कल्पनेचें आश्चर्य वाटलें पण अधिक पृच्छा न करतां मुग्ध राहिली.

तृतीय दिनीं विलासवती जामातगृहीं प्रवेश करतांच तत्काल रतिमंजरीनें तिला गाढालिंगन दिलें व अतीव उत्साहानें ती म्हणाली,

"माते, धूमनालाच्या मुखप्रवेशापासून सर्व परिस्थिति तत्काल परिवर्तित झाली हें कथन करण्यास मला अत्यंत आनंद होत आहे. गतरात्रीं माझ्या देहकामना शतगुणित परिपूर्ण झाल्या. यदा यदा आमच्या युगुलाचें संमीलन शक्य होतें तदा तदा महाजनकानें सव्याज संयुक्तिक वर्तन केलें, धन्य धन्य तो धूमनाल आणि धन्य धन्य मत्प्रिय महाजनक!"

"महदाश्चर्य! महदाश्चर्य" विलासवती उद्गारली, "हे प्रिय श्रमितगात्री कन्यके! ह्या दश रौप्यमुद्रा घेऊन पण्यवीथींतून तुझ्या बलशाली यजमानासाठीं पंचमुद्रांचें धूमसाहित्य आण; आणि तुझ्या पित्यासाठीं उर्वरित मुद्रांचे धूमसाहित्य तत्काल क्रयप्राप्त कर."

आणि तदनंतर विलासवती स्वकर्मी इतकी रत झाली कीं तिला स्वपुत्रीचें कुशल चिंतण्यासही जामातगृहीं जाण्यास समय लाभूं शकला नाहीं.

(प्राकृत साहित्यांतल्या 'ठोंमरस्तरी' ह्या आर्ष ग्रंथांतून अनुवादित)

• • •



तलम व
टिकाऊ धोतरें
श्रीकांत
टेक्स्टाईल्सचीच

'श्रीकांत' धोतरें
मर्सराइज्ड, ब्लीच्ड व
विविध किनारींत
मिळतात. 'श्रीकांत' धोतरांच्या
प्रत्येक इंचांत उभे व आडवे
धागे जास्त असल्यानें ती
अधिक टिकाऊ असतात.

श्रीकांत टेक्स्टाईल्स
(नातू मॅनेजमेंट)
बँक ऑफ बरोडा बिल्डींग, पलटन रोड, मुंबई-१



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

• आचार्य प्र. के. अत्रे • म. म. दत्तो वामन पोतदार • पु. भा. भावे • उदयशंकर • डॉ. सरोजिनी बाबर • चित्रकार मुरलीधर आचरेकर • रा. ज. देशमुख • माधव मंत्री



लौकिक जीवनांत यशस्वी झालेले सत्पुरुष हे यशस्वी असतात म्हणूनच सुखी असतात असा सामान्यांचा कयास असतो. तो कयास पुष्कळदां खरा असतो. पण नेहमींच नाहीं. बालपणींच्या अगर तारुण्यांतील त्यांच्या सुप्त महत्त्वाकांक्षा सफलित झालेल्या असतातच असें नाहीं. त्या महत्वाकांक्षांवर परिस्थितीची राख जमलेली असली तरी त्यांच्या मनांत कांहींतरी राहून गेल्याचें कधींतरी चुकचुकत असेल. आपल्या त्या अप्राप्त महत्त्वाकांक्षेंत यशस्वी झालों असतों तर आपल्या जीवनास निराळें वळण लागलें असतें. तें वळण कोणतें असतें? कसें असतें? इत्यादि दृष्टींनीं गमतीदार अशा खेळकर शैलींत मजकूर लिहिण्याची महाराष्ट्रांतील कलावंत, राजकारणी, साहित्यिक, विचारवंत, क्रीडाक्षेत्रांतील मान्यवर इत्यादींना विनंती केली. लेखमालेची कल्पना सर्वांना आवडली. पण महाराष्ट्र राज्याचे मान्यवर मुख्यमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण, केन्द्र सरकारचे खाद्यमंत्री श्री. स. का. पाटील आदि थोरामोठ्यांना कार्यबाहुल्यामुळें लेख लिहावयास वेळ मिळाला नाहीं, आणि त्यांनीं नम्र नकार कळविला. मात्र कांहीं जणांनीं तत्परतेनें तर कांहीं जणांनीं सततच्या आग्रहाला स्मरून लेख पाठविले. ज्यांनीं लेख पाठविले त्यांचे व ज्यांना पाठविणें जमलेलें नाहीं त्यांचेहि मनःपूर्वक आभार.

—संपादक

## *अजून माझ्या मनांत ती हुरहुर कायम आहे....वकील होण्याची !*

—आचार्य प्र. के. अत्रे

आयुष्याला जीवन म्हणतात हें एका दृष्टीनें सार्थच आहे. जमिनीची पातळी जशी बदलते तसा पाण्याचा ओघ वळण घेत जातो. त्याप्रमाणें आयुष्यांत माणसाची परिस्थिति जशी जशी बदलते तयतसा आयुष्याचा मार्गहि बदलत जातो. घराच्या बांधणीचा नकाशा आधीं काढून त्याप्रमाणें घर बांधलें जातें. त्याचप्रमाणें जीवनाचा नकाशा आधीं रेखाटून त्याप्रमाणें ज्यांना आपलें जीवन घडवितां येतें, अशीं भाग्यशाली माणसें या जगांत फारच विरळा. आयुष्य ही एक 'अंधारांतली' होडी आहे. डोळे मिटून उडी मारायची, किंवा वहात जायचें आणि जिथें पाय लागतील तिथें उभे राहून डोळे उघडायचे आणि मग जाणून घ्यायचें, कीं आपण कुठें येऊन पोहोंचलों तें.



ज्या वेळेला माणसाला कळत नाहीं, त्या वेळेला आपण काय व्हावं असं त्याला जें वाटतं, त्यापेक्षां त्याला कळूं लागल्यावर आपल्या जीवनाचें जें भवितव्य तो निश्चित करतो तें निराळं असतं हें सांगायला नकोच. वयाच्या आठव्या वर्षी एका आप्ताच्या लग्नासाठीं मीं माझ्या आजीबरोबर पहिल्यानें पुण्याला आलों. माझे सदर आप्त हे वानवडीला महादजी शिंद्यांच्या छत्रीचे पुजारी असल्यानें त्याच भागांत माझा मुक्काम होता. एके दिवशीं सकाळीं लाल सायकलवर एक पोष्टमन का तारवाला, खाकी कपडे घालून रस्त्यानें चालला असतां माझ्या दृष्टीस पडला. त्याच्या दर्शनानें माझ्या मनावर जो दृढसंस्कार केला तो पुसून जावयाला पुढें पुष्कळच वर्षें लागलीं. त्याच क्षणीं मी माझ्या चिमुकल्या मनाशीं निश्चय केला कीं, आपण आयुष्यांत पोष्टमन व्हायचें. आणि खाकी डगला अंगांत चढवून आणि लाल सायकलवर बसून गांवांत पत्रें वाटींत फिरावयाचें. त्यानंतर पुढें पुष्कळ दिवस जेव्हां जेव्हां पोष्टमन माझ्या दृष्टीस पडे तेव्हां अनिमिष लोचनांनीं आणि पाणावलेल्या ओठांनीं मी त्याच्याकडे पाहात उभा राही.

लहानपणापासून माझ्या स्वभावाचा धर्मच मुळीं असा कीं, जें जें म्हणून कांहीं मीं पहावयाचा तें तें आपणाला करतां यावें आणि तसें आपण व्हावें असा विचार माझ्या मनांत यावयाचा. गांवांत जादुगार आला कीं आपणहि जादुगार व्हावें आणि मुटींतून रुपया काढून दाखवावा अशी इच्छा मनांत उत्पन्न होई. गांवांत सर्कस आली, कीं आपणहि सर्कसमधला एखादा खेळाडू व्हावं आणि उरफाट्या उड्या माराव्या असा विचार मनांत




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

येई. गणपतीच्या दिवसांत गांवांत मेळे सुरू झाले, कीं त्या मेळ्यामध्यें भय्याची टोपी डोक्याला घालून, गळ्यांत लाल आलवणाचा आडवा पट्टा अडकवून आणि हातांत घुंगुराच्या टिपऱ्या घेऊन गाणीं गात गांवांतून जावें असें वाटे; पण हे सगळे कल्पनेंतले बुडबुडे मनांत वेळोवेळीं उठत आणि थोड्या वेळानें नष्ट होत.

शिक्षणासाठीं मी पुण्यांत आल्यानंतर मला नाटकाचें वेड लागलें. वयाच्या चौदाव्या वर्षी शाळेच्या एका नाटकांत मी स्त्री भूमिका केली. ती एका नाटककंपनीच्या मॅनेजरला अतिशय आवडली. तेव्हां त्यानें मला आपल्या नाटक कंपनींत पळवून न्यावयाचें ठरविलें. तो आपल्या बेत मीं माझ्या एका दोस्ताला हळूच कानांत सांगितला. आणि त्यानें त्याची घरभर वाच्यता केली. माझे वडील माझ्यावर इतके संतापले कीं, "पळून जाण्याच्या पूर्वीच तुझी तंगडी तोडीन" अशी त्यांनीं मला धमकी दिली. त्यामुळें तो बेत त्याच क्षणीं थिजला. आणि मराठी रंगभूमि एका महान नटाला अंतरली!

त्यानंतर राम गणेश गडकरी यांच्या सान्निध्यांत मी आलों तेव्हां आपण कवि आणि नाटककार व्हावें असें वाटूं लागलें. पुण्यांत दरवर्षी चौरंगी क्रिकेटचे सामने व्हायचे. ते पाहिल्यानंतर आपण नामांकित क्रिकेटर व्हावें अशीहि महत्त्वाकांक्षा मनांत डोकावून गेली. अब्दुल करीमखॉं यांचें गाणें ऐकल्यानंतर आपणहि त्यांच्याप्रमाणें गवयी व्हावें असें वाटून त्यांच्या वर्गांत मी तावडतोब नांव नोंदवलें. स्वतः खॉंसाहेबांच्याकडून गाणें शिकण्याचें भाग्य जरी मला लाभलें नाहीं तरी त्यांच्या वर्गांत दोन अडीच वर्षें मी विद्यार्थी होतों; पण पुढें 'कंठ' फुटल्यानंतर गवयी होण्याचीं स्वप्नें फुटून उध्वस्त झालीं. हें सर्व सांगण्याचा हेतु हा कीं त्या वयांत आपण पुढें काय व्हावें यासंबंधीं एकहि बेत निश्चित नव्हता. माझे वडील एका बँकेचे मॅनेजर होते आणि त्या व्यवसायाच्या निमित्तानें त्यांचा मुंबईमधल्या बॅरिस्टरांशीं आणि सॉलिसिटरांशीं वारंवार संबंध येई. त्यांचें तें वैभव पाहून साहजिकच त्यांना असें वाटलें कीं आपलाहि मुलगा बॅरिस्टर व्हावा—निदान वकील तरी व्हावा. त्याप्रमाणें त्यांनीं एक दिवस मला आदेश दिला, कीं "बी. ए. झाल्यानंतर तूं वकील झालें पाहिजे!" बी. ए. च्या वर्गांत असतांना माझे वडील अकस्मात् मरण पावले; तेव्हां



वरें झालें देवा
मिळे पायपोस
प्रसाद भक्तास
कृपा तुझी।

वडिलांची इच्छा पूर्ण करणें हें साहजिकच माझें कर्तव्य होऊन बसलें. पदवीची परीक्षा पास होतांच मीं तडक मुंबईला आलों, आणि एल्. एल्. बी.च्या वर्गांत नांव नोंदविलें. घरची गरिबी असल्यानें आणि कुटुंबपोषणाचा थोडासा भार माझ्यावर असल्यानें मुंबईत नोकरी करणें मला भागच होतें. त्याप्रमाणें मुंबईमधल्या दोनतीन शाळांमध्यें जिथेंजियें ज्यास्त पगार मिळेल त्या हिशेबानें मीं शिक्षकाची नोकरी धरली. नुसत्या पगारानें भागेना म्हणून खाजगी शिकवण्याहि करूं लागलों. त्याचा परिणाम कायद्याच्या अभ्यासावर जो व्हायचा तो झाला. मीं पहिल्या एल्.एल्. बी. चा फॉर्म भरूनहि ऐन वेळीं परीक्षेला बसूं शकलों नाहीं; पण त्या वर्षात कायद्याचें मला विलक्षण वेड लागलें.

त्या काळांत मुंबई हायकोर्टांत बॅरिस्टर आझाद नांवाचा एक अत्यंत तरुण आणि तेजस्वी बॅरिस्टर काम करीत असे. त्यानें चालवलेले खटले ऐकणें हा माझा त्यावेळीं अत्यंत आवडता उद्योग होता. कोणताहि फौजदारी गुन्ह्याचा गंभीर खटला असो, आरोपीला बॅरिस्टर आझाद यांनीं सोडवलें नाहीं असें क्वचितच व्हावयाचें. काळ्या झग्यांतली आझादांची ती आकर्षक मूर्ति, इंग्रजी भाषेतल्या त्यांच्या वक्तृत्वाचा तो रुबाब आणि ज्यूरीवर परिणाम करणारा त्यांचा तो प्रभावी अभिनय या गोष्टी अद्यापहि मीं विसरलेलों नाहीं. असा अमोघ बॅरिस्टर मीं माझ्या आयुष्यांत दुसरा पाहिलेला नाहीं. त्यामुळें वकील होण्याचें आपलें स्वप्न अर्धवट सोडून मुंबईहून पुण्यास परततांना माझ्या अंतःकरणाला त्यावेळीं किती यातना झाल्या असतील याची कल्पना आतां शब्दांनीं देतां येणें कठीण आहे.

त्या सुमाराला महात्मा गांधींची असहकारितेची चळवळ सुरू झाली होती. सारी मुंबई खादीमय होऊन महात्मा गांधींचा जयजयकार करूं लागली होती. तेव्हां अंगावरच्या विलायती कपड्यांची होळी करण्याची सर्वत्र साथ आलेली होती. त्या साथीमध्यें मीहि सांपडलों गेल्यास नवल नव्हतें. माझे अनेक समवयस्क मित्र त्या चळवळींत सामील झाले. मीहि त्यांच्याबरोबर त्यावेळीं जवळजवळ असहकारितेच्या चळवळींत उडी घेतली असती; पण कुटुंबपोषणाच्या जबाबदारीच्या जाणिवेनें माझा पाय मागें वळला. त्यानंतर पुण्यांत येऊन एका लहानशा शाळेचा—महिना तीस रुपये पगारावर मी हेडमास्तर झालों. आणि तेव्हांपासून माझ्यामागें शिक्षकाचा गोंद असा चिकटला कीं, तो पुढें वीस वर्षे. ज्या शिक्षकाच्या व्यवसायाची मला लहानपणापासून अत्यंत घृणा होती, तोच व्यवसाय अखेर माझ्या कपाळीं येऊन बसला; पण एकदां कुठल्याहि कामांत मीं पडलों कीं

सुस्वागतम्

वीरकर
आहार भवन

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

त्यांत ज्यास्तींत ज्यास्त वर कसें चढतां येईल याच्या खटपटींत मीं असतों. त्याप्रमाणें त्याहि क्षेत्रांत मीं मिळवलेलें यश हें कांहीं लहान-सहान नाहीं. मुंबई विश्वविद्यालयाच्या बी. टी. परीक्षेंत मी पहिल्या वर्गांत पहिला आलों. पुढें इंग्लंडला जाऊन लंडन विश्वविद्यालयाच्या शिक्षणशास्त्राचा डिप्लोमा घेतला. विद्यार्थ्यांसाठीं अनेक पाठ्यपुस्तकें लिहिलीं. माझ्या 'नवयुग' वाचनमालेनें महाराष्ट्राच्या तीन पिढ्या मराठी भाषा शिकल्या. पुण्यांत अनेक शिक्षणसंस्था स्थापन केल्या. शेंकडों परिषदांचा अध्यक्ष झालों. एवढं यश मिळवल्यानंतर साहजिकच शिक्षणाचं क्षेत्र मला अपुरें वाटूं लागलें आणि मी राजकारणांत उडी घेतली. दरम्यानच्या काळांत मी नाटककार आणि घटकथाकारहि झालों होतों. पुणें नगरपालिकेंत निवडून येऊन मी कॉंग्रेसचा नेता आणि चेअरमन झालों. नंतर नवयुग चित्रपट कंपनी स्थापना केली. ती सोडून मुंबईस आलों आणि अत्रे पिक्चर्सची स्थापना केली.

'वसंतसेना' चित्रपटांत आठ लाखाचा तोटा होऊन मी अक्षरशः चारुदत्त बनलों; पण 'शामच्या आईनें' पहिलें राष्ट्रपति सुवर्णपदक मिळवून देऊन चित्रपट या क्षेत्रांतली माझी अब्रू सांभाळली. हें सर्व चालू असतांना माझें साप्ताहिक नवयुग चालू होतेंच. त्यामुळें अखेर पत्रव्यवसाय हाच माझ्या जीवनाचा आधार ठरला. आणि त्याच पत्रव्यवसायानें राजकारणाच्या संघर्षांत मला उडी घ्यावी लागली.

संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यांत गेलीं सात वर्षें काय केलें तें सांगण्याची जरुरी नाहीं. मुंबईसह महाराष्ट्र राज्याच्या निर्मितींत माझाहि थोडासा भाग आहे. या जाणिवेंतच माझ्या जीवनाची कृतार्थता आणि साफल्य आहे. पूर्वीच्या आयुष्याचा विचार केला म्हणजे मनाला मोठी मौज वाटते कीं आपण निघालों कुठून आणि पोंचलों कुठें. आणि अजून तरी कुठें काय संपलें आहे ! जें होतं तें बऱ्यासाठीच होतं असं म्हणून समाधान मानणारा मी दैववादी नाहीं. तथापि एवढं सारं करूनहि मनांत एक हुरहूर मात्र कायमची राहून गेली आहे. आणि ती म्हणजे वकील होण्याची !

कायद्याच्या क्षेत्रांत प्रवेश करण्याची ही महत्त्वाकांक्षा अन्य मार्गानें—म्हणजे स्वतःवर नाना तऱ्हेचे खटले ओढवून घेऊन आणि त्यांतून पुष्कळदां सहीसलामत बाहेर पडून मी पुरवीत असतों. ● ● ●

---

# असफल महत्त्वाकांक्षा मला बाधलेली नाहीं !

—म. म. दत्तो वामन पोतदार

**गोपाळराव :** कांहीं म्हणा दत्तोपंत ५०–६० वर्षांपूर्वी जेव्हां आपण शाळेंत जात होतों त्यावेळची मौज कांहीं निराळीच होती. त्यावेळच्या आपल्या कल्पना, त्यावेळचे आपले पुढले बेत या सर्वांची आठवण झाली आणि पुढें आपलीं चरित्रें किती निराळीं झालीं तें लक्षांत आलें म्हणजे फार आश्चर्य वाटतें. पण कांहीं म्हण गड्या तुझ्यांत मात्र कांहीं बदल झाला नाहीं. शेंडी तुटो कां पारंबी तुटो, म्हटलें तें करणार असा तुझा हट्टी स्वभाव गेला नाहीं.

**दत्तोपंत :** माझा जाऊं दे रे, तूंसुद्धां लहानपणीं होता तसाच आहेस आणि आमचे तरी सगळे बेत कोठें सिद्धीस गेले ! पुष्कळ मनोराज्यें केलीं, यंव करूं नी त्यंव करूं. पण झालें किती आणि राहून गेलें किती !

**गोपाळराव :** आमच्या लहानशा संसारांत सुद्धां असें होतें. योजलेले सगळेंच कोठें पुरें होतें ! हजार अडचणी निघतात आणि मग मनांतले मांडे मनातच राहून जातात.

**पोतदार :** तुला आठतें कां कीं मी बी. ए. झाल्यानंतर १९११ सालीं अमेरिकेंत जाण्याचा विचार केला होता.

**गोपाळराव :** आटवतें तर. तात्यासाहेब केळकरांकडे तूं गेला होतास सर्टिफिकेटसाठीं.

**पोतदार :** हो. दिलें ना त्यांनीं. झालें सगळें तिथेंच थांबलें. जमलें नाहीं कांहीं. तेव्हांपासून विचार आहे पण जुळणी करणार कशी ! टाकलें नाहीं अजून सुद्धां. हातांत असते तर केलें असतें. होऊं शकलें नाहीं म्हणून राहून गेलेंय्.

**गोपाळराव :** तूं पहिल्यापासूनच योजना पंडित आहेस. आम्ही म्हणत होतों कीं एल्. एल्. बी. व्हावे आणि वाडलांची गादी पुढें चालवावी. पण तूं कोठला ऐकायला !

**पोतदार :** माझा कांहीं निराळा बेत होता त्याप्रमाणें मीं ठरविलें.

**गोपाळराव :** हो तुम्ही आम्ही सुद्धां सारे देशभक्त होतों ना. साऱ्यांना टिळकांचें वेड. मलाहि मोठा फटका बसला होता. पण बचावलों त्यांतून.

**पोतदार :** क्रांतिकारकांच्या दारापासून जाऊन डोकावून आलों आहे मी. आंत मात्र गेलों नाहीं.

**गोपाळराव :** बरोबर आहे. तुमचे विचार पहिल्यापासून जरा निराळेच होते. तुम्ही आमच्याशीं भांडत होता. शिक्षणाशिवाय कांहीं होणार नाहीं.

**पोतदार :** मग त्यांत काय चुकलं ? तें बरोबरच होतें. टिळकांना सुद्धां मी विचारलं होतं. तें तुला ठाऊकच आहे.

**गोपाळराव :** पण तुमची मूळची योजना कोठे राहिली ?

**पोतदार :** म्हणजे त्याचें असें झालें कीं राष्ट्रीय शिक्षणाचा प्रयत्न सरकार टिकूं देत नाहीं हें उघड झालें होतें.

**गोपाळराव :** हो म्हणजे तूं विजापुरकरांकडे जात होतास. समर्थ विद्यालय सरकारनें बंद केलें होतें. तें पुन्हा चालू करावयाची खटपट अण्णा विजापूरकर करीत होते. तुम्ही म्हणजे तूं आणि तुझें मित्रमंडळ ह्यांनीं तें काम हातीं घ्यावें असा त्यांचा आग्रह होता. पण तुझ्या कांहीं नेहमी अटी असावयाच्या.

**पोतदार :** अटी म्हणजे ? असणारच. ना. गोपाळराव गोखले हे अण्णांचे मित्र आणि बळवंतराव टिळक हे अण्णांचे पुरस्कर्ते. गोपाळराव नेमस्त पक्षाचे पुढारी.

**गोपाळराव :** हो, त्यांना टिळक नरम पक्षाचे म्हणत. आणि टिळकांचा गरम पक्ष. गरम, नरम, जहाल, मवाळ अशीं पक्षांचीं नांवें होतीं. नरम पक्ष सरकार खपवून घेत असे. त्यांना सरकार राजद्रोही म्हणत नसे.

**पोतदार :** आणि म्हणून तर माझा आग्रह होता कीं "अण्णा ! गोपाळराव आणि बळवंतराव हे तिघेहि तुमचे, तुम्हांला मानणारे, त्या तिघानीं एकत्र येऊन त्यांच्या देखरेखीखालीं समर्थ विद्यालय पुन्हां कां चालू करूं नये ? म्हणजे तें सरकारला बंद करणें जड जाईल."





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

आणि म्हणून तशी स्पष्ट अट मीं घातली होती. पण तें कांहीं जुळलें नाहीं. आणि तो डावहि हुकला. असें तें काम राहून गेलें. राहून गेलें म्हणजे काय सुरूं झालेंच नाहीं.

**गोपाळराव** : म्हणून काय झालं? तूं माघार थोडीच घेतलीस?

**पोतदार** : कां घेईन? ठरविलें कीं आहे याच शाळेंत शिरलें पाहिजे. आणि सारीं ग्रंथनें पत्करुन त्यांतून मुलांना तयार केलें पाहिजे. ज्ञान हीच मोठी शक्ति आहे हें ओळखून काम केलें पाहिजे. नुसत्या पोकळ शब्दांनीं तरुणांच्या भावनांना उकळी फोडून काम चालणार नाहीं.

**गोपाळराव** : आम्हांला कांहीं त्या वेळेला तुमचें तें करणें पसंत पडलें नाहीं. आम्हांला वाटत होतें कीं तुम्ही मोठे देशभक्त पुढारी म्हणून गाजणार किंवा गाजले पाहिजे.

**पोतदार** : पण आमची दिशा निराळी होती. म्हणून आम्ही एक योजना केली.

**गोपाळराव** : कसली शाळेंत जाण्याची ना?

**पोतदार** : वा. खूपच आहेस कीं. तसं नाहीं. योजना अशी होती कीं आम्ही विश्वासाचे दोघेतिघे मित्र यांनीं एकदम शाळेंत काम पत्करायचें. प्रथम त्या वेळच्या इंग्रजी चौथ्या यत्तेची एक तुकडी तिघांनीं मिळून सांभाळायची. सारे विषय शिकवायचे आणि शाळेच्या वेळेबाहेरहि अहोरात्र मुलांशीं संबंध ठेवायचा. निराळें ग्रंथालय काढून त्यांना वाचनाची गोडी लावायची. खेळ खेळायचे. त्यांच्याबरोबर राहून खेळायचे. वाद–सभा काय, हस्तलिखित मासिक काय अनेक गोष्टी. त्यांच्या पालकांशीं संबंध ठेवायचा. नुसतें टाकमाड्याचें काम करावयाचें नाहीं. मुलांच्या – बांधणीचें काम करवयाचें. म्हणून तशी अट घालून कामाला प्रारंभ केला. चौथी, पांचवी, सहावी व सातवी पर्यंत चार वर्षें याच क्रमानें त्याच मुलांची बांधणी करीत जायची. पण काय जुळलं नाहीं. जुळलं नाहीं असंहि नाहीं. पण संपूर्ण जुळलें नाहीं. प्रयोग अर्धवटच झाला. तरी त्याला चांगलें यश आलें. चालकांनी आम्हांला चालक मंडळांत घेऊन व्यापक कामाला जुंपलें. त्यानें पसारा वाढला पण ऐन बांधणीचें काम तसेंच राहून गेलें. आणि अजूनहि तें राहूनच गेलें आहे.

**गोपाळराव** : म्हणजे आतां ४० वर्षांनीं ती तेवढी आठवण होते आहे तुम्हांला.



**वरें झालें देवा**
आली पंचायत
नाहीं पंचाईत
आम्हांलागी

**पोतदार** : अरे ती आठवणसुद्धां किती आनंद देणारी आहे. त्यांतले आमचे विद्यार्थी पुढें कसें चमकले तें तुला माहीतच आहे.

**गोपाळराव** : हो. आचार्य खडे व गणू साठे क्रिकेट कारखानदार झाले तें सारें मला माहिती आहे.

**पोतदार** : म्हणजे कांहीं फळ आलें ना! तेवढ्यांतच संतोष मानणें भाग आहे.

**गोपाळराव** : आणि तुम्ही मोठे ग्रंथ लिहिणार होतां त्याचें काय?

**पोतदार** : त्याच्या १०० योजना केल्या पण एकहि सिद्धीस गेली नाहीं. बहुतेक राहूनच गेल्या.

**गोपाळराव** : आम्हाला कांहीं ग्रंथाचें फारसें कळत नाहीं पण जगाचा एक मोठा इतिहास लिहावा अशी कांहीं तुझी बडबड चालत होती.

**पोतदार** : अरे गडबड काय आणि बडबड काय, थोडी धडपडसुद्धां केली. पण कांहीं जुळलं नाहीं. राहून गेलें आणि आतां वाटतें कीं राहूनच जाईल.

**गोपाळराव** : आणि आपला राजाराम आला होता तेव्हां कांहीं योजना तुम्ही केली होती.

**पोतदार** : त्या योजना मोठमोठ्या होत्या. एक अशी होती कीं, ती राजारामानें कलकत्त्याहून आणली होती. कुटुंब आरोग्य योजना असें तिचं नांव. ती सुरुहि केली. मी चिटणीस. राजाराम संचालक. पण करणार काय! तो वारला आणि तें थांबलें.

**गोपाळराव** : तुमचा गटहि मोठा जोरदार होता.

**पोतदार** : होता यांत काय संशय? कांहीं लेखक, कांहीं देशभक्त, कांहीं आरोग्यतज्ज्ञ. एक स्थापत्यतज्ज्ञ. एक व्यापारी. मिळून आमचा एक निवाभावाचा गट होता. सतत जमायचे. आणि जेव्हां चांगलीं कामें दिसतील त्यांत जायचें आणि सगळ्या शाखांत आपल्याच बळावर होईल तेवढा कारभार उरकावयाचा.

**गोपाळराव** : पण तुम्ही तर राजवाड्यांकडे गेलां.

**पोतदार** : गेलों पण आपल्या अटीवर. भाकरीचा कोणाचा मिंधा नाहीं. म्हणजे मग बाणा स्वतंत्र राहूं शकतो. मत विकावयाचें नाहीं हा बाणा. पुष्कळ टिकला. त्यांत अनेक योजना केल्या. अनेक मंडळें स्थापन केलीं. किंवा होतीं तीं हातीं घेतलीं. आणि त्यांत नवीन जीव ओतला. कांहीं साधलें, कांहीं नाहीं. साधलें परंतु राहून गेलें.

**गोपाळराव** : चालायचेंच. सगळें कोठलें साधायचें? चार आणे साधतें तर बारा आणे राहतें.


“महिलांचे आवडतें स्थळ”

लेडीज टेलर्स

न्यु फॅशन हाउस

संचालक:- जमनादास व्ही. भवसार.

रानडे रोड एक्स्टेन्शन
(दादर-वे. रेल्वे.) मुंबई क्र. २८.

**पोतदार** : आणेवारींत कांहीं फरक पडेल. समजा सहा आणे, दहा आणे असा हिशेब बसला तरी राहून गेलं पुष्कळच. आम्ही म्हटलं होतं, आमचे मित्र बाबुराव आणि आम्ही मिळून मराठी साहित्य संमेलन आणि परिषद यांची एक बखर लिहूं अजूनहि कदाचित् लिहूं. कोणी सांगावं? पण राहून गेलं आहे खरं. सगळ्या महाराष्ट्रासाठीं इतर सगळे धर्मभेद, पक्षभेद विसरून सर्वांचा एक मराठी पक्ष असावा असा फार आग्रह आणि खटपट माझी होती. अखेर संयुक्त महाराष्ट्राच्या वेळीं थोडी चमक दिसली, दाखवितां आली. पण पुढें काय?

**गोपाळराव** : पुढें तर मला फार आशा वाटते.

**पोतदार** : बघूं या. आशा सोडा कां? बोलत असावं, रचीत असावं, करीत असावं. खंडीभर बोलावं तेव्हां रतीभर साधतं. काय समजलांत? ● ● ●

# ....मीं लेखकच आहे आणि लेखकच राहाणार !

**—पु. भा. भावे**

आगगाडीचा सारथी (Driver) किंवा रक्षक (Gaurd) होण्याची महत्त्वाकांक्षा बहुतेक लहान मुलांप्रमाणें माझ्याहि बालमनांत दबा धरून होती. परंतु ह्या लोकांचे एकंदर हाल पाहिल्यावर मी आगगाडीचा सारथी किंवा रक्षक झालों नाहीं, हें फार उत्तम झालें, असेंच मला आतां वाटतें. प्रवास करायला मला अद्यापहि फार आवडतें. पण आपल्या मनाला येईल तेव्हां प्रवास करणें वेगळें आणि बळजोरीनें मासिक पगारासाठीं प्रवासाला पाठविलें जाणें वेगळें! आगगाडीच्या सारथ्याला आणि रक्षकाला असा बळजोरीचा प्रवास करावा लागतो. त्या प्रवासाला वेळ—अवेळ कांहीं नाहीं. चांगल्या वायुमानांतच प्रवास करायचा अशी निवड करायला जागा नाहीं. झोपायचीहि सोय नाहीं. सारथी वा रक्षकाच्या डब्यांत झोपायला बांक नसतो हें जेव्हां पुढें माझ्या ध्यानांत आलें तेव्हां तर मला धक्काच बसला. मला वाटलें एकंदरींत आपण बरे बचावलों, गार्डाच्या तोंडांतली आणि ड्रायव्हरच्या हातांशीं असलेली शिटी ही लहानपणीं मला फार आकर्षक वाटे. तसेंच त्यांच्या हातांत असलेले लाल, हिरवे झेंडे! पण जन्मभर अशा शिट्या फुंकीत बसणें अथवा झेंडे हलविणें आपल्याला कांहीं आवडलें नसतें हें पुढें माझ्या ध्यानांत आलें. गार्ड आणि ड्रायव्हर व्हायचें स्वप्न तिथेंच विरलें आणि विरलें तें बरेंच झालें असें आतां मला वाटतें. त्यानंतर वकील, संपादक, राजकीय कार्यकर्ता अशा कांहीं भूमिका मीं केल्या. माझ्या बोलकेपणामुळें मोठेपणीं हा मोठा वकील होणार असें भाकीत वर्तविणारीं कांहीं वडिल माणसें होऊन गेलीं. पण तें भाकीत केवळ अर्धेंच खरें ठरलें. म्हणजे मी मोठा वकील तर झालोंच नाहीं पण वकील राहिलोहि नाहीं. राजकारणानें व वृत्तपत्रव्यवसायानें माझा घास घेतला. माझी सनद केव्हां गेली व वकिली केव्हां बंद पडली हें मला कळलेंहि नाहीं. त्याचें दुःखहि मला वाटलें नाहीं. वर्तमानपत्र चालवितां चालवितां (व त्यापूर्वीहि) मी पुष्कळसें लिहूं लागलों पण गांधीवधोत्तर आमचें पत्रच मुळीं बंद पडलें. कर्तेपणाचें राजकारण संपुष्टांत आल्यासारखें झालें. मग मागें उरला केवळ लेखक. तो लेखक आतांपर्यंत अनेक ठिकाणीं जखडला गेला होता. स्वेच्छेनेंच जखडला गेला होता. आतां तो पूर्णपणें मोकळा सुटला. मी स्वैरपणें लिहूं लागलों. केवळ राजकीय लिखाणच नव्हे तर गोष्टी, नाटकें, कादंबऱ्या, निबंध, पटकथा साऱ्यांचाच परामर्ष मी घेऊं लागलों. लिहिणे हाच आपापतः माझा धंदा बनला. त्यांतच मला आनंद वाटूं लागला. लेखक म्हणूनच मी स्थिरावलों. व्याख्यानें मी देतच होतों.



बरें झालें देवा
खोव्या अधेलींत
झाले वडे सात
आणि मोड

अगदीं शाळकरी दिवसापासून देत होतों, पण आतां माझें बोलणेंहि (लिहिण्याप्रमाणेंच) केवळ राजकीय उरलें नाहीं. अनेक विषयांवर मी बोलूं लागलों. अंतर इतकेंच पडलें कीं पूर्वी मी फुकट उपदेश करीत असे—लिहून आणि बोलून—आतां या दोन्ही कामांसाठीं मी दक्षिणा घेऊं लागलों. मी धंदेवाईक लेखक व वक्ता बनलों.

दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं माझी सैन्यांत जाण्याची इच्छा होती. तेव्हां ती गोष्ट सुलभ होती पण घडावयाची नव्हती म्हणून ती घडली नाहीं. अखंड हिंदुस्थानचा सर्वसत्ताधारी सम्राट किंवा प्रमुख बनण्याचीहि माझी इच्छा होती. आजचे अनेक प्रमुख पाहिल्यावर माझी ती इच्छा अगदींच गैरवाजवी होती असें वाटत नाहीं. पण अद्याप तरी माझें स्वप्न प्रत्यक्षांत आलेलें नाहीं. मी लेखकच राहिलों. आणि थोडा विचार केल्यावर मला वाटतें कीं मी लेखक आहे व लेखक राहिलों तेंच ठीक आहे कारण स्वप्नांवर जगणारा, स्वप्नें निर्माण करणारा व स्वप्नें दाखविणारा सर्वसमर्थ कल्पनाशील लेखक अनेक भूमिका करूं शकतो. परकाया प्रवेशाची विद्या अवगत असलेला (चांगल्या लेखकांना ही विद्या अवगत असावीच लागते.) लेखक कांहीं काळ तरी सम्राटाच्या भूमिकेशीं एकरूप होऊं शकतो. तो सम्राट बनूं शकतो, बनवूं शकतो जसें जातिवंत नटाला राजाहि होतां येतें व भिकारीहि होतां येतें, जेताहि होतां येतें व जीतहि होतां येतें. ह्या दोन्ही भूमिकांचें सुखदुःख अगदीं एकरूप होऊन त्याला मनसोक्त लुटतां येतें. बरोबर तीच गोष्ट लेखकालाहि करतां येते. जितकीं म्हणून पात्रें तो निर्माण करील तितके अवतार त्याला घेतां येतात. तितक्या भूमिका भोगतां येतात. न निर्माण केलेल्या पात्रांतहि तो रंगून जाऊं शकतो. हें अगदीं अल्पकाळच घडत असेल. पण तें घडतें. येथें माप काळाचें वापरावयाचें नसून भावनेच्या व अनुभवाच्या उत्कटतेचें, विविधतेचें व समृद्धीचें माप वापरावयाचें आहे. तसें म्हणाल स्वप्नें (कलात्मक व अन्य) अल्पकाळच टिक-


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका



माझी ट्रकची निवड ? अर्थात्‌च फार्गो



भैया, दिर्घकाल ट्रक चालविण्याच्या अनुभवानें माझी खात्री झाली आहे कीं फार्गो ट्रकांच्या उत्कृष्टते-बद्दल दोन मतें असूंच शकत नाहींत. उदाहरणार्थ ॲक्सल्स घ्या ना. फार्गो गाडीला " टिमकेन " ॲक्सल्स लावलेलीं असतात. आतां त्याना "रोकवेल स्टॅन्डर्ड" या नांवानें ओळखतात आणि तीं उत्कृष्ट म्हणून सर्व जगभर सुप्रसिद्ध आहेत. प्रचंड वजन वाहून नेण्याची शक्ति असलेलीं हीं ॲक्सल्स इतकीं चांगलो आहेत कीं आम्हां ट्रक चालविणाऱ्यांना त्यांच्यावर संपूर्णपणें विसंबून राहतां येतें. या दृष्टीनें त्यांचें आम्हांला फारच महत्व वाटतें.

याशिवाय आणखी इतर कितीतरी उच्च दर्जांचीं वैशिष्ट्यें आहेत तीं सर्व एकत्र केलीं कीं त्यांपासून निष्कर्ष एकच निघतो. तो म्हणजे फार्गो हा एक महान ट्रक आहे हा होय. वजन वाहून नेण्याच्या शक्तींत, टिकाऊपणांत पैसे कमविण्याच्या सामर्थ्यांत अशा सर्व बाबतींत तो महान आहे. माझी खात्री आहे, तुम्हीही यापुढें फार्गो ट्रकच वापराल.



फार्गो डीझेल ट्रक

निर्मातेः दी प्रीमियर ऑटोमोबाइल्स लिमिटेड, मुंबई

MAR SISTA'S-PAL-409

आपल्या नजिकच्या डीलर्सना भेटा.









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

तात. (व तरी चिरंजीवहि होतात.) तरी तीं स्वप्नें, तेव्हां आपणाला खरींच वाटतात. कांहीं एका अर्थानें तीं असतातहि खरीं. स्वप्नांतहि आपण हसतों आणि रडतों. भयभीत होतों व आनंदित होतों. हा अनुभव अल्पकाळ टिकत असेल पण त्या वेळेपुरता तरी तो अनुभव तीव्र असतो.—एरवी काळाच्या मापानेंच मोजलें तर हें आयुष्य सुद्धां अगदीं स्वप्नवतच नाहीं काय? इतकेंच क्षणभंगुर व अल्पकालीन नाहीं काय?—परंतु तरीहि हें आयुष्याचें स्वप्न खरेंच आहे. व साहित्याचें बहुरंगी स्वप्नहि खरेंच आहे, तितकेंच आनंददायक आहे. तो आनंद तितकाच अनेकरंगी आहे—तितकाच खरा आहे. ईश्वराप्रमाणेंच लेखक अनेक पात्रें व त्यांचें सुखदुःख (त्या ईश्वराच्या प्रसादानेंच) निर्माण करतो. तो त्या पात्रांशीं एकरूप होऊन जातो. त्यांच्या समवेत तो हसतो व रडतो. व तुम्हालांहि हसवितो किंवा रडवितो. म्हणूनच अनेक भूमिका भोगणाऱ्या निर्माण करणाऱ्या व समजणाऱ्या लेखकाची भूमिका मला आवडते व मला वाटतें मी गाडीचा रक्षक अथवा हिंदुस्थानचा सम्राट झालों नाहीं हें बरेंच झालें. लेखकाला सम्राटाच्या भूमिकेशीं एकरूप होतां येतें परंतु सम्राटाला सामान्यतः ती किमया साधण्यासारखी नाहीं. शास्त्रज्ञ व लेखक दोघेहि स्वप्नावर जगतात. स्वप्नें साकार करीत असतात. त्याचीं स्वप्नें जेव्हां खरीं होतात तेव्हां सम्राटांचीं सिंहासनेंहि हादरूं लागतात. अंतरिक्षप्रवासाचें स्वप्न व्हर्न (Verne) सारखा एखादा लेखक सांगतो व शास्त्रज्ञ ह्या स्वप्नापासून प्रेरणा घेतो, तें प्रत्यक्षांत आणण्याच्या उद्योगाला लागतो. एकाचा भर अक्षरांवर असतो, दुसऱ्याचा भार आकड्यांवर असतो. पण आकड्यांच्या व अक्षरांच्या जादूनें मानवी संस्कृतीचा व प्रगतीचा बहुतेक सारा इतिहास घडविला आहे. तेव्हां. अक्षरांशीं माझा घनिष्ठ संबंध आहे हें बरेंच आहे. मी लेखक आहे हें बरेंच आहे. कांहीं काळ कचित् मी दुसरी एखादी भूमिका घेतली तरी अक्षरें मला सोडणार नाहींत व मी अक्षरांना सोडणार नाहीं. मी लेखक आहे व लेखकच राहणार. • • •

# चित्रकलेंत प्राविण्य मिळविलें; पण झालों नर्तक !

—उदयशंकर

काय गंमत आहे पहा. माझे वडील पं. श्यामाशंकर चटोपाध्याय हे इंग्लंड येथें बार अॅट लॉ. होऊन तिथेंच वकिली करीत होते. त्यांचें वर्तनही एखाद्या योग्यासारखें. त्यांच्या मित्रमंडळींत फार थोरथोर माणसें होतीं. महात्मा गांधी, रवींद्रनाथ टागोर, पं. मदनमोहन मालवीय प्रभृति श्रेष्ठ लोक त्यांच्याबद्दल मोठा आदर बाळगीत. ते जिनेव्हाला होते. बनारस हिंदु विद्यापीठाच्या संस्थापकांपैकीं एक होते. तिथें अध्यापकहि होते. झालावाडा संस्थानचे मुख्य मंत्रीहि होते. अखेरीस ते कालिफोर्नियांत जाऊन वेदांताचा प्रचार करूं लागले.

अशा या प्रकांडपंडिताच्या पोटीं एकाहून एक कलावंत मुलें जन्माला यावीं हें आश्चर्य नाहीं काय? मला लहानपणापासून चित्रकलेचा ओढा. वडिलांनीं माझ्यांतली उपजत कलावंत वृत्ति पाहून माझ्या मनाप्रमाणें मला चित्रकलेचें शिक्षण द्यायचें ठरविलें. त्याप्रमाणें मॅट्रिक झाल्यावर मुंबई येथील जे. जे. स्कूल ऑफ आर्ट या संस्थेंत प्रवेश मिळविला. आणि चित्रकलेचा अभ्यास करूं लागलों. तशी नृत्याची मला लहानपणापासूनच आवड आणि थोडासा अभ्यासहि होता; पण माझें सबंध जीवन नृत्यमय होईल, नृत्यांत बुडून जाईल अशी मला कल्पनाहि नव्हती.

'स्कूल ऑफ आर्ट'चा शिक्षणक्रम पुरा करून कांहीं दिवस मीं घरीं स्वस्थ बसलों होतों. एकाएकीं इंग्लंडहून वडिलांची तार आली—'एक दोन तज्ज्ञ नृत्यकारांसह इंग्लंडला ये' तशी सर्व व्यवस्थाहि त्यांनीं केली होती. मला कांहीं कल्पनाहि करतां येईना; पण सर्व व्यवस्था झाली होती, मला जाणें भाग होतें.

गोष्ट अशी झाली होती, कीं जसे इथें तसेंच इंग्लंडमध्यें देखील माझ्या वडिलांचे चाहाते पुष्कळ होते. त्यांत कांहीं लॉर्ड, कांहीं नामांकित कलावंतहि होते. या कलावंतांत ख्यातनाम नर्तकी पावलोवा हीहि होती. एका दिवशीं गप्पागप्पांतून माझ्या वडिलांनीं भारतीय नृत्यकला म्हणजे काय याचें विश्लेषण आपल्या मित्रमंडळींतून केलें. बोलण्यांत बोलणें वाढलें आणि अस्सल भारतीय नृत्याचें प्रदर्शन इंग्लंडमध्यें व्हावें अशी पावलोवासकट सर्वांनीं इच्छा प्रदर्शित केली. खर्चाच्या बाबतींत कोणतीहि ढिलाई नव्हती.



बरें झालें देवा
झालों मी पुढारी
होती चौपदरी
पूर्वी हातीं

भारतीय नृत्याचें प्रदर्शन करायचें म्हणजे पार्श्वभूमि आदि दृश्यें देखील भारतीयच हवीं होतीं. तीं रंगविणारा इंग्लंडमध्यें कुणी नव्हता. माझ्या वडिलांनीं त्यासाठीं मला तार केली. आणि येतांना एकदोन नृत्यकारहि आणायला सांगितलें मी गेलों. कार्यक्रमाची सर्व तयारी केली. कार्यक्रमहि उत्तम झाला. मी माझ्या परीनें खूप मेहनत केली होती. नृत्याच्या भागांत प्रत्यक्ष मदतहि केली होती. माझें हें कसब पावलोवाच्या नजरेंतून सुटलें नाहीं. तिनें हरप्रयत्न करून मला आपल्या संचांत ओढलें. वडिलांना हें पसंत नव्हतें; पण बरीच वजनदार मंडळी मध्यें पडली. आणि त्यांची सहानुभूति मिळाली.

पावलोवाच्या संचांत राहून मी 'रॉयल कॉलेज ऑफ आर्ट' या संस्थेंत माझें नांव दाखल करून अल्पावधींत ए. आर. सी. ए. ही चित्रकलेंतली उच्च पदवीहि मिळवली; चित्रकलेंतल्या दोन पदव्या मला मिळाल्या; पण चौकटींत बसवून भिंतीवर लटकावण्यापलीकडे




अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

त्यांचा आणखी कांहीं अन्य उपयोग मला करतां आला नाहीं. पावलोवाचा संच सोडून मी माझा स्वतःचा संच काढला. आणि जगभर नृत्याचे कार्यक्रम करीत राहिलों. भारतीय नृत्याची ध्वजा दुनियेच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत नाचवली. चित्रफलकावर कुंचला नाचवण्याऐवजीं मीं अनेक नृत्यनाट्यांतून काल्पनिक कुंचला नाचवला. एक स्वप्न कुठल्याकुठें विराम पावलें आणि स्वप्नांतहि नसलेलें दुसरेंच कांहीं साकार होऊन समोर उभें राहिलें; पण झालें त्यांतून कांहीं वाईट निष्पन्न झालें नाहीं. एखाद्या वेळीं असेंहि वाटतें 'बरें झालें देवा' एकारकीं मला इंग्लंडला पोचवण्याची माझ्या वडिलांच्या मनांत तूच प्रेरणा केलीत. नपेक्षां आजपर्यंत जें कांहीं घडलें तें घडलें नसतें.... • • •

# डॉक्टर झालें, पण दवाखाना काढूं शकलें नाहीं !

—डॉ. सरोजिनी बावर

आमच्या गांवापासून तसं पाहिलं तर आमचं शेत बरंच लांब आहे. दोन अडीच मैल जमीन पायाखालीं तुडवल्याखेरीज शेताचं दर्शन घडायचंच नाहीं असा प्रकार. तर सुगीच्या दिवसात गंमत काय व्हायची कीं, आमच्या या शेतावरील माळरानांत भुईमुगाच्या शेंगा भराला आल्या म्हणजे त्या तोडीत बसायची मला भारी हौस. परकराच्या ओच्यांत नाहींतर हातांतील बुरूड बुट्टींत शेंगा वेंचीत रहायचा मला मोठा छंद. अशा वेळीं आपण खूप शाळा शिकावी आणिक डॉक्टर व्हावं असं माझ्या मनांत यायचं. त्यासाठीं आमच्या घरीं अधूनमधून येणाऱ्या एका मिशनरी डॉक्टरचा आदर्श माझ्यापुढं असायचा. त्या माणसाचा चोवीस तास दिसणारा हंसरा चेहरा, लोकांशीं होणारं गोड बोलणं, काम करतांना दिसणारी तरतरी, वाटेल तेव्हां कुणाच्याहि हाकेसरशी मदतीला धावून जाण्याची तयारी न् मुख्य म्हणजे धडधाकट तब्येत या गोष्टींची मनाला भुरळ पडायची. त्यामुळं एकसारखं मनांत यायचं कीं, आपणहि असं डॉक्टर व्हावं.

म्हणून मग सतरा ठिकाणच्या शाळा करीत करीत मी जेव्हां इंग्रजी शिकायला सुरुवात केली तेव्हां घरच्या लोकांच्याजवळ मी हा विषय काढला. वाटलं होतं कीं, सगळे होकार भरतील म्हणून. पण नाहीं. आपल्याला हें झेपायचं नाहीं असंच उत्तर ऐकायला मिळालं. वैद्यकीय शिक्षण घेण्यासाठीं खूप दूरच्या शहरांत जाऊन रहावं लागेल आणि हा शिक्षणक्रम भारी महागडा आहे तेव्हां यांतलं आपल्या आवाक्यांत बसणारं असं कोणतंच नाहीं यासंबंधीचा तपशीलवार खुलासा पुढ्यांत आल्यामुळं माझं बोलणंच खुटलं होतं. शिवाय पोरीच्या जातीला एवढं शिकून काय करायचं, ह्या प्रश्नालाहि त्यावेळीं माझ्या पोरसवदा मनांत उत्तर गवसणं शक्य नव्हतं. तशांतच मी मॅट्रिकला असतांना ऐनपरीक्षेच्या दिवसांत मुदतीच्या तापानं फारच आजारी झालें न् मला विलक्षण अशक्तपणा आला. तरीदेखील कशीबशी परीक्षा देऊन मी पास झालें. पण या आजारांत माझा पाय अधू झाल्यामुळं डॉक्टरांनींहि आतां मी वैद्यकीय शिक्षणक्रम हातीं घेऊं नये असं मला स्पष्ट बजावलं. कारण माझ्या तब्येतीला तें झेपणारं नव्हतं. म्हणून मी मनांतील ह्या इच्छाआकांक्षेला मुकाट्यानं गुंडाळून ठेवून त्यावेळीं मूग गिळून बसलें खरी, पण अजूनहि माझ्या मनाला ही गोष्ट अधून-मधून खटकते. वाटतं कीं, माझी ही हौस कशी कां होईना, भागायला हवी होती. म्हणजे मग त्या मिशनरी डॉक्टरला मी देखील एक चांगला आदर्श दाखवू शकलें असतें.

मी जर डॉक्टर होऊं शकलें असतें तर खरंच माझ्या मनांत होतं कीं, आमच्या गांवच्या माळावर जसा विठ्ठा देव बसला आहे तसा एक दवाखाना वसवायला हवा होता. आजकालच्या सर्व प्रकारच्या सुखसोयींनीं सुसज्ज असं एक रुग्णालय मी चालवूं शकलें असतें. माझ्या कल्पनेप्रमाणं तिथं पांचपन्नास रोग्यांची रहाण्याची सोय मला करायची होती. आणि आसपासच्या अनेक खेड्यांतील लोकांची मला सक्तीनं वैद्यकीय तपासणी करून त्या लोकांचें आरोग्य निरोगी ठेवायचं होतं. त्यासाठीं महिन्याकांठीं कांहीं ठराविक रक्कमच दुधाला रतीबाचे पैसे द्यावेत तशी त्या लोकांच्या कडून मी घेणार होतें. आणि त्या पैशांत सर्व प्रकारची वैद्यकीय मदत देणारं एक फिरतं सेवा-पथक व फिरता दवाखानाहि मला उभारायचा होता. शिवाय हें सारं करतांना ह्या माळावरच्या दवाखान्यांत सर्व प्रकारचे रोगतज्ञ मी पदरीं बाळगूं इच्छीत होतें आणि ह्या दवाखान्याचा

Telephone :- 29130
रजिस्टर्ड ट्रेड मार्क
REGISTERED TRADE MARK
Grams "SACHEWORK" Bombay-Dadar
एस्. एच्. केळकर आणि कं. (प्रा. लि.)
एसेन्शियल आईल्स – अरोमटिक केमिकल्स रेझिनॉइडस्
इत्यादि बनविणारे
पहिले भारतीय कारखानदार
आमचे प्रख्यात व उच्च प्रतीचे "नाग छाप"
सुगंधी अर्क सौंदर्य प्रसाधनांत सर्वत्र वापरले जातात.
३७, मंगळदास रोड, मुंबई नं. २.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

एक ट्रस्ट करून मला तिथं मिशनरी सेवावृत्तीचा पायंडा पाडून चोवीस तास काम करण्यांतच खरा आनंद असल्याचा धडा आमच्या लोकांना घालून द्यायचा होता.

म्हणून कितीदां तरी ह्या दवाखान्यासाठीं मी निरनिराळीं उपकरणं, शस्त्रक्रियेचीं साधनं, रेफ्रिजरेटर, विजेचे पंखे, ऑपरेशन थिएटर, रुग्णाइतांसाठीं वाचनालय, करमणुकीसाठीं रेडिओ, आरामासाठीं उद्यान, स्वच्छतेसाठीं नोकरचाकर, आरोग्याचे धडे देणारे मानस-शास्त्रज्ञ, आल्यागेल्याची हंसतमुखानं विचारपूस करणारी दाई, रोग्यांना पैशाबाबत त्रास न देतां समजावून सांगूं शकणारी एक वयस्कर मातोश्री, रोग्यांचे नातलगांना हरकामी उपयोगी पडणारीं चुणचुणीत मुलं व त्यांचेसाठीं म्हणून एक स्वतंत्र असं सर्व प्रकारच्या सुखसोयींनीं सुसज्ज असलेलं निवासस्थान, या सर्व प्रकारच्या कामासाठीं विजेचा उपयोग करतां यावा म्हणून जनरेटर आणि कुणाला कांहीं बरंवाईट सांगायचं असेल तर तें टिपून घेणारं आवाजयंत्र (टेपरेकॉर्डर) असल्या अनेक गोष्टींची आंखणी करून मी मनानं खरेदीहि केलेली आहे! एवढंच नाहीं तर इतर दवाखान्यांतून तिथल्या डॉक्टरांना कांहीं मदत देतां आली तर पहायचा खटाटोपहि बिनबोभाट केलेला आहे.

परंतु प्रत्यक्षांत मात्र यांतलं कधींच कांहीं घडूं शकलं नाहीं! त्यामुळं एखाद्या रोगाचं संशोधन करून त्यासंबंधींचा शोध-निबंध परदेशांत जाऊन निष्णात डॉक्टरांच्या परिषदेंत वाचण्याचा मोह जसा मला बाजूला ठेवावा लागला आहे, तसाच अनेक रुग्णाइतांचा देखील हिरमोड करावा लागला आहे. म्हणून आलेल्या तांतडीच्या टेलिफोनवर जशी मी कुणाला वैद्यकीय सल्ला देऊं शकलें नाहीं, तशीच एखाद्या अडलेल्या बाईला मरणप्राय यातना होत असलेल्या समोर दिसत असतांनाहि मी कांहींच करूं शकलेली नाहीं! हां, नाहीं म्हणायला मी इतर डॉक्टरांची या कामीं तांतडीनं मदत मिळेल हें जरूर पाहिलं आहे आणि त्या माझ्या धावपळीनं अनेकांचे प्राणहि आजवर वांचूं शकले आहेत. अशा वेळीं मात्र आमच्या गांवच्या माळावरचा दवाखाना उभारून मी माझं इच्छित ध्येय गांठूं शकलें नाहीं तरी त्या महत्त्वाकांक्षेमुळें माझ्या मनांत निर्माण झालेल्या सेवावृत्तीमुळं आज मी असंख्य लोकांच्या जरूर त्या अडचणी दूर करण्यासाठीं धडपडूं शकतें आहें यांतला आनंदहि कांहीं कमी नाहीं याची मला आतां खात्री पटूं लागली आहे. म्हणून मी माझं कोणतेंहि काम करतांना, बरं झालं देवा, मला त्या मिशनऱ्या-प्रमाणं डॉक्टर व्हायची बुद्धि झाली, नाहीं तर सामान्य लोकांसाठीं आपण कांहीं केलं पाहिजे या मनोभावाला मी केव्हांच पारखी झालें असतें. आणि सांगायचं म्हणजे भरपूर पैसा मिळवून स्वतःच तेवढं चैनींत राहून वेडूटपणाचं जीवन जगायचा मोह मला झालाच नसता, असं मग कुणीं सांगावं? कदाचित् जगापासून अलिप्त राहून आलिशान राजवैभव उपभोगण्याच्या मार्गीहि मी लागलें असतें, कुणीं सांगावं? म्हणजे मग मीहि कुणाची पर्वा केली नसती न् मलाहि कुणीं विचारलं नसतं!

तसं होऊं नये म्हणून मी आपल्या माय-देशीं सेवानिवृत्तीनंतरचं वय घेऊन परतलेल्या त्या मिशनरी डॉक्टरची आठवण मनांत घोळीत सुगीसराईत अजूनहि आमच्या शेतांतील शेंगा वेंचीत रहातें! आणि मग आजचं माझं जीव-नहि कांहीं वाईट चाललेलं नाहीं याची खात्री पटत जाऊन मी माझं अंगिकारिलेलं काम हंसतमुखानं अविश्रांत मेहनत घेत करीत रहातें. अशा वेळीं वाटणारं समाधान वर्णना-पलीकडचं आहे आणि सध्यां मी मिळविलेल्या 'डॉक्टरकीं'तील सुखहि किती अपूर्वाईचं आहे हें कुणाला सांगून कळण्यासारखं नाहीं! त्या कारणानं बालपणापासून डॉक्टर होण्याच्या माझ्या छंदांतील या ना त्या प्रकारानं पदरीं पडलेला आनंद माझा मलाच लखलाभ होतो. त्या संदर्भात कुणाला कांहीं सांगायच्या फंदांत मी कधींच पडत नाहीं. देवाशपथ! • • •

# या नवचित्रकलेच्या नादापासून वाचलों....!

**—चित्रकार मुरलीधर आचरेकर**

लहानपणींच चित्रकलेच्या शिक्षणास सुरुवात झाली. त्या माझ्या आवडीच्या विषयांत पुढें इतका रंगून गेलों, की जगांत इतर छंद वा आकांक्षा असतात याची जाणीवहि झाली नाहीं. थोड्या फार राहिलेल्या इच्छा पुढील आयुष्यांत अनुभविल्या व त्यांचा आस्वादही घेतला, पण उत्तर आयुष्यांत झालेला जागतिक बदल आणि त्यांतून जन्मास आलेल्या नव-चित्रकलेच्या बुडाशीं जाऊन त्यांत दडून बसलेलें गुपित शोधून काढण्याची सुप्त इच्छा गेलीं, कैक वर्षं माझ्या मनांत ठाण देऊन बसली होती. एकदां असाच एक प्रसंग घडला व ती सुप्त इच्छा एकदम जागृत झाली.

एक चित्रकलेचा परीक्षक म्हणून माझी निवड झाली. त्यांत जुन्याबरोबर नवचित्रकारांच्या कलाकृतींचाही समावेश होता व ते सर्व चित्रकार जमावानें बाहेर उभे होते. इतर परीक्षकांबरोबर निकालपत्रिकेवर सही ठोकली व मी बाहेर पडलों, इतक्यांत "अवनतावस्थेच्या काळांत जन्मास आलेल्या चित्रकारांना नव चित्रकला काय कळणार?" असा टोला कानीं आला. त्या एका वाक्यानें माझ्या चित्रकलेतील दोन तपांच्या सेवेला सुरुंग लागला. रॉकेट-सारखा अंतराळांत उडून गेलों, आणि नव विचारांच्या छत्रीला लोंबकळत नव्या जगांत आदळलों.

अनेक पुस्तकें वाचलीं. कलेंतील नवतज्ज्ञांचे परस्परविरोधी विचारांचें मनन केलें. नैसर्गिक बंधनांचा चक्काचूर केला व अनैसर्गिक बंधनांनीं मनास गुरफटून घेतलें. उलटी दृष्टि अवगत केली. दुर्गंधींतही सुगंध दिसूं लागला. सत्यतेंतून निराकार गांठला, पण निराकारांतून नव आकार कल्पनेंत उतरेनात. तरीही ते प्रत्यक्षांत उतरविण्याचा अट्टाहास सोडला नाहीं. झाडूपासून ते बुटाच्या ब्रशापर्यंत मिळ-तील तीं साधनें गोळा केलीं आणि शेणापासून ते पानांतल्या कात्यापर्यंत रंगसामुग्री जमा केली. अनेक चित्रें काढलीं आणि तीं फाडूनही टाकलीं.

माझ्या कलेंतील झालेलें हें परिवर्तन माझ्या चाहत्यांना रुचलें नाहीं. शुद्धींत वागत होतों म्हणून वेडा ठरविलें नाहीं. इतकेंच पण जातां येता, "ही काय कला आहे? याहून आमचीं मुलें अधिक चांगलीं चित्रें काढतात" अशी हेटाळणी केल्याशिवाय ते







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

राहात नसत. त्यांच्या या टीकेंत कांहीं अर्थ वाटला. मुलें निरागस असतात. त्यांच्या मना-वर मानवी बंधनाचा परिणाम झालेला नसतो, हे विचार येतांच बिल्डिंगमधील सर्व मुलांना एकत्र केलें. चित्रकलेचें सर्व साहित्य त्यांच्या पुढें टाकलें व त्यांच्याकडून अवघ्या तासांत पंचवीस चित्रें गोळा केलीं, व तीं भिंतीवर लावून त्यांचें बारकाईनें निरीक्षण करूं लागलों. इतक्यांत माझे एक प्रतिष्ठित नवचित्रकार स्नेही मी कांहींतरी नव्या प्रयत्नांत गुंतलों आहें असें कळतांच मला भेटण्यास आले. स्टुडिओंत प्रवेश करतांच त्यांची नजर त्या मुलांच्या चित्रांवर खिळली आणि ते क्षणार्धांत देहभान विसरले. त्यांना त्यांच्या समाधींतून जागे करण्याच्या विचार करतों तोंच, "मार्व्हलस" असा उद्गार काढून मोठ्या समाधानानें त्यांनीं खुर्चीत देह टाकला. मी आश्चर्यानें त्यांच्याकडे आणि चित्रांकडे आळीपाळीनें पाहूं लागलों. मला बुचकळ्यांत पडलेलें पाहून ते म्हणाले, "अरे असा बावरलास काय? Go ahead, it is beautiful. मला वाटलं नव्हतं की तुझं सोनारकाम सोडून तूं या नव्या प्रयत्नांत इतकी लवकर प्रगति करशील." पुढें त्यांनीं प्रत्येक चित्रांतील वैशिष्ट्य, रचना, रंग व त्यांतील बारकाव्यांचें वर्णन सुरू केलें. त्यांचा गैरसमज झाला आहे हें माझ्या तेव्हांच लक्षांत येऊन, तो दूर करण्याच्या उद्देशानें म्हणालों, "अहो, तीं आमच्या बिल्डिंगमधील लहान मुलांनीं काढलेलीं चित्रें आहेत. हें ऐकतांच त्यांनीं मला गुरूपदेश करण्यास सुरुवात केली.

"मग त्यांत काय झालें? मुलें हीच खरी नवविचारांचीं मार्गदर्शक असतात. त्यांच्या कोवळ्या मनावर बऱ्यावाईटाचे दुष्परिणाम झालेले नसतात, आणि त्यामुळेंच या चित्रांत सत्याचे फवारे उडतांना दिसतात. या चित्रांचा नीट अभ्यास कर यांतील प्रत्येक कलाकृति तुला नवें मार्गदर्शन करील. कांहींत गंमत वाटेल तर कांहींत तुला व मला जें दिसत नाहीं तें लप-लेलें दिसेल. नवचित्रकलेच्या बुडाशी जाण्याचा हाच खरा मार्ग आहे, हें तुला माहीत नसेल. अलीकडेच विलायतेंतील एका प्राणी संग्रहा-लयामध्यें माकडाकडून चित्रें काढून घेतलीं, आणि तीं इतकीं अप्रतिम ठरलीं कीं, त्यांवर तज्ञांनी मोठे साहित्य लिहून त्यांची वहावा केली. तूं अगदी योग्य मार्गावर आहेस.




*ती म्हणाली "मीं कवितांचं बाडच बंबांत टाकून दिलं—" मी तिचे दोन्ही हात हातांत घेऊन म्हटलं—"मी तरी कुठें लिहितों हल्लीं? सगळं सोडून दिलेलं आहे मी...."*

—पु. शि. रेगे

**द**क्षाच्या शेवटच्या भेटीला सोळा वर्षं झालीं होतीं, पत्रव्यवहार थांबल्याला दहा वर्षं, आणि तिला जवळजवळ विसरल्यागत झालेल्याला—? पण उगाच हा हिशेब करण्यांत अर्थ नव्हता. तिचं एक तुटक पत्र आलं होतं आणि लगेच दोन दिवसांनीं ऑफिसमध्यें तांतडीचा फोन.

पत्रांतलं अक्षर ओळखीचं होतं—दीर्घ मुदतीमुळं, कदाचित् तिला आतां पूर्वीसारखा लिहिण्याचा सराव नसल्यामुळं, थोडं 'बिघडलेलं,' जुन्याचा अनुकार कटाक्षानं करण्याइतकं त्राण नसलेलं. पत्ता दिला होता भायखळ्याच्या एका हॉटेलचा—जो मला खरोखरच शोधून काढावा लागणार होता. आणि मजकूर? कांहीं नाहीं. मी इथें आलें आहें. दोन किंवा तीन दिवस आहें.

पहिल्यांदा मी मुद्दामच मन घट्ट करून घेतलं—मागचं सगळं बाजूला सारून, आतांचं सगळं तपशिलवार स्वतःलाच पटवून देत. इतकीं वर्षं कोण कुणाचा राहिलेला असतो?

मला आठवलं दक्षा अशीच उभी असायची आपल्या मामाच्या घराच्या खिडकींत. मी माझ्या खोलीच्या खिडकीशीं बसलेला पुस्तकांतील अक्षरांची संवय करीत. तिची मुद्रा असायची निर्विकार, जणुं आपण कांहींच पहात नाहीं अशी. मी तर तिला दिसतच नव्हतों—अगदीं समोर शेजारच्या घरांत खालच्या मजल्यावर पंचेचाळीस अंश कोन करणाऱ्या भुजाच्या दुसऱ्या टोंकाला अस्वस्थ बसलेला. बॅबिंग्टन-स्मिथ कमिटीच्या सर्व चलनविषयक सूचना माझ्या समोरच्या पुस्तकांत दक्षाच्या नांवानं चित्रित झाल्या असायच्या...भारतीय अर्थशास्त्र मी माझ्यापुरतं तेव्हां असं सोपं करून टाकीत असें.

ही दक्षा कधीं घरांतून बाहेर पडायची नाहीं. पहिले पांच-सहा महिने तरी मी तिला आजूबाजूला कुठंच पाहिलं नाहीं.

पुष्कळ वाचून मग नंतर पुष्कळ फिरायचं असा माझा तेव्हां एक नियम असे. पिसाटा-सारखा एकटाच सँढर्स्ट रोड, ह्यूज रोड, गिब्ज रोड या वाटेनं हँगिंग गार्डनवर जाऊन न थांबतां सहा प्रदक्षिणा घालायचों आणि शिरी रोडनं तितक्याच वेगानं धांवत येऊन पुन्हा रात्रीं जेवून अभ्यासाला बसायचों. असेच कांहीं दिवस गेले...भारतीय चलनशास्त्राच्या इतिहासांत झपाट्यानं बदल होत होता. सरकार केवळ माझ्यासाठींच नवनवीन कमिट्या नेमीत होतं.

याच सुमाराला अचानक माझं खिडकीयुग संपलं. दक्षाची कधीं तरी, कुठं तरी प्रत्यक्ष ओळख झाली. तिला मी माझ्या कविता वाचायला देऊं लागलों. तीहि त्या वाचून त्यांच्याबद्दल एक अक्षरहि न बोलतां नियमित दोन दिवसांनीं त्या मला परत आणून देऊं लागली. एका कवितेचं नांव होतं, 'वीणा-गीत.' मी ती कविता ग्रीक वीणेची आकृति काढून एकेक ओळ एकेका तारेच्या जागीं लावून दिली होती. हा वीणा-बंध म्हटला तर अगदीं जुन्यांत जुना होता.






अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

दक्षानं हें गीत वाचून परत करतांना त्यांतील वीणेची बाह्य आकृति अधिक सुबक करून दिली. कशिद्यासाठीं हें नवं डिझाइन आपण कॉपी करून ठेवलं आहे असंहि सांगितलं.

त्यानंतर दोन-तीन दिवस भारतीय अर्थशास्त्रावर मी अधिक परिश्रम घेतले. हुंडणावळीच्या दरावर जे उलट-सुलट मतप्रवाह (तो दर रूढ होऊन सात वर्षें लोटलीं तरी) चालू होते ते एकत्रित करून एक निबंधहि लिहून काढला.

वास्तविक दक्षाला सर्व कांहीं कळत होतं. ती मला या प्रकरणांत जितकं बनवायचं तितकंच बनवीत होती. प्रेम कसं करायचं हें मी शिकत होतों.

नंतर पत्रं, दाखले, भेट दिलेल्या वस्तू, आणा-भाका—तपशील खूपच वाढला. परीक्षा जवळ आली तसं वाटायचं कीं हा उगाच पसारा मांडून बसलों.

रिझल्ट लागला आणि इंटरसारखाच यावेळींहि पहिला वर्ग थोडक्या मार्कांनीं मी गमावला.

मध्यंतरीं दक्षाचं लग्न झालं. ती भंडाऱ्याला कीं कुठंशी नाहींशी झाली. मी इंग्लंडला गेलों.

तीन वर्षांनीं परत आल्यावर त्या वेळच्या 'प्रतिमा' पाक्षिकांत आपल्या नांवानं तिनं प्रसिद्ध केलेल्या माझ्या कांहीं सुधारलेल्या कविताहि मी वाचल्या. हरिभाऊंना विचारून तिचा पत्ता काढावा असा विचारहि माझ्या मनांत आला नाहीं. (संपादकीय एटिकेट म्हणून त्यांनीं तो दिला नसता ही गोष्ट वेगळी!)

माझ्या पहिल्या संग्रहांत या 'प्रक्षिप्त' कविता मला बाजूला ठेवाव्या लागल्या. सावधानता म्हणून नवीन लिहितांना शैलीहि मी त्यानंतर थोडी वेगळीच ठेवूं लागलों.

या संग्रहाचं तिच्या नांवानं जेव्हां 'संदीपिकें'त परीक्षण आलं—आणि तेंहि आपल्याला सर्व कांहीं ठाऊक आहे अशा थाटांत—तेव्हां मी बापूरावांना गळ घालून तिचा पत्ता काढला. पूर्वीचं सगळं विसरून आम्ही दोघांनींहि एक चतुराईचा सोयिस्कर पत्रव्यवहार आरंभला.

मध्यंतरीचा हा सगळा इतिहास पुन्हा केव्हां तरी सवडीनं सांगायला हवा...

आज...आज दक्षाचं हें नवं पत्र दहा वर्षांनीं आलं होतं. मी मागचं—पुढचं कांहींच जाणत नव्हतों. मला अकस्मात् वाटलं कीं, मी एवढ्या पसाऱ्यांत अगदीं पहिल्यासारखाच एकाकी आहें. दक्षा खिडकींत उभी आहे आणि माझी वर्मिंग्टन—स्मिथच्या सबंध कमिटीशीं झटापट चालू आहे.

हॅमिल्टन हॉटेल सांपडायला मला चांगला पाऊण तास लागला. ही जागा दक्षानं मुद्दाम कां निवडावी तेंहि कळलं नाहीं. मी गेलों तेव्हां दक्षा नव्हती. त्यामुळंच कीं काय उगाच एक माझ्या मनावरचं ओझं कमी झालं.

मला दाखविलेल्या एका अर्धवट उजेडाच्या लाउंजमध्यें मी तिची वाट पहात बसलों. ती केव्हां येईल तें कुणीच सांगूं शकत नव्हतं.

दक्षा एकटी आलेली नव्हती—हें थोड्या संशोधनांतीं मला कळलं. बरोबर तिचीं दोन्ही मुलं होतीं. बाहेर जाऊन कांहीं चॉकोलेट—टॉफी आणून ठेवावी असा एक विचार आला. पण तितक्यांत ती येऊन गेली तर पंचाईत होईल म्हणून तो लगेच सोडून दिला.

बऱ्याच वेळानं दक्षा आली. मोठ्या मुलीला तिनं उचलून घेतलं होतं. धाकटा—चार वर्षांचा एक मोठं कागदाचं बॉक्स घेऊन मागून येत होता. तिच्या गळ्यांतील बेंगवजा पर्संहि चांगलीच जड होती.

चंदाला ताप आलाय, ऊन बाधलंसं दिसतं, असं म्हणत ती जिन्याकडेच गेली. मी उठून तिच्या मागोमाग गेलों. मुलाला उचलून घ्यावं तर तो घेऊं देईना. त्याला वाटलं मी त्याच्या हातांतलं बॉक्सच घेतों आहें. चंदाला मागून घ्यायचं मात्र भान राहिलं नाहीं. दक्षा झपझप वर चढून गेली सुद्धां.

तिच्याकडून चावी घेऊन मी खोलीचं दार उघडलं. खोली लहानशीच होती. कॉटवर चंदाला ठेवून तिनं मला बसायला सांगितलं. मुलाच्या हातांतलं बॉक्स घेऊन टेबलावर ठेवलं. त्याला मुंबईच्या काकाला नमस्कार करायला सांगितलं. त्यानंहि झटपट नमस्कार केला—नातं प्रस्थापित केल्यावर त्याचा विश्वास बळावला असावा.. आपण खालीं जेवायचं सांगून येतें म्हणून दक्षा केली.

एव्हांना सात वाजून गेले होते. बाहेर चांगलाच अंधार पडूं लागला होता.

असाच प्रयत्न चालूं ठेव, यश ठरलेलें आहे." अशा आशीर्वाद देऊन ते निघून गेले.

हें त्यांचें तत्त्वज्ञान ऐकून, नवचित्रकला, मग ती माणसानें काढलेली असो वा माकडानें, तिचें वर्णन रसभरित शब्दांत रंगवण्याचें कौशल्य अधिक महत्त्वाचें आहे हें कळून चुकलें.

माणसाची उत्पत्ति माकडापासून झाली हें मला माहीत होतें, परंतु नवचित्रकलेचा उगमहि निघून होऊं शकतो हें ऐकून त्या प्राण्याबद्दल जिव्हाळा उत्पन्न झाला. आपणहि त्याच्या सान्निध्यांत राहिलों तर नवदृष्टीचा लाभ मिळेल असें वाटूं लागलें.

इच्छा असल्यावर मार्ग असतो, म्हणतात त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशींच एका प्रसिद्ध सिने-दिग्दर्शकानें आपल्या शूटिंगकरिता आणलेल्या माकडाची सांखळी माझ्या हातांत ठेवली आणि ते चट्दिशी उडी मारून माझ्या खांद्यावर विराजमान झालें, व माझ्या स्वच्छ कपड्यांवर आपल्या चिखलांच्या पावलांनी त्याने नवचित्र कलेचे ठसे उमटविले. ते पाहातांच नव्या दृष्टीचा पहिलाच झटका मिळाला.

हातांत सांखळी आणि खांद्यावर माकड अशा थाटांत मी गाडींत बसलों. वाटेंत कधीं स्टीअरिंगवर बसून, मला सतविण्यास त्यानें सुरुवात केली. शेवटी संतापून मी त्याला मागच्या सीटवर ढकलून दिलें थोडा वेळ गाडींत शांतता झाल्यासारखी वाटलें पण समोरून भरधांव येणाऱ्या गाड्या ची ची करीत कधीं फूटपाथवर तर कधीं माझ्या अंगावर येतांना दिसूं लागल्या. व आंतील मुलेंबाळें आंत बाहेर काढून ओरडतांना दिसूं लागलीं. हें सर्व पाहून मी बुचकळ्यांत पडलों आणि मागें वळून पाहातों तो माकड बेपत्ता. गाडी थांबविली आणि येऊन पाहातो तों अर्जुनाच्या रथावर मारुती विराजमान झाला त्याप्रमाणें ही स्वारी गाडीच्या टपावर आरूढ होऊन जाणाऱ्या येणाऱ्या गाड्यांकडे पाहात दात विचकीत बसली होती. कसेंबसें त्याला आंत घेतलें व डाव्या हातानें गच्च धरून घर गांठलें.

दारांत पाऊल ठेवतांच त्यानें सर्व घर पालथें घातलें आणि पहिल्याच फटक्यांत हिची आवडती फुलदाणी रसातळाला पोहोंचवली आवाजाबरोबरच स्वयंपाकगृहांतून तलवार उपसली गेली.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"ही काय कटकट घरांत आणली आहे? घरांत आहेत तीं माकडं थोडीं झालीं वाटतं?"

आल्या पावलांनी पूर्वे थाटांत घराबाहेर पडलों. वाटेंत तें एका मुलाला चावलें आणि त्याचे पालक जणुं काय मीच चावलों अशा आवेशांत माझ्यावर तुटून पडले. क्षमेची याचना करून कपाळमोक्षांतून सुटका करून घेतली.

स्टुडिओंत येतांच, चित्रकलेच्या नव्या जगांत आपण लौकरच प्रवेश करणार या आनंदांत चित्रकलेचें सर्व साहित्य त्या माकडापुढें टाकलें, व त्याला पूर्ण स्वातंत्र्य दिलें. थोड्याच वेळांत धरणीकंपाचा हादरा बसावा त्याप्रमाणें स्टुडिओंतील प्रत्येक वस्तु हादरूं लागली. रंग कागदावर उलथले. टांगलेलीं चित्रें एकामागून एक खालीं येऊं लागलीं, आणि शेवटीं तर मर्कटराज एका पुतळ्याच्या डोक्यावर विराजमान झालेले पाहून माझें धाबेंच दणाणलें. डोळ्यावर हात ठेवले. बाहेर आलों आणि कानांत बोटें घालून जिवाला भेदरून टाकणाऱ्या आवाजाची वाट पहात बसलों.

बराच वेळ कांहींच घडलें नाहीं. वातावरण अगदीं शांत झालें. दार उघडून आंत डोकावून पाहिलें तेव्हां स्वारी एका कागदावर पेट्यांतील सर्व रंग फेकून एका फडक्यानें ते सारवीत असल्याचें दिसलें. आंत जाऊन पाहिलें तो नवचित्रकृति फुलून आलेली दिसली. इतक्यांत त्याच्या हातांतील फडक्याकडे लक्ष गेलें. खिडकीबाहेर वाळत टाकलेल्या घरमालकीणीच्या साडीचा तो तुकडा होता. उरलेल्या साडीचा फास बांधून त्यावर कायमचें लटकून जावें असें वाटलें. दरवाज्यावर टिचकीऐवजी थाप बसली आणि त्यामागोमाग लत्ताप्रहार झाला. माकडाच्या साहाय्यानें चित्रकलेच्या पाटींत बसलेली नवविचारांची पाचर काढण्याचा प्रयत्न केला खरा पण त्यांत माझेंच शेपूट सांपडून आतां प्राणावर बेतलें होतें. मी माकडापुढें हात जोडून म्हटलें, "बाबा मारुतीराया, आतां तूंच मला या प्रसंगांतून सोडव." आणि प्रार्थना करून दार उघडलें आणि सरळ त्यांच्या अंगावर सोडून दिलें. सर्व पांगापांग झाली आणि त्या गडबडींत मीं पळ काढला, आणि पुनः आयुष्यांत कुठल्याही सुप्त इच्छांचा विचार करावयाचा नाहीं असा निश्चय केला. ● ● ●

मी उठून चंद्राच्या डोक्याला हात लावून पाहिला. ती चांगलीच तापानं फणफणली होती. विट्टू पद्धतशीरपणं आपले कपडे काढून नाइट सूट घालायला लागला होता.

मी लगेच खालीं गेलों. दक्षाला सांगितलं, हें कांहीं खरं नाहीं. टॅक्सी घेऊन येतों, तुम्हांला सगळ्यांना घरीं न्यायला. ती कांहींच बोलली नहीं. तिला सामान आवरून तयार व्हायला सांगितलं.

पुढचा इतिहास अगदीं थोडा आहे. चंद्राचा ताप उतरायला तीन दिवस लागले. तिन्ही रात्री आम्ही दोघांनीं जागून काढल्या.

विट्टूची आणि माझी चांगलीच दोस्ती झाली. चंदा बरी झाल्यावर जायच्या दिवशीं तो मला जो बिलगला तो खालीं उतरेनाच.

सगळं झाल्यावर दक्षा म्हणाली कीं, ती आपल्या कविता-संग्रहासाठीं एका प्रकाशकाला भेटायला आली होती. मी म्हटलं, हें एवढंच होतं तर मला आधीं कां नाहीं सांगितलंस? ती हंसली आणि थोड्या वेळानं म्हणाली, पण आतां त्याची जरुरी नाहीं. मी सगळं बाडच सकाळीं तुम्ही गेल्यावर बंबांत टाकून दिलं.

मीहि तिचे दोन्ही हात हातांत घेत म्हटलं, मी तरी कुठं लिहितों आहें अलीकडे? सगळं सोडून दिलं आहे. ● ● ●

# मला राष्ट्रपुरुष, 'हुकूमशहा' हवा!

—रा. ज. देशमुख

दिवास्वप्न पहावें हा पौगण्डावस्थेंतील नव्हे तर माणसाच्या अखंड जीवनांतील अत्यंत रम्य छंद असतो.

म्हणून पौगण्डावस्थेप्रमाणें बाल्यकाळीं आणि जीवनाच्या भर उमेदींतही स्वप्नें रंगवींतच असतो.

आयुष्याचा खडतर मार्ग आक्रमतांना मनानें निर्माण केलेलें स्वप्नविश्व ही विसाव्याची जागा असते.

मी बाळपणापासूनच स्वप्नाच्या जगांत रमतों. आणि अजूनहि स्वप्न पाहतोंच आहे. वय व अनुभवानुरूप स्वप्नविषय बदलतात इतकेंच—

## 'ढेरपोट्या'

"ए ते बघ, ते बघ." एक छोटीशी गोरी घारी मुलगी आपल्या भावाला माझ्याकडे बघून बघून कांहींतरी सांगत सांगत होती.

केयानी बेकरींत ब्राऊन ब्रेड आणण्यासाठीं मी नेहमींच जातों व तेंही ठराविक वेळीं, पण ही बहिणभावंडांची दुकल गेले चारपांच दिवसच दिसत होती. मी दिसलों कीं आपसांत खुणा तीं दोघें खुदुखुदु हसत, मीही त्यांच्याकडे बघून हसें. "काय बेबी, चॉकलेट हवें का?" अशासारख्या एकदोन शब्दांची देवघेव करीत असे. एक दिवस त्यांना चॉकलेटही दिलें.

आज मी बेकरींत पाऊल ठेवतांच ती चॉकलेट मैत्रिण माझ्याकडे बघून भावाला कांहीं तरी खुणेनें सांगत होती. पण त्याचें लक्ष होतें दुसरीकडे. एका गिन्हाइकाबरोबर आलेल्या मोठ्या टेरिअरकडे मुलगा अगदीं डोळे भरून पहात होता. भावाला खुणावून पोरगी दमली. शेवटीं ती मोठ्यानें हंसून म्हणाली "अॅहॅरे बावळट. आपला नेहमीचा चॉकलेटवाला ढेरपोट्या आला बघ." आणि मग अस्मादिकांच्या लक्षांत आलें कीं, अरे रोज रोज हीं पोरें आपल्याकडे बघून हंसतात 'ती आपली ओळख झाली म्हणून नव्हे तर तीं हंसत असतात आपल्या या मोठ्या पोटाला. ढेरपोट्या हें माझें नांव त्यांना अगदीं सहज सुचलें असावें.

अलीकडे गेलीं चार वर्षे माझें वजन व पोटाचा घेर वाढतोच आहे. आणि आतां तर तें इतकें वाढलें आहे कीं माझ्याकडे पाहून कोणालाही मला ढेरपोट्या म्हणावेंसें वाटावें.

काय गंमत असते पहा. आज ढेरपोट्या झालेला मी लहानपणीं देवा माझें पोट मोठें कर म्हणून देवाची आळवणी करीत असे.

माझ्या लहानपणीं हिप्परग्याचें वातावरण अध्यात्ममय होतें. त्या वातावरणांत अध्यात्माबरोबर माणसाचें मोठें मन हा एक आदरणीय विषय होता.

आमच्याकडे मोठ्या मनाचे आणि मोठ्या पोटाचे उंचनिच, जाड हाडपेराचे एक गृहस्थ येत.





अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

सासरच्या वैभवानें दिपून न जातां माहेरचा मोठेपणा राखण्यासाठीं सदैव तत्पर असणाऱ्या एका तरुणीची भावनास्पर्शी कौटुंबिक कथा—




:निर्माता: दत्ताराम गायकवाड :दिग्दर्शक: कमलाकर तोरणे

कथा – पटकथा – संवाद : राम केळकर

गीतें : ग. दि. माडगूळकर * संगीत : राम कदम

छाया : अरविंद लाड

संकलन : रामराव घाटके * कलादिग्दर्शक : राम पडेकर

रंगभूषा : काशिनाथ मोरे

भूमिका : सीमा, रमेश देव, ललिता देसाई, साळवी, शरद तळवलकर, दामुअण्णा मालवणकर, वसंत शिंदे, लीला गांधी, चित्तरंजन कोल्हटकर, अनंतकुमार, माई भिडे

वितरण हक्कासाठीं लिहा

**रसिक चित्र, स्टेशन रोड, गोरेगांव**

१९१० सालीं दक्षिण महाराष्ट्रांत एका वीरानें 'गुन्हेगार' जमातीच्या कायद्याविरुद्ध ब्रिटिशसत्तेशीं दिलेल्या झुंजेचा ज्वलंत इतिहास म्हणजेच महाराष्ट्र सरकारनें पहिलें पारितोषिक देऊन गौरविलेली श्री. अण्णाभाऊ साठे यांची अमर कथा 'फकिरा' लौकरच रुपेरी पडद्यावर येणार !



चित्रनिकेतन कृत

# फकिरा



निर्माता: द. ना. गव्हाणकर
दिग्दर्शक: कुमार चंद्रशेखर

पटकथा: अब्बास • गीतें: ग. दि. माडगूळकर • संगीत: राम वदाचकर

सुलोचना, वंदना, नाना पळशीकर, धुमाळ, दानवे, मा. परशुराम, दत्तोपंत आंग्रे, रणजित बुधकर, दिनानाथ टाकळकर, डी. व्ही. सुर्वे, शरद निफाडकर, कु. अशोक, कु. संजय आणि अण्णाभाऊ साठे, पी. जयराज, डेव्हीड यासह फकीराच्या भूमिकेंत सूर्यकांत

वितरण हक्कासाठीं लिहा

**चित्रनिकेतन** २५।३ पुरुषोत्तम बिल्डिंग, त्रिभुवन रोड, मुंबई ४






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"शरीरानें जसे मोठे तसेच मनानें मोठे" असें आदरयुक्त उद्गार त्यांच्याबद्दल सर्वजण काढीत.

मला वाटे आपलेंही पण पोट असें मोठें व्हावें म्हणजे आपलें मनही मोठें होईल.

देवाजवळ केलेली प्रार्थना व चिंतिलेले स्वप्न फळाला आलें. आज पोट एवढें मोठें झालें कीं तें पोरासोरांचा गंमतीचा आणि बायकोचा चिंतेचा विषय झालें.

बाकी या पोटाचे दोन फायदे निश्चित. एक पोरेसोरे त्याच्याकडे पाहून मनमुराद हसतात. आनंद मिळवतात. आणि बायकोला नवऱ्याची काळजी केल्याचें समाधान मिळतें.

### ××× आपली बायको झाली तर !

बाल्यकालाप्रमाणेंच मी पौगण्डावस्थेंत कांहीं स्वप्नें पहात होतों. मनोरथ रचीत होतो. पण ते फार मर्यादित होते. कारण भाकरीची धडपड करणाऱ्या माझ्यासारख्या अशिक्षित खेडवळ मनाला जमिनीवरचे पाय सुटून चालत नसे. वस्तुस्थितीची व स्वतःच्या मर्यादांची जाणीव सतत ठेवावी लागे. यासंबंधीं एक गंमतीदार स्वप्न मी क्षणभरच पाहिलें आणि त्यानें माझ्या जीवनांत आमूलाग्र क्रांती केली.

ते १९३६-३७ साल असावें. घरोघरीं कोळसा घालण्याचा जनदृष्ट्या हलका पण स्वतंत्र उद्योग मी करीत असे.

असाच एक दिवस कोळसा घालण्यासाठीं म्हणून मी एका घरीं गेलों. तसा मी गेलें वर्षभर त्या घरीं कोळसा घालीत होतों. पण तो दिवस निराळाच होता.

शिरस्त्याप्रमाणें मी जिना चढून वर गेलो. जिन्याच्याच तबकडींत चौदापंधरावर्षांची एक पाहुणी मुलगी केस वाळवीत उभी होती. सुस्नात टवटवीत अशी ती मुलगी पाहून माझ्या तारुण्यसुलभ मनाला तिचा मोह पडला.

ही मुलगी आपली बायको व्हावी, ती बायको झाली तर असें स्वप्न डोळ्यापुढें तरळूं लागलें. क्षणार्धांत हें सर्व झालें. मला वाट देण्यासाठीं मुलगी बाजूला झाली.

मी कोळसा टाकून क्षणभर जिन्याच्या तबकडींत घोटाळलों. डोळे आपलें 'स्वप्न' शोधीत होते. ती आंत कुणाशीं तरी मोठ्या खुशींत येऊन बोलत होती. बोलतांना हसत होती.

तिचें दर्शन आतां होणार नाहीं, म्हणून मोठ्या निराशेनें मी खालीं आलों, आणि जिना उतरलों मात्र माझ्या डोळ्यापुढें लख्खन विज चमकली. मन म्हणालें, "अरे वेड्या, जमीन आणि आकाश यांच्यांत जेवढें अंतर आहे. तेवढें तुझ्यांत आणि तिच्यांत आहे. कुठें ती कुठें तूं ?"

कोळशानीं काळ्या झालेल्या कपड्यांनीं व राकट, घट्ट पडलेल्या हातांनीं सांगितलें "प्रेमबिम करणें आपल्याला नाहीं परवडणार. ही सोनेरी मैना हवी असेल तर तिच्यासाठीं सोन्याचा पिंजरा उभा केला पाहिजे; म्हणजेच खूप काम केलें पाहिजे. चांगला प्रतिष्ठित धंदा केला पाहिजे. खूप पैसा मिळविला पाहिजे.

त्या दिवसापासून कष्ट करणें, पैसा मिळवणें एवढाच माझा मंत्र होता. पैसा मिळाला धंदा झाला. पण स्वप्न मात्र स्वप्नच राहिलें.



**बरें झालें देवा**
**पोटा नळी दारू**
**पोलीस उदारू**
**उभा झिंगे.**

### मला राष्ट्रपुरुष हवा (हुकुमशहा)

मी बालपणीं आणि तारुण्यांत स्वप्नें पहात होतों. तसेंच आज आयुष्याच्या माध्यान्हीलाही स्वप्न पहातों आहें.

लहानपणापासून माझ्यावर दोन फार महत्वाचे संस्कार झाले आहेत. एक देशावर प्रेम करणें व दुसरा देवावर श्रद्धा ठेवणें.

हे दोनही संस्कार मामांनीं केले आणि अजूनही ते पहिल्याइतकेच प्रभावी आहेत.

वरील दोन्हींही संस्कारांतून नेहमीं मला दोन स्वप्नें दिसतात.

एका स्वप्नांत मी साधु झाल्याचें पाहतों पण तें क्वचितच्.

सतत चिंतन मी कशाचें करीत असेन तर देशाचें व स्वप्न पहात असेन तर माझ्या बलशाली देशाचें. व तो बलशाली करणाऱ्या समर्थ राष्ट्रपुरुषाचे हुकुमशहाचे.

दुसरें महायुद्ध संपलें आणि खंडित कां होईना पण स्वातंत्र्य आम्हांला मिळालें.

गेल्या पंधरा वर्षांत युद्धांत नेस्तनाबूत झालेलीं राष्ट्रें परत नव्या चैतन्यानें उभीं राहिलीं. जर्मनी, जपान हे देश तर जणुं राखेंतून वर आले, आणि आम्ही? पंधरा वर्षांच्या या वाटचालींत आम्हीं काय मिळविलें ?

आज चीन आणि पाकिस्तान आमच्या देशाचे लचके तोडायला सज्ज झाले आहेत. त्यांना आमचा दरारा कसा तो वाटतच नाहीं.

शांतिदूत म्हणून आमचे (भारताचे) कितीही कौतुक जगानें केलें, आणि आम्ही वर मान करून शांतीचा टेंभा मिरविला, तरी आम्हांला हें पक्कें माहीत आहे कीं हें शांतीचें तत्त्वज्ञान आम्ही नाईलाज म्हणून पत्करलें आहे. ही शांतीही दुबळ्याची, भेकडाची शांति आहे.

जगाच्या बाजारांत कर्जाची झोळी घेऊन बाहेर पडल्याशिवाय आम्हांला कोणतीही सुधारणा करतां येत नाहीं. योजना पार पाडतां येत नाहीं. बरं भिकेचा पैसा तरी सत्कारणीं लागतो आहे कां ? तर तोही लांच खाण्यांत आणि बिनका करण्यांत (अर्धवट, अयशस्वी योजना) खर्च होतो. मला प्रामाणिकपणें असें वाटतें कीं आमच्या राष्ट्रानें लोकशाहीतत्त्वानुसार राज्यकारभार चालविण्याचें जें धोरण अंमलांत आणलें, तेंच आमच्या नाशाला कारणीभूत होतें आहे.

अज्ञानी, अपरिपक्व बुद्धीच्या मुलाला, त्याला शहाणपण येण्यापूर्वी दिलेलें स्वातंत्र्य व आजची आमची लोकशाही यांत काडीचाही फरक नाही.

लोकशाही राज्यविन्यास जी आर्थिक सुस्थिरता असावी लागते, जो सुसंस्कृतपणा असावा लागतो, जें राष्ट्रीय चारित्र्य व व्यक्तिमत्त्व विकसित व्हावें लागतें तें आमचें अजून झालेंच नाहीं.

आम्हांला योग्यप्रकारें काबूंत ठेवून राष्ट्रीय चारित्र्य विकसित करणारे संस्कार आमच्यावर करणारा राष्ट्रपुरुष आम्हाला पाहिजे.

युद्धानंतर राखेंतून उठलेला जर्मनी व जपान, अतिशय मागासलेले म्हणून प्रसिद्ध असलेले रशिया व चीन हे देश अर्धशतकांत जगांतील मोठी शक्ति म्हणून मानले जाऊं लागले, ते कांहीं लोकशाहीचा अवलंब करून नव्हे. राष्ट्रीय चारित्र्य व शिस्त अंगांत बाणण्यासाठीं म्हणून त्यांनाही व्यवस्थापकीय हुकुमशाही किंवा एकतंत्री राज्यव्यवस्था यांचाहि अवलंब करावा लागला.

अनुक्रमणिका





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

राष्ट्राची अतिशय हलाखीची परिस्थिति झाली कीं राष्ट्रांतील त्या परिस्थितींतूनच एखादा राष्ट्रपुरुष निर्माण होतो व त्या परिस्थितीत जुळणारी, पचणारी, आवश्यक राज्ययंत्रणा व विचारप्रणाली निर्माण करतो.

मी रोज स्वप्न पाहतों तें असा राष्ट्रपुरुष निर्माण झाला असून त्याच्या सुव्यवस्थित पण एकतंत्री राज्यव्यवस्थेमुळें बलशाली व शिस्तबद्ध झालेलें माझें राष्ट्र जगांत मान उंचावून उभे आहे असें.

ज्या राष्ट्रांत आज दगडाला शेंदूर फासून जिल्हा परिषद व पंचायतींचे देव (सभासद) आमचे शास्ते म्हणून उभे केले जात आहेत, तिथें हें स्वप्न पहाणें म्हणजे वाळूच्या कणांतून तेल काढण्यासारखें आहे. तरीहि मी समर्थ राष्ट्रपुरुषाचें स्वप्न दरदिवशीं पहिल्याइतक्याच तन्मयतेनें, निष्ठेनें पहातों आहें. त्यांत रमतों आहें.

• • •

# क्रिकेटपटु, डॉक्टर एम्. के. मंत्री व्हावें अशी इच्छा होती; पण . . .

—श्री. माधव मंत्री

लहानपणापासून क्रिकेट खेळायचा नाद मला होता असं म्हटलं तर तें कांहीं फारसं चुकीचं ठरणार नाहीं. पण होता तो नुसता नादच, आवड. त्यामागं पुढंमागं मोठा क्रिकेट-पटु होण्याची महत्त्वाकांक्षा कांहीं नव्हती. केवळ आवड म्हणून खेळत होतों आणि नशिबाची साथ घेऊन अगदीं आहिस्ते, आहिस्ते. शालेय, विद्यालयीन, विश्वविद्यालयीन आणि अखिल भारतीय असे एक एक टप्पे गांठीत होतों. आतां तर मी प्रथम दर्जाच्या सामन्यांतून निवृत्त होऊन पांच वर्षें झालीं. कधींतरी मागें वळून पहातां पहातां मनाची खात्री होते आणि आश्चर्यहि वाटतं कीं, खरोखरच देवाची इच्छा होती म्हणूनच मी इतका खेळूं शकलों. अगदीं मनाची तृप्ति होईतोंपर्यंत खेळलों अन् म्हणूनच मी जेव्हां प्रथम दर्जाच्या सामन्यांतून बाहेर पडलों तेव्हां मनाला विशेष असं दुःख झालं नाहीं. थोडंसं दुःख झालं जरूर, कारण आतां त्या जमतींना मी मुकलों होतों ना! पण हा दिवस केव्हां ना केव्हां तरी येणारच होता. आणि मी तर त्या दिवसासाठीं मनाची तयारी केव्हांच करून ठेवली होती.

मी आज एक क्रिकेटपटु म्हणून ओळखला जातों. पण एक वेळ अशी आली होती कीं, त्या खेळाला कायमचा मुकून कदाचित् एक डॉक्टर झालों असतों. कांहीं क्रिकेटशोकीन म्हणतील, बरं झालं असतं. ह्याला पंधरा वीस वर्षे क्रिकेट पीचवर बघण्याचं दुर्दैव तरी वांचलं असतं तर ह्या उलट बरेच जण म्हणतील कीं, बरं झालं डॉक्टर नाहीं झालांत ते! किती जणांचे मुडदे पाडले असते कोण जाणे!

असो—माझ्या वडिलांना जरी क्रिकेट मनापासून आवडत असला तरी मी तो 'करीअर' म्हणून घेऊं नये; त्या उलट मी जर डॉक्टर झालों तर खोऱ्यानं पैसा ओढूं शकेन असं त्यांचं म्हणणं होतं. आणि खरंच होतं तें. पण मुख्य मुद्याची बाब म्हणजे माझी लायकी, पात्रता. आयुष्यांत एकदांच दुसरा क्रमांक आला होता आणि तो सुद्धां मराठी दुसरीच्या वार्षिक परीक्षेत. ज्याप्रमाणं "Water finds its own level" त्याप्रमाणं मग मात्र मी जेमतेम पास ह्या श्रेणींतच उत्तीर्ण होऊं लागलों नि ते थेट अगदीं एम. ए. होईतोंपर्यंत. मॅट्रीकच्या परीक्षेत सुदैवानें म्हणा गणित आणि शास्त्र ह्या विषयांत साठ टक्के गुण मिळाले आणि डॉक्टर व्हावयाच्या इच्छेनें (माझ्या नव्हे, घरांतील वडीलधाऱ्या मंडळींच्या) माझी शास्त्रशाखेकडे रवानगी झाली. प्रॅक्टिकल्सचा वेळ आणि क्रिकेट प्रॅक्टिसचा वेळ एकच. कांहीं दिवस मनोनिग्रह केला आणि प्रॅक्टिस बुडवली पण एक वेळ अशी आलीच कीं क्रिकेटनें अभ्यासावर विजय मिळवला. तरी जेमतेम इंटर सायन्सपर्यंत जाऊन पोचलों आणि मग मात्र तो निर्णय घेण्याची वेळ आली. क्रिकेट करीअर म्हणून घेण्याचा प्रश्नच नव्हता पण अभ्यासांतली गति इतकी मंद होती कीं डॉक्टर होण्याच्या आशेवरहि पाणी सोडावं लागलं आणि कोर्स बदलून मग मी आर्टस्‌कडे वळलों.

पण समजाच मी डॉक्टर झालोंच असतों तर...! तर काय झालं असतं ही एक कल्पना करण्यासारखीच गोष्ट आहे. क्रिकेटचं वेड कांहीं माझ्या डोक्यांतून गेलं नसतं. नक्कीच मी मेडिकल कॉलेजमधून क्रिकेट खेळलों असतों आणि त्यावेळचे माझे सहाध्यायी रुसी मोदी, पॉली उम्रीगर आणि दत्तू फडकर यांच्याविरुद्ध खेळलों असतो. त्यांचा तो खेळ बघतांना वाटलं असतं कीं मी पण जर त्यांच्या-


## सचोटीसह सातत्य हवें

महाराष्ट्रीयांनीं व्यापारधंद्याची कांस धरावी असा आदेश आपले नेते पदोपदीं देत आहेत. अशा वेळीं व्यापारउदिमांत नव्यानें पदार्पण करणारांनीं आपल्यापुढें उत्तम आदर्श ठेवावा.

गिरगांव पंचे डेपो प्रायव्हेट लि. च्या संचालकांनीं १९२६ सालीं सुरूं केलेला पंच्यांपासून शालूपर्यंतच्या विविध प्रकारच्या नवनवीन कापडमालाच्या विक्रीचा व्यवसाय सचोटी, सातत्य व विनम्रता या गुणत्रयीवर चालवून भूमिति श्रेणीनें सुयश मिळविलें. आपल्या दादरच्या दुकानाप्रमाणेंच गिरगांवांत मॅजेस्टिक सिनेमा जवळील खटाव बिल्डिंगमध्यें पुन्हां कापडदुकान सुरू करून ग्राहकांच्या आग्रहाला मान दिला. आणि म्हणूनच वेस्टर्न रेल्वेवरील विरारपर्यंतच्या व सें. रेल्वेवरील कल्याणपर्यंतचा त्यांचा ग्राहकवर्ग संतुष्ट आहे.



### गिरगांव पंचे डेपो (प्रा.) लि.



गिरगांव दुकान
मॅजेस्टिक सिनेमाजवळ
खटाव बिल्डिंग (टे. २७२८०)

दादर दुकान
टिळकपूलपायथ्याशीं
केळकरपथ (टे. ६१७५२)







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




राजकीय व्रतवैकल्ये - एक (अ) विचारमाला




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




## राजकीय व्रतवैकल्ये - एक (अ) विचारमाला




अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

